# WÁCHAN PÁTH MÁLÁ.



VERNACULAR READER.

## No. 1.

BEING A SERIES OF TRANSLATIONS FROM ENGLISH INTO MARÁTHÍ.

BY

MAJOR T. CANDY,

SUPERINTENDENT OF THE POONA COLLEGE.

*Third Edition.*

LITHOGRAPHED AT THE POONA COLLEGE PRESS.

1857.

# PREFACE TO THE FIRST EDITION.

THE following pages contain translations of most of the prose pieces in McCulloch's "Series of Lessons," and of some of the prose pieces of his "Third Reading Book."

The translations were originally made for the use of the students in the English-Vernacular Department of the Poona College, to assist them in learning to render English into Maráthí. They are now put together and published as a Vernacular reading book under the sanction of the Board of Education.

Where the translation could be made at once both close and idiomatical, the object which was in view required that it should be so made; but where the difference of the idioms of the two languages required that the translation should be free in order to be idiomatical, all necessary freedom has been used.

The fictitious European names of the original have in most cases been changed for names familiar to Natives; but the names of real persons and places have been, of course, kept.

Many of the ideas here presented will be new to Native Readers, and may therefore require to be read carefully to be understood by those not accustomed to think; but the translator hopes that the dress in which they have been clothed will not be thought uncouth and unbecoming. He acknowledges here with pleasure his obligations to his Pandit, Parshuram Pant Gor-bole.

The Maráthi versions of a few pieces are not translations of them, but paraphrases or accommodations of them to ideas and customs of Natives.

The pieces entitled, "A walk into the country," "Half a crown's worth," and "How to make the Time go fast," are accommodations of the originals by Krishna Chiplunkar, the Head pupil of the English Department of the College.

It is hoped that the work here presented to the Public may prove useful as a help and guide to translation, as well as an instructive and interesting reading Book.

The pieces have been progressively arranged according to their simplicity.

Poona College,
March 1850.

T. C.

## CONTENTS.

### PIECES ON SCIENCE, NATURAL HISTORY, &c.

*(Continued (*

## MORAL PIECES.



## MISCELLANEOUS PIECES.

*(Continued)*

## MISCELLANEOUS PIECES.

# वाचनपाठमाळा

हें पुस्तक

इंग्रेजी पुस्तकांतील कितीएक गोष्टींचें

मराठी भाषांतर करून

मराठी लोकांस वाचण्याकरितां

मेजर क्यांडी साहेब पाठशाळेचे सुपरिंटेंडेंट ह्यांनीं

रचिलें, तें

मेहरबान डैरेक्टर आफ् पब्लिक इन्स्ट्रक्शन्

त्यांच्या हुकुमावरून

पुणे पाठशाळेकडील छापखान्यांत

छापिलें.

छापणार नारो रामचंद्र ठकार स्कू॰ छा॰

आवृत्ति तिसरी.

मुकाम पुणें.

इसवी सन्न १८५७

शके १७७९

# प्रस्तावना

इंग्रेजीमध्यें सिरीइज् आफ् लेसन्स् , आणि पर्दश डिंग्बूक , त्या नांवाचीं दोन पुस्तकें मकलक नांवें साहेब त्यांनीं केलेलीं आहेत , त्यांतील बहुतेक गोष्टींचीं भाषां तरें त्या पुस्तकांत आहेत .

हीं भाषांतरें पुणे पाठशाळेंतील विद्यार्थी , जे इं- ग्रेजी भाषेचा व मराठी भाषेचा अभ्यास करितात , त्यांस इंग्रेजी भाषेचें मराठी भाषांतर कसें करावें हें समजण करितां केलीं होतीं ; तीं हल्लीं एकत्र जमवून त्यांचें वाचण्याचें पुस्तक मेहेरबान् बोर्डआफ् एज्युकेश हुकुमावरून केलें आहे .

इंग्रेजी भाषेची रीति व मराठी भाषेची री हीं भिन्न भिन्न आहे , त्याजव जेथें इंग्रेजी रीति व र रीति बरोबर मिळाली , तेथें भाषांतर बरोबर लि परंतु जेथें इंग्रेजी रीतीप्रमाणें मराठींत लिहिण्या रवें न दिसे , तेथें अर्थमात्र घेऊन मराठी रीतीप्रम लिहावें लागलें .

मूळ पुस्तकांत जीं कल्पित नांवें आहेत त्यां ीं त्या पुस्तकांत इकडील नांवें कल्पून लिहिलीं

आणि त्यांत गांवांचीं वगैरे जीं नांवें वास्तविक आहेत, तीं एथेंही तशींच ठेविलीं आहेत.

त्यापुस्तकांत ६६ गोष्टी आहेत, त्यांपैकीं कितीएक नीतीच्या आहेत, कितीएक विद्या कला कौशल्य त्यांच्या आहेत, कितीएक देशरीति लोकरीति वगैरे विषयांच्या माहितगारीच्या आहेत, व कितीएक सदाचरणाच्या आहेत.

त्या पुस्तकांत जे विषय आले आहेत त्यांतून कांहीं विषय इकडील लोकांस नवीनसे वाटतील, त्यामुळें कोठें त्यांचा बोध कदाचित् लौकर होणार नाहीं. [illegible] फिरून पाहिले असतां त्यांचा बोध सहज

ह्या गोष्टी वाचल्यानें एथील लोकांच्या ज्ञानाची [illegible] होईल, आणि त्यांचीं मनें सदाचरणाकडे लागतील अशी आशा आहे.

त्या पुस्तकांत ज्या सुलभ गोष्टी त्या पहिल्यानें व ज्या कठीण कठीण त्यापुढें घातल्या आहेत.

त्या पुस्तकांतील गोष्टींपैकीं, "सहल करून येणें, रुपयांची योग्यता," व "वेळ लौकर जाण्याचा" ह्या तीन गोष्टी कृष्णाजिपळोणकर पाठशाळेंती

# अनुक्रमणिका.

ल एक विद्यार्थी त्यानें इंग्रजी पुस्तकांतील विषय मनांत आणून इकडील रीतीप्रमाणें रचिल्या.

हीं भाषांतरें करतांना परशुरामपंत गोडबोले त्यांचें साहाय्य उत्तमरीतीनें मिळालें. हें भाषांतरकर्ता संतोषानें लिहितो.

---

पाठ. पृष्ठ.

| पाठ | | पृष्ठ |
| --- | --- | --- |

पाठ. पृष्ठ.

| पाठ. | | पृष्ठ. |
|---|---|---|
| ६२ | मनुष्यजाति आणि खालचे प्राणी त्यांचा भेद.- - - - - - - - - - - | २६९ |
| ६३ | ओक वृक्ष.- - - - - - - - - - - - | २७४ |
| ६४ | पृथ्वीच्या नकाशाचें वर्णन; एशियाखंड.- | २७० |
| ६५ | आफ्रिकाखंड व युरोपखंड | २०६ |
| ६६ | अमेरिकाखंड.- - - | २०१ |



# पाठ १

## मुलांस उपदेश.

मुलांनो, तुम्ही आपल्या आईबापांची प्रीति बाळगा. तुमचे आईबापांच्या इतकी दया तुम्हांवर कोण करितात? तुम्हांला शिकविण्याविषयीं इतके श्रम कोण घेतात? अन्न आणि वस्त्र, आणि रात्रीं निजावयाकरितां उबेचें आंथरूण, त्यांची पुरवणी तुमच्यासाठीं कोण करितात? तुम्ही दुखणेकरी असतां, आणि तुम्हांला वेदना होती, तेव्हां तुमची दया कोण करितात? आणि ममतेनें तुमची चाकरी कोण करितात? आणि तुम्हांला औषधपाणी कोण देतांत? आणि देवानें तुम्हांला आरोग्य, आणि शक्ति, आणि हरएक चांगली वस्तू द्यावी म्हणून त्याची प्रार्थना कोण करितात?

तुमचीं आईबापें दुखण्यांत असलीं, किंवा संकटांत असलीं, तर त्यांचें समाधान करण्यास तुमच्यानें होईल तितकें तुम्हीं करावें. तीं गरीब असलीं, तर त्यांची मदत तुम्हांस करतां यावी म्हणून तुम्ही अधिक कष्ट करा. त्यांनीं तुमच्यासाठीं किती केलें. आणि किती सोसलें, त्यांची

आठवण ठेवा.

तुम्ही आपले भावांबहिणींची प्रीति बाळगा. त्यांजला छळूं नका; त्रासवूं नका; वाईट नांवे ठेवूं नका; आणि त्यांस मारण्याकरितां आपले ल्हान हात उगारूं नका. तुम्हांला ज्याची अशी वस्तू त्यांजपाशीं जर असली, तर त्यांवर रागें भरूं नका, किंवा त्यांजपासून ती घेऊं पाहूं नका. त्यांला आवडती अशी वस्तू जर तुम्हांपाशीं असली, तर ती वांटून द्या.

तुमचीं आईबापें तुम्हांला भांडतांना पाहतात, तेव्हां तीं दुःखी होतात. तीं तुम्हां सर्वांची मोठी ममता बाळगतात; आणि तुम्हीं एकमेकांची प्रीति बाळगावी आणि एकमेकांशीं संख्यानें आणि गोडीगुलाबीनें वागावें, असें तीं इच्छितात.

---

## पाठ २

## मुलांस आणखी उपदेश

मुलांनो, तुम्ही कधींही खोटें बोलूं नका. आपण पाहिलेली किंवा ऐकलेली गोष्ट जेव्हां तुम्ही सांगतां, तेव्हां जशी ऐकिली असेल, किंवा पाहिली असेल, तशीच सांगा.

झालेली गोष्ट जरी तुम्हांस साधी वाटली, तरी ती चांगली बनावण्याकरितां तुम्ही कांहीं फिरवूं नका. किंवा तींत पदरचें घालूं नका. तुम्ही कांहीं मजकूर विसरलां, तर मी विसरलों, असें सांगा. खरेपणा ज्यांस आवडतो ते थट्टेंतही खोटें बोलत नसतात.

वचन देण्याच्या अगोदर चांगला पुरता विचार करा. आम्ही अमुक गोष्ट करूं, असें तुम्ही बोललां, आणि ती गोष्ट तुम्हीं केली नाहीं, तर तुम्ही लबाडी बोललां, असें होईल. मग तुमचा विश्वास कोण धरील, किंवा तुमचें बोलणें खरें कोण मानील?

तुम्हांपासून जेव्हां कांहीं वाईट गोष्ट झाली, तेव्हां तुम्ही नाकबूल जाऊं नका. जरी तुम्हांस भय वाटलें, कीं कबूल झाल्यानें शिक्षा मिळेल, तरी नाकबूल जाऊं नका. केलेल्या वाईट गोष्टीचा खेद तुम्ही मानीत आहां, आणि फिरून तशी गोष्ट न करण्याविषयीं जपत आहां, असें पाहून लोक बहुतकरून तुम्हांवर रागें भरणार नाहींत, किंवा तुम्हांस शिक्षा करणार नाहींत. तुम्ही खरें बोलतां, म्हणून ते तुमची भीति बाळगतील. अपराध लपविण्याकरितां, आणि आपली शिक्षा चुकविण्याकरितां ही, तुम्ही खोटें बोलत नाहीं, असें पाहून तुमचें बोलणें सर्वकाळ खरें मानावें, असें

त्यांस वाटेल

कोणास दुःख देऊन आपणांस कधीं रंजवूं नक्
मुक्या जनावरांस देखील दुःख देऊन आपणांस सुख दे
ऊं नका . त्यांचें मांस आपणांस खाण्यास पाहिजे, म्हणू
आपण पुष्कळ प्राण्यांस जिवें मारितों, तरी लहान मुलां
किंवा मुलींनीं माश्या माराव्या, किंवा त्यांचे पंख अथवा पाय उ
डून काढावे, अथवा फुलपांखरें धरून त्यांस टांगरून
रावें, किंवा पांखरांचीं लहान पिलें त्यांचीं मऊ, उबेचीं, अ
णि सुखाचीं कोटीं आहेत त्यांतून चोरून न्यावीं, किंवा ब
डीं आणि गाढवें त्यांस कुशीं नून रक्त निघे तोंपर्यंत, अ
वा पायाळ होत तोंपर्यंत, मारावें. किंवा कोणतीही क्रूर क
त्यांनीं करावी, त्याचें कांहीं कारण दिसत नाहीं

# पाठ ३

## माझें नांव काय?

मुला, मी काय आहें, आणि माझें नांव काय, हें मला सांग. मी पूर्व दिशेस उगवतों, आणि मी उगवलों कीं दिवस लागला. तुझी उठण्याची वेळ आली, म्हणजे मी आपल्या सोन्यासारिख्या व चकचकीत डोळ्यानें तुझ्या खिडकींतून आंत डोकावून पाहतों, आणि तुला सांगतों त्वां बिछान्यावर पडलेला राहून झोंप घ्यावी, म्हणून मी प्रकाश देत नाहीं; तर त्वां उठून खपावें, वाचावें, आणि रपेट करावी, म्हणून प्रकाश देतों.

मी मोठा वाटचालणारा आहें. मी संपूर्ण गगनाव रून वाट चालतों. मी कधीं थकत नाहीं, आणि कधीं थांबत नाहीं. माझ्या मस्तकावर चकचकीत किरणांचा मुकुट आहे; आणि मी आपले किरण सर्वत्र पाडतों, झाडें, घरें, आणि पाणी, त्या सर्वांवर मी प्रकाश पाडतों. ज्या ज्या वस्तूवर माझा प्रकाश पडला ती ती वस्तू सुंदर आणि चकचकीत दिसती. मी तुला उजेड देतों, आणि ऊन ही मीच तुला देतों. फळें आणि धान्यें हीं मीच पिक-

वितों. मी आकाशांत फारच उंच आहें; सर्व झाडांपेक्षां, डोंगरांपेक्षां; आणि ढगांपेक्षां ही उंच आहें.

आतां मी आहें त्याहून जर जवळ आलों, तर तूं भाजून मरशील, आणि सर्व झाडें गवतें जळून जातील. कधीं कधीं मी चकचकीत किरणांचा आपला मुकुट काढितों, आणि पातळ रुपेरी ढगांच्या शेल्यानें डोकें गुंडाळतों; अशा वेळेस तुझ्यानें मजकडे पाहव तें; परंतु जेव्हां कांहींच ढग नाहींत, व दुपारचे वेळेस मी आपल्या सगळ्या तेजानें प्रकाशतों, अशा वेळेस तुझ्यानें मजकडे पाहवत नाहीं; कां कीं, पाहिलें तर मी तुझ्या डोळ्यांस दिपवीन. आणि तुला आंधळें करीन. अशा वेळेस एक घारीच्यानें मात्र मजकडे पाहवतें. घारीच्यानें आपल्या तीव्र दृष्टीनें सर्वकाळ मजकडे टक लावून पाहवतें.

सकाळीं उठून मी दिवस करावयास निघणार, तेव्हां कुकुडकुंभा पक्षी मला सामोरा यावयास आकाशांत उडतो, आणि अंतरिक्षीं सुंदर गायन करितो; आणि मी येत आहें हें सर्वांस सांगण्याकरितां कोंबडा मोठ्यानें आरवतो; परंतु घुबड आणि पांकोळी मला पाहून उडून जातात, आणि झाडांच्या ढोल्यांत, व जु-

न्या भिंतीच्या फटींत, जाऊन लपतात. आणि सिंह व वाघ हे आपल्या गुहांत जाऊन दिवसभर निजतात.

मी सर्व ठिकाणीं प्रकाशतो; इंग्लंडांत, हिंदुस्थानांत, अरबस्थानांत, व सर्व पृथ्वीवर, प्रकाशतों. सर्व पृथ्वीवर जे सुंदर आणि तेजस्वी पदार्थ आहेत, त्या सर्वांहून मी सुंदर व तेजस्वी आहें. तर मुला, मी काय आहें, आणि माझें नांव काय?



## पाठ ४

## मानवी कुटुंब.

बाप, आई, आणि मुलें, हीं मिळून एक कुटुंब होतें. तीं सगळीं एका घरांत राहतात; तीं एका आढ्याखालीं निजतात; तीं एकत्र अन्न खातात; तीं नित्य, सकाळीं आणि संध्याकाळीं, मिळून देवाची स्तुति करितात. त्यांचा एकमेकांचा फार जवळचा संबंध असतो; आणि परक्यापेक्षां तीं एकमेकांस आवडतीं असतात. एक जर दुखण्यास पडलें, तर सर्व दुःखी होतात; आणि एकाला जर

हर्ष झाला, तर सर्व हर्ष पावतात.

पुष्कळ घरें एके ठिकाणीं बांधलेलीं असतात; त्यांत पुष्कळ कुटुंबें एकमेकांच्या शेजारीं राहतात; चौकांवर व बागांमध्यें त्यांस एकमेकांची गांठ पडती; घेण्या देण्या-बद्दल तीं बाजारांत एकत्र होतात; व चावडीमध्यें एकत्र जमतात; आणि देवाच्या भक्तीच्या वेळेस देवळांत एकमेळणीं जातात. इतक्या गोष्टी जेथें घडतात त्या स्थळाला गांव असें म्हणतात.

पुष्कळ घरें असलीं, तर तें शहर म्हणावें. पुष्कळ शहरें आणि पुष्कळ प्रांत मिळून राज्य होतें. राज्याच्या भोंवतीं डोंगर असतात; त्यांतून नद्या वाहतात; त्यांच्या कांठांशीं समुद्र असतात, त्यांतील राहणारे ते एकमेकांचे देशभाऊ होत. ते एकच बोली बोलतात; आणि ते एकोप्यानें युद्ध किंवा सल्ला करितात; राज्य चालविणारा तो राजा होय.

पुष्कळ राज्यें, व मनुष्यांनीं भरलेले देश, व बेटें, व महाद्वीपें, आणि निरनिराळ्या हवेचे देश, हीं सर्व मिळून जग आहे. वारुळावर जशा मुंग्या फिरतात, तशीं त्या पृथ्वीचे पाठीवर माणसें गजबजतात. कोणी उन्हाच्या तापानें काळीं असतात; कोणी लोंकरीचीं वस्त्रें पां

धरून थंडीच्या कडाक्याचें निवारण करितात; कोणी द्राक्षारस पितात, कोणी नारळाचें मधुर पाणी पितात, आणि कोणी ओढ्याच्या पाण्यानें आपली तहान भागवितात.

हीं सर्व मनुष्यें मिळून देवाचें कुटुंब आहे. जसा मेंढक्या आपल्या कळपांतील मेंढरें ओळखतो, तसा देव ह्या प्रत्येकास जाणतो. तीं नाना बोल्यांनीं देवाची प्रार्थना करितांत, तरी तो सर्वांच्या बोल्या समजतो. ज्यांचें संरक्षण देव न करी इतकीं हलकीं कोणी नाहींत.

अगे हबशिणी, जी तूं दासीपणांत झुरत बसलीस, जरी कोणी माणूस तुला पाहात नाहीं, तरी देव तुला पाहतो; जरी कोणी मनुष्याला तुझी दया येत नाहीं, तरी देवाला तुझी दया येती. तूं आपल्या बंधांतून त्याचा धांवा कर, कां तर तो तुला कान देईल.

हे सार्वभौम राजा, जो तूं शेंकडों राज्यांवर राज्य करतोस, तो तूं मजवर कोणी वरचढ नाहीं अशी शेखी मिरवूं नको; तुझ्या डोईवर देव आहे, आणि जर त्यांकाहीं वाईट केलें तर तो तुला शिक्षा करील.

पृथ्वीवरील लोकांनो, देवाचें भय बाळगा: मनुष्य

जातीच्या कुटुंबांनो, तुम्ही देवाची प्रार्थना करा.

---

# पाठ ५

## ठकबाजीचें पाप आणि तेणेंकरून भय.

शब्दांनीं धडधडीत खोटें बोललें नसतांही लबाड होण्याच्या पुष्कळ रीति आहेत. जेव्हां जेव्हां तुम्ही आपल्या आईबापांस ठकवूं पाहातां, तेव्हां तेव्हां लबाडीचा दोष तुम्हांकडे येतो.

मागें एकवेळ असें झालें, कीं मंडळी भोजनास बसली असतां पोळ्यांचें ताट वाढप्या फिरवीत होता, तेव्हां आपल्या आईच्या कडेस बसलेला एक लहान मुलगा त्यानें, जेवढा तुकडा आई घेऊं देईल असें त्यास ठाऊक होतें, त्याहून फार मोठा पोळीचा तुकडा ताटांतून घेतला. त्या वेळेस क्षणभर त्याच्या आईची दृष्टि दुसरे कडे होती; इतक्यांत त्यानें लहानसा तुकडा तोडून घेऊन, बाकीचा ओंटींत ठेवून, ओंटी रुमालानें झांकली.

आईनें जेव्हां पाहिलें तेव्हां तो लहानसा तुकडा पाहून ती समजली कीं, त्यानें एवढाच घेतला आहे. आ-

ईला ठकवावें असें त्याच्या मनांत होतें. त्यानें हें केलेलें काम तेव्हांपासून पुढें पर्यंत आईस कधीं समजलें नाहीं; परंतु देवानें त्यास हें काम करितां पाहिलें, आणि पाहतांच त्याजवर कृपाळास आंख्या घातल्या.

त्या मुलानें जें काम केलें तें नीच आणि दुष्ट असें तुम्हांस वाटत नाहीं बरें? केवळ पोळीच्या तुकड्याच्या लोभानें म्यां आपल्या दयाळू आईस ठकविलें, असें जेव्हां त्यास आठवत असेल, तेव्हां त्यास लाज वाटत नसेल बरें? आणि ज्या मुलानें असें नीच काम केलें, त्यावर कोणाच्यानें प्रीति धरवेल बरें? व त्यास कोणाच्यानें चांगलें मानवेल बरें? अशा मुलाच्यानें कधीं सुखी होववणार नाहीं. निष्कपटी आणि मोकळ्या मनाचा जो मुलगा तोच मात्र सुखी होतो.

केवढ्याही युक्तीनें कोणीं ठकबाजी केली, तरी ती आब्रू घेणी होय; आणि तिच्या पाठीमागें दुःख आणि धिक्कार हीं येतात. जर तुम्हांला अंतःकरणाचें समाधान पाहिजे, व मित्रांची प्रीति पाहिजे, तर जें काम पुढें लपवावें असें वाटायाजोगें असेल, तें काम तुम्ही कधीं करूं नका. ठकबाजीला नीच मानून वर्जा; मग तुम्हांला कशाचेंही भय नाहीं.

आणखी तुम्हाला सांगतों कीं, ठकबाजी ही तुम्हांला देवलोक बंद करील. शेवटल्या दिवशीं म्हणजे मनुष्यमात्राच्या न्यायाच्या दिवशीं, हरएक काम व हरएक गुह्य गोष्ट त्यांचा झाडा देव घेईल; ज्या मुलानें लबाडी केली आहे, व ठकबाजी केली आहे, ती त्या दिवशीं उजाडीस आल्यावर त्यास कसें वाटेल बरें?



# पाठ ६

## मनुष्यजातीचे प्राणी-इंद्रियें.

मी मनुष्यजातीचा प्राणी आहें. मी उभा चालतों; मनुष्यजातीचे सर्व प्राणी तसेच चालतात. इतर प्राणी आपलीं तोंडें भुईकडे करून चालतात. मी चालतांना पाय वापरतों; इतर प्राणीही चालतांना आपले पाय वापरतांत

मला पाहतां येतें, ऐकतां येतें, स्पर्श जाणतां येतो. चाखतां येतें, आणि हुंगतां येतें. इतर प्राण्यांसही त्या गोष्टी करतां येतात. पाहणें, ऐकणें, स्पर्श जाणणें, चाखणें आणि हुंगणें, हीं पांच इंद्रियांचीं कर्मे म्हटलीं आहेत.

डोळ्यांनीं मी पाहतों, कानांनीं मी ऐकतो, जिभनें मी चाखतों, नाकानें मी हुंगतों, आणि शरीराच्या कोणत्या ही भागानें मला स्पर्श जाणतां येतो. इतर प्राणी ही डोळ्यांनीं पाहतात, कानांनीं ऐकतात, नाकानें हुंगतात, आणि त्यांच्या शरीरास कोठें ही स्पर्श झाला असतां ते जाणतात.

आनंद, दुःख, आणि भय, हींही मला होतात; इतर प्राण्यांस ही हे मनाचे धर्म होतात. कुतरा आपला धनी संतोषी पाहतो, तेव्हां त्याला आनंद होतो; आणि आपला धनी असमाधानी पाहतो तेव्हां त्याला दुःख होतें; आणि आपला धनी चाबूक उगारतां पाहतो तेव्हां त्याला भय होतें.

मला बोलतां येतें; जें मला वाटतें तें शब्दांनीं मला बोलून दाखवितां येतें. इतर प्राणी शब्द करितात, परंतु त्यांस बोलतां येत नाहीं. कुतरा भुंकून आनंद दाखवितो आणि ओरडून दुःख दाखवितो, मुद्रेनें तो आपला शोक दाखवितो, आणि पायांत शेपटी घालून भ्यालेपणा दाखवितो परंतु त्याला बोलतां येत नाहीं.

मला विचार करतां येतो. विचार करण्याची शक्ति ही बुद्धि होय. परात्पर परमेश्वरानें मोठ्या कृपेनें ज्या देणग्या मनुष्यजातीस दिल्या आहेत, त्यांतील बुद्धि ही

एक देणगी आहे . इतर प्राण्यांस परमेश्वरानें बुद्धि दिली नाहीं.

घराला खिडक्या, दारें, आणि धुराडीं कां असतात, त्याचें कारण मला समजतां येतें; शेगडी धातूची करितात, लांकडाची करीत नाहींत त्याचें कारण काय, व भांड्याला धरायाला मूठ कां असती; सुरीच्या पानाला तिखट धार कां असती; माझे जोडे कातड्याचे कां असतात, कथिलाचे, किंवा लांकडाचे, किंवा कापडाचे कां असत नाहींत, त्या सर्व गोष्टी मला समजतां येतात . ज्या गोष्टी मला जाणतां येतात त्या पशूंस जाणतां येत नाहींत . त्या गोष्टींचीं कारणें त्यांस जशीं समजत नाहींत तशीं पशूंस ही समजत नाहींत .

माझ्या मनास वाटेल तसें करण्यास मला सदा परवानगी कां नसती, हें ही मला समजतां येतें. माझीं आईबापें आणि माझे शिक्षक जें मला सांगतात, तें कां केलें पाहिजे; आणि हुकुमबंदा, उद्योगी, आणि लक्ष्य लाव्या, असें म्यां कां व्हावें, हें ही मला समजतां येतें .

गुलाब आणि गुलानार त्यांचा सारखेपणा आहे असें मी पाहतों; कां तर दोन्हीं फुलें आहेत, दोहोंस चांगला वास आणि रंग आहे, दोहोंस मूळ, पानें, आणि देंठ, हीं अस

तात; दोहोंच्याही प्रथम कळ्या असतात, दोन्ही थोडे दिवसपर्यंत फुललेलीं असतात, मग कोमेजतात.

आणखीही मी त्यांचा कांहीं निराळेपणा आहे असें पाहातों, गुलानाराहून गुलाब निराळें आहे; कांतर त्याला दुसऱ्या प्रकारचा वास असतो; गुलाबाला कांटे असतात, परंतु गुलानाराला नसतात. मला बुद्धीच्या योगानें गुलाबाला गुलानाराशीं मिळवितां येतें, व त्यांचा भेद जाणतां येतो.

## पाठ ७

## युरोपखंडांतील चार ऋतूंचे वर्णन.

पिस्ताई रंगाचा शेला पांघरून जी सुंदर कुमारिका येत आहे ती कोण? तिच्या डोक्यावर फुलांची जाळी आहे. ती जेथें जेथें पाउलें टाकिती तेथें तेथें भुईंतून फुलें निपजतात, शेतांवर जिकडे तिकडे पडलेलें बर्फ व नद्यांवर थिजलेलें पाणी त्यांजवर तिनें श्वासोच्छ्वास टाकला म्हणजे तीं वितळून जातात. लहान कोंकरें

तिच्या भोंवतालीं वागडतात, आणि तिच्यायेण्यानें आ-
गतस्वागत करावयाला पांखरें आलाप घेतात. तिला पा-
हिलें म्हणजे पांखरें नर मादी वरावयास लागतात, व घ-
रटीं बांधावयास आरंभ करितात. मुलांनो व मुलींनो,
ही सुंदर कुमारिका तुम्हीं पाहिली काय? तुम्हीं पाहिली,
तर ती कोण आहे, व तिचें नांव काय आहे, हें मला सांगा.

एक बारीक तलमसूती वस्त्र मात्र घेऊन दक्षिणे
कडून जी येत आहे ती कोण? तिचा श्वास उष्ण, त्याच्या
नें उकाडा होतो. विश्रांतीसाठीं ती शीतळ छायेच्या आश्र
यास जाती. ती आपले गळालेले हात पाय भिजवायासा
ठीं स्वच्छ पाण्याच्या नद्या व स्फटिकासारख्या पाण्याचे ओ
होळ त्यांजकडे जाती. ती जवळ आली म्हणजे नद्या आ-
णि ओहोळ आटून जातात. ती नाना तऱ्हेच्या फळांच्या गुळ
मठ रसानें उन्हानें सुकलेले आपले ओंठ थंड करिती. उन्हा-
नें काळसर झालेले जे गवत वाळविणारे ते तिच्या येण्या-
चें आगतस्वागत करितात, आणि मेंढरांची लोंकर चरच-
र वाजणाऱ्या कातरांनीं कातरतात, असे जे धनगर,
ते तिच्या येण्याचें आगत स्वागत करितात. ती आली म्ह-
णजे झांपळलेल्या झाडाच्या दाट सांवलीखालीं त्यां जा-
ऊन निजावें! जों गवतावर दंव आहे अशा मोठ्या स-

काळीं त्यां तिज बरोबर फिरावें ! मेंढक्या आपला मेंढ-वाडा लावितो, व शुक्र दिसूं लागतो, तेव्हांच्या संधीच्या कोमळ प्रकाशांत त्यां तिज बरोबर रमावें ! अशी दक्षिणे कडून येती ती कोण आहे ? मुलांनो, मुलींनो, तुम्हांस ठाऊक असलें, तर ती कोण आहे, व तिचें नांव काय आहे, हें मला सांगा.

चोरपावलांनीं, आम्हांस न कळूं देतां, जो धिमे धिमे येतो तो कोण आहे ? द्राक्षारसानें त्याचीं वस्त्रें तांबडीं झालीं आहेत, आणि पिकलेल्या गव्हांच्या पेंढीनें त्याचे आंग बांधले आहेत. त्याचे केंस विरळ झाले आहेत, व गळायास आले आहेत; त्याच्या सोनसळ्या रंगांत अमंगळ असा जो फर्डा रंग तो मिसळला आहे. कवंठीचीं पिकलेलीं फळें तो झाड हालवून पाडतो. शिंग फुंकून तो पारध्यांस पारधीकरितां बोलावितो. बंदुकीचा अवाज होतो, कांपलेला तित्तिरपक्षी आणि फेजंट* नांवाचा सुंदर पक्षी त्यांजपासून अंतरिक्षांत रक्तस्राव होऊन ते फडफडतात, आणि पारध्यांच्या पायांजवळ मेलेले पडतात. मुलांनो व मुलींनो, तुम्हांस ठाऊक असलें, तर तो कोण आहे, व त्याचें नांव काय आहे, तें मला

---

* शरदतूंत तित्तिर आणि फेजंट या पक्ष्यांची पारध युरोपखंडांत फार होती

सांगा.

आंगावर लवेचें कातडें व उबेची लोंकर घेऊन उत्तरे कडून येतो आहे हा कोण? तो आपला घोंगता गच्च गुरगु टून घेतो. त्याच्या डोक्याला टकल पडलें आहे, त्याची दाढी ती थिजलेल्या पाण्याच्या कणांची आहे. उंच रचलेली भड-भडीत आगटी त्याला आवडती; आणि पेल्यांत लकलक क-रणारी दारू त्याला आवडती; लोखंडी+ जोडा पायांत घालून तो थिजलेल्या नद्यांवरून रूळदिशीं चालतो. त्याचा श्वास तिखट आणि थंड आहे. तो जवळ आहे तों भूतळांतून बा हेर डोकें करायास कोणत्याही फुलाला धमक येत नाहीं. ज्याला तो स्पर्श करितो त्याला तो थिजवून टाकतो. मुलां नो, मुलींनो, त्याला तुम्ही पाहतां काय? तो आपणांवर ये त आहे; तो लवकर येऊन ठेपेल. तुम्हांस ठाऊक असलें, तर तो कोण आहे व त्याचें नांव काय आहे, हें मला सां-गा.

---

\+ हिवाळ्यांत लोखंडी जोडे पायांत घालून थिजलेल्या पाण्या-वरून चालण्याची फार चाल युरोपखंडांत आहे

# पाठ ८

## पांच इंद्रियें

मनुष्यजातीचा प्राणी आपल्या पायांवर नीट उभा राहतो. त्याचें डोकें त्याच्या दोहों खांद्यांच्या मधून नीट वर गेलें आहे त्याला दोन पाय असतात. तो आपल्या हातांनीं पदार्थ धरितो. त्याच्या पायाचा तळवा भुईस टेंकून असतो.

डोकें उजव्याकडे आणि डाव्याकडे फिरतें. डोक्याचा वरला आणि मागला भाग त्यांस कंवटी म्हणतात. कंवटीवर केंस असतात. कंवटीच्या आंत मगज असतो, जो मगज हाडांच्या पेटींत असल्याप्रमाणें तींत असतो. ही पेटी आहे म्हणून त्या मगजास धक्का लागत नाहीं.

तोंडावर डोळे, नाक, हनवटी, आणि दोहोंकडे दोन कान असतात. डोळे पांपण्यांच्या योगानें मिटतात; ज्या पांपण्या त्यांस वायूपासून व अतिशयित उजेडापासून राखतात. डोळ्यांत आसवें म्हणून एक रस आहे, त्याच्या योगानें त्यांस ओलावा येतो.

डोळ्यांच्या वरतीं भिंवया असतात. भिंवयांवर कपाळ असतें. आपल्या जवळ जें असतें तें डोळ्यांनीं मनुष्य

पाहतो. जें फार दूर नाहीं तेंही तो पाहतो. नाक हें डोळे आणि जेवणी ह्यांच्या मध्यें असतें. नाकास दोन भोकें असतात; त्यांस नाकपुड्या म्हणतात. नाकानें वास समजतो.

जेवणीला दोन ओंठ असतात. हे हालविले असतां हालतात. जेवणीच्या खालीं हनुवटी असती. जेवणीच्या आंत टाळा, जीभ, आणि दांत असतात. दांत हे जाभाडांमध्यें लावलेले असतात; त्यांच्या दोन ओळी एकमेकींशीं लागलेल्या असतात, मनुष्य आपलें खाणें दांतांनीं चावतो. तें खाणें दांतांखालीं जीभ आणती, आणि लाळ त्यास लागलेंच ओलें करिती. मग तें घशांत जातें, तेथून कोठ्यांत उतरतें.

जेवणीमध्यें खाणें असतें तेव्हां जीभ आणि टाळा त्याची चव घेतात. जेवणी ही बोलण्याच्या उपयोगीं पडती. फुप्फुसांतून श्वास निघतो. जेवणी, ओंठ, जीभ, दांत, आणि टाळा ह्यांच्या योगानें वाचा उत्पन्न होती.

नाकानें मनुष्यास वास समजतो. टाळ्यानें चव समजती. कानानें शब्द समजतात. डोळ्यांनीं पदार्थांचा रंग, आकृति, आणि गति, हीं समजतात, आणि त्वचेनें त्यांचा स्पर्श होतो. पदार्थांचे गुण समजण्याचीं जीं हीं साधनें

आहेत त्यांस इंद्रियें असें म्हणतात. त्याप्रमाणें मनुष्यास पांच इंद्रियें असतात, म्हणजे डोळा, नाक, जीभ, कान, आणि त्वचा.



# पाठ ९

## चांगला विद्यार्थी

शाळेचे नियम पाळणें व गुरूची आज्ञा मानणें त्यांवरून चांगला विद्यार्थी ओळखतां येतो. जो चांगला विद्यार्थी असतो तो तीच ती गोष्ट वारंवार आपणास सांगण्याचे श्रम गुरूस देत नसतो. तर गुरूनें अमुक कर, किंवा अमुक म्हण, म्हणून सांगितलें असतां लागलेंच तेंच करितो, किंवा तेंच म्हणतो.

शाळा सुरू होण्याची जी वेळ नेमलेली असती, त्या वेळेस तो नेहमीं हजर असतो. तो गडबड नकरितां आपल्या जाग्यावर बसतो, आणि लागलेंच आपल्या धड्याकडे चित्त लावतो. तो आपणाला किंवा दुसऱ्याला रिझविण्याकरितां आपल्या खिशांतून खेळ काढीत नसतो. खाण्याकरितां त्याच्याजवळ मेवा नसतो, इतकेंच नव्हे तर देण्याक-

रितां मिठाई नसती.

जर त्याच्या कोणी सोबत्यांनीं त्याची दृष्टि किंवा त्याचें मन धड्यावरून काढण्याचा उद्योग केला, तर तो त्यांकडे कान देत नसतो. इतकें झाल्यावरही ते त्यास गमविण्याविषयीं झटूं लागले असतां, तो त्यांस म्हणतो कीं, तुम्ही आपलीं कामें करा, मला असूं द्या. त्याउपरांत जर ते त्यास विघ्न व त्रास देत चालले, तर तो आपल्या व त्यांच्याही कल्याणाकरितां गुरूस सांगतो, अशासाठीं कीं, त्यानें त्यांस दटावून, बुद्धिवादाच्या चार गोष्टी सांगून, त्यांची ती अयोग्य व अनहिताची वर्तणूक बंद करावी.

कोणी परके लोक शाळेंत आले असतां, तो द्वांडगेपणानें टक लावून त्यांच्या तोंडांकडे पाहत नसतो; तर एकटा गुरु असल्याप्रमाणें तो आपल्या धड्याकडे चित्त देतो. त्याच्या वर्गांतील विद्यार्थी जेव्हां वाचतात, किंवा अक्षरें लावतात, किंवा तोंडपाठ केलेला धडा म्हणतात, तेव्हां तो फार सावध असतो, व त्यांचें ऐकून आपला अभ्यास वाढवावयास झटत असतो.

आपला अभ्यास वाढवावा हीच त्याला मोठी इच्छा असती, म्हणून तो कधीं गमत नसतो. गमलें असतां गुरूस समजावयाचें नाहीं, व शिक्षा मिळावयाची नाहीं,

असें जरी असलें, तरी तो गमत नसतो. गुरुजवळ उभा राहिला असतां जसें तो धड्याकडे चित्त देतो, तसेंच गुरु दृष्टिवेगळा गेला असतां देतो. एखादे वेळेस गुरु कांहीं वेळपर्यंत बाहेर गेला, तर इतर गोष्टींमध्यें जसा इमानीपणा दाखवावा तसा त्यामध्येंही दाखवावा, म्हणून त्याच्यानें करवेल तर तो अधिक मेहनत करतो.

प्रतिदिवशीं उपयोगी असें कांहीं नवें शिकावें हें तो इच्छित असतो; आणि पहिल्यापेक्षां अधिक ज्ञान त्यास प्राप्त झाल्यावांचून कधीं दिवस गेला, तर त्यास संतोष वाटत नसतो. कधीं त्याला कठीण धडा तयार करावयासीं मिळाला, किंवा कठीण काम करावयास मिळालें, तरी तो तडफडत नसतो, व कुरकूर करीत नसतो. माझ्यानें हें होईल, आणि हें केल्यानें माझें कल्याण होईल, असें गुरुजीस वाटल्यावांचून त्यांनीं मला दिलें नाहीं, असें तो समजतो. म्हणून तो संतोषानें तें काम करावयास झटून आपणास त्याप्रमाणें धैर्य आणितो; हा कठीण धडा म्यां तयार केला, हें आमचीं आईबापें ऐकतील तेव्हां आनंद पावतील; म्यां मेहनत केली, म्हणून गुरुजीही संतुष्ट होतील; आणि धडा झाला म्हणजे मी ही सुखी आणि समाधानी होईन. जितकें लौकर आणि जितकें मन लावून

मी धडा करावयास बसेन, तितकें लौकर आणि तितका चांगला धडा होईल; अशा कल्पनेनें तो आपणास धैर्य आणितो.

तो वाचतो तेव्हां शब्द इतके स्पष्ट उच्चारतो, कीं ऐकणाऱ्यांस सहज ऐकूं येऊन त्यांचा बोध होतो. त्याची पुस्ती सरेख लिहिलेली असती; बोळे पाडलेले किंवा चिताड केलेली नसती. त्याचे आंकडे वळणदार असतात; त्याचे हिशोब बहुतकरून बिनचूक असतात.

आपण चांगला झालों म्हणजे पुरे, असें त्यास वाटत नसतें, दुसरे चांगले झाले म्हणजेही तो आनंद पावतो. गुरूनें त्याच्या सोबत्यांची स्तुति केली ती ऐकावयास त्यास आवडतें; किंवा गुरूनें त्यांस बक्षिसें दिलीं असतां, तें पहावयास त्यास आवडतें. तो मनांत म्हणतो, म्या जर चांगलें केलें, तर माझी ही स्तुति होईल, आणि मला ही बक्षीस मिळेल; आणि सर्वांनीं जर चांगलें केलें, तर मग काय सांगावें, आमच्या शाळेंत जिकडे तिकडे आनंदच होईल.

ज्या गोष्टींपासून पुस्तकांचें नुकसान व्हावयाचें, त्यांपासून तो आपलीं पुस्तकें फार जपून राखतो. त्याणें आपला धडा केला म्हणजे तो पुस्तकें ठेवावयाचे ठिकाणीं ठेवितो. त्यांस भलत्या ठिकाणीं टाकून, दुसऱ्यांस तीं फेंकून

काडावयास व मळवावयास सांपडूं देत नसतो.

आपण जी विद्या संपादिली, तिचा खरोखरा उपयोग त्या लोकीं व परलोकीं व्हावयास ईश्वराचा आशीर्वाद पाहिजे, असें तो समजतो, म्हणून ईश्वरानें आपणास व सोबत्यांस, व गुरूस आशीर्वाद द्यावा, अशी ईश्वराची प्रार्थना करावयास तो विसरत नसतो.

आतां फार सांगत नाहीं, शेवटली त्याची गोष्ट इतकीच सांगतों कीं, शाळेंत असतां जसा तो चांगल्या रीतीनें वागत असतो, तसा शाळेच्या बाहेर असतांही वागावयास नेहमीं झटत असतो. परमेश्वराची दृष्टि सर्वदा आपणावर आहे; आणि आपला झाडा सर्वांच्या न्यायाधीशाजवळ शेवटीं आपणास द्यावा लागेल, त्या गोष्टीची आठवण तो ठेवीत असतो, म्हणून गुरुजीनें त्याला नीतिज्ञानाचा किंवा धर्माचा जो उपदेश केला, किंवा आपण धर्मपुस्तकांत स्वतां वाचून जो पाहिला, किंवा वाचण्यासाठीं जीं दुसरीं पुस्तकें त्याला कोणी दिलीं त्यांमध्यें जो आढळला, तो सर्वकाळ आचरावयास तत्पर असतो, हा धडा घेऊन सर्व मुलांनीं असेंच वागावें.

# पाठ १०

## राबिननामकपक्षी*.

राबिन ह्या नांवाचा पक्षी लोकांत प्रसिद्ध आहे. त्याचें कपाळ, गळा, आणि ऊर, हीं गहिऱ्या नारंगी रंगाचीं, म्हणजे तांबूस रंगाचीं, असतात. त्याचें डोकें, मान, पाठ, आणि शेपूट, हीं भुरकट रंगाचीं असतात. ह्या रंगांत हिरव्या रंगाची छटा असती, पक्षांचा रंग कांहीं काळसर असतो; त्यांच्या कडा कांहीं पिंवळट असतात. चोंच, तंगड्या, आणि पाय, धूसर रंगाचे असतात.

हें पांखरूं आपलें घरटें कधीं कधीं शेवाळलेल्या बांधाच्या फटीमध्यें करितें, आणि कधीं कधीं निबिड झाडीमध्यें करितें. ह्या पांखराची मादी भुरकट रंगाचीं चार किंवा पांच आंडीं घालिती. त्या आंड्यांवर तांबड्या रंगाच्या रेषा असतात. ह्या पांखरांचीं पिलें फार सुकुमार असतात; आणि तीं आईबापांखेरीज दुसऱ्याचे हातानें बहुतकरून वाढत नसतात.

---

* राबिन नांवाचा पक्षी इंग्लंड देशांत फार लोकप्रिय आहे.

ह्यांचें गाणें फार मंजूळ आणि मधुर असतें. हिंवा ळ्यांत बागांतील दुसरीं गाणारीं पांखरें गात नाहींत, गात असलीं तरीं बेसूर गातात, तेव्हां त्या पांखराचें गाणें ब हुतकरून हिंवाळाभर आपणांस ऐकावयास सांपडतें; म्ह णून त्या गाण्याची किंमत आपण अधिक मानतों.

हिंवाळ्यांत हें पांखरूं फार गरीब होत असतें; आ णि थंडीचा जेव्हां मोठा कडाका पडतो, तेव्हां तर मनुष्यां- च्या घरांमध्यें येण्याविषयीं, व स्वैंपाकघरांत, व बैठकीच्या खोलींत, खाण्याच्या शोधासाठीं उड्या मारीत मारीत ये- ण्याविषयीं, आणि जसें कोणीं म्हणेल कीं, हें घरांतलें आ- हे असें होण्याविषयीं, त्याला भय वाटत नसतें. ह्याला कोणी उपद्रव करील नाहीं, व कोणी धुडकावीत नाहीं; जो तो त्या ला कृपादृष्टीनें पाहतो; हें मुख्यत्वें करून वर सांगितलेल्या कारणावरूनच होतें. जो मुलगा राबिनाला भेडसावील, किंवा उपद्रव देईल, त्याला माझ्यानें चांगलें म्हणवणार ना हीं.

# पाठ ११

## तट्टू उधळला असतां त्यास धरण्याची युक्ति.

गणू म्हणून सोळा वर्षांचा एक मुलगा होता, तो एके दिवशीं आपल्या जरद्या तट्टावर बसून बागेंत गेला होता. तो बागेंत पोंहोंचल्यावर तट्टास एका झाडाशीं बांधून आपण गुलाबाचे वगैरे तक्के चांगले सुंदर फुललेले होते ते पाहावयास गेला. मग चार घटका चमत्कारिक चमत्कारिक रंगाच्या फुलांची शोभा पाहून, व चांगलीं चांगलीं कांहीं फळें खाऊन, तो घरीं जाण्याच्या बेतानें जेथें तट्टू बांधला होता त्या झाडाशीं आला, आणि पाहातो तों झाडाशीं तट्टू नाहीं, तो आपाप सुटून कोणीकडे उधळून गेला होता.

मग कांहीं वेळ इकडे तिकडे शोधून पाहातो तों तट्टू दूर अंतरावर गवतांत स्वस्थ चरतांना त्याच्या दृष्टीस पडला. मग तो त्याजकडे धांवत जाऊन त्याच्या लगामास हात घालावयास गेला; परंतु तट्टास आपण आणखी अमळ मोकळेपणें खुशाल चरावेंसें वाटत होतें, म्हणून गणूजवळ येतांच तो झपूदिशीं वळून त्याजवर मा-

गल्या दुगण्या झाडून झपाट्यानें पळत सुटला.

गणूनें, आपण त्याच्या हातांच्या तडाक्यांत सांपडलों नाहीं, हें मोठें नशीब मानलें; परंतु आतां पुढें काय करावें, तट्टू हातीं लागतो कसा, हा त्यास मोठा विचार पडला. तो असा विवंचनेंत पडला असतां त्यास अकस्मात् आठवलें कीं, मागें एकदां घोडा कुरणांत चरत होता, आणि मोतद्दारास त्यास धरावयाचें होतें, तेव्हां त्यानें कांहीं थोडासा दाणा तोबऱ्यांत घालून त्यापुढें धरिला, आणि तो जवळ येऊन दाणा खाऊं लागतांच त्यानें त्याच्या गळ्यास काढणी लावली.

हें गणूस आठवलें खरें, परंतु त्याजवळ दाणा, तोबरा, काढणी. त्या तिहींपैकीं एकही नव्हतें; मग तो आपल्या मनांत म्हणाला कीं, घोड्यास दाणा आवडतो तसें गवत ही आवडतें; आतां आपल्या जवळ तोबरा नाहीं, त्याजबद्दल आपल्या धोतरांत गवत घ्यावें, म्हणजे काम झालें; काढणी तर मुळींच नको, कां तर तट्टाच्या तोंडांत लगाम आहेच तो आपण पकडला म्हणजे झालें. असा त्यानें विचार करून, कोंवळें कोंवळें चांगलें गवत दाहा पांच मुठी उपटून त्यानें आपल्या धोतरांत घेतलें

तो जेथें गवत उपटीत होता तेथें एक बावा जमीन खणीत होता; तो गणूस म्हणाला, मुला, तूं कशासाठीं गवत उपटून धोतरांत भरतोस बरें? गणूनें उत्तर केलें, माझा तट्टू सुटून गेला आहे, तो हातीं सांपडत नाहीं, त्यास धरण्यासाठीं मी हें गवत उपटून धोतरांत घेतलें आहे.

बावा म्हणाला, तुला इतके श्रम करण्याची गरज नाहीं. तूं जरी रिकामें धोतर त्यापुढें धरिलें, तरी तो जवळ येई तोंपर्यंत त्यास तें रिकामें आहेसें वाटणार नाहीं; मग तो जवळ आल्या म्हणजे तूं त्याचा लगाम धर. गणू बोलला, पण हें त्यास ठकविणें झालें; आणि मी तर कोणास ठकवीत नाहीं; फार तर काय, मुक्या जनावरास देखील मी ठकवीत नाहीं. बावा म्हणाला, भले, शाबास मुला, तूं मोठा प्रामाणिक आहेस. मग गणू आणखी म्हणाला; दुसरी गोष्ट आहे, म्यां जर त्यास आज फसविलें, तर तो कदाचित् पहिल्या वेळेस फसेल, पण तो दुसऱ्या वेळेस माझा विश्वास धरणार नाहीं.

मग गणू त्या बावाशीं असें भाषण करून, कांहीं गवत आपल्या धोतरांत घालून, जेथें त्याचा तट्टू चरत होता तेथें गेला. तें गवत त्याच्या पुढें धरितांच तो त्याजवळ येऊन गवत खाऊं लागला; मग गणू त्याचा लगाम

चटकन् पकडून, त्यावर बसून, त्यास उडवीत उडवीत मोठ्या हर्षानें आपल्या घरीं आला.

त्या गोष्टीचीं दोन तात्पर्यें निघतात. पहिलें, मुलांस लहानपणापासून प्रामाणिकपणा शिकविला असतां, तो त्यांचे मनांत चांगला ठसून त्यांच्या हातून बहुतकरून दगाबाजीचीं कामें घडणार नाहींत. दुसरें तात्पर्य असें कीं, मनुष्यांनीं सर्वकाळ आपला प्रामाणिकपणा राखण्याविषयीं प्रयत्न करावा. प्रामाणिकपणा हा कांचेच्या भांड्यासारिखा आहे. तें जसें एकदां फुटलें, म्हणजे पुनः सांधत नाहीं; तसा एकवार मनुष्य लबाड ठरला, म्हणजे लोक फिरून त्याजवर विश्वास ठेवीत नाहींत.



# पाठ १२

## खरें धैर्य

दोन लहान मुलगे भाऊ भाऊ होते, त्यांच्या एका खेळगड्याचा वाढदिवस आला होता, म्हणून त्याचे घरीं मुलांची चार मंडळी बोलाविली होती; त्यास्तव त्यांस बोलावणें आल्यावरून दोन प्रहरांपासून सायंकाळपर्यंत करमणूक करावी, म्हणून हे दोघे मुलगे त्या आपल्या खेळगड्याच्या घरीं गेले. त्यांच्या आईबापांनीं, आठ वाजतां घरीं परत यावें, म्हणून त्यांस ताकीद केली होती. ते गेले त्या दिवशीं आकाश स्वच्छ होतें; आणि मुलांचा मोठा जमाव त्यांच्या मित्राच्या घरीं मिळाला होता.

मित्राच्या घरीं असण्याच्या वेळाचा पहिला वांटा मुलांनीं घराबाहेर खेळून घालविला; आणि त्यांस तो जो सुखाचा वेळ गेला त्याहून अधिक सुखाचा वेळ कोणत्याही मुलाला कधीं गेला नाहीं. त्यांनीं झाडांला वळया मारल्या; झोल्यांत बसून झोंके घेतले; आणि नाचतां बागडतां, आणि नानाप्रकारचे खेळ खेळतां आनंदाच्या आरोळ्यांनीं तें सर्व ठिकाण त्यांनीं दणाणविलें. पुढें घराबाहेर त्यांस खेळतां येईना

इतका काळोख पडल्यावर, ते घराच्या आंत गेले, आणि दिवाणखान्यांत चांगली रोशनाई केली होती तेथें त्यांनीं नवनवे खेळ मांडले.

मोठ्या बाहारीचा जो आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ त्या खेळाच्या भरांत ते असतां, कोणी आंत येऊन म्हणाला, मेवा मिठाई आतां यावयाची आहे, त्यासाठीं तुम्ही सर्वांनीं अंमळ बसावें. चाकर दार उघडून मेवामिठाईनें भरलेलें तबक घेऊन आंत येत आहे इतक्यांत आठ वाजले.

आठ वाजतां घरीं यावें, म्हणून ज्या मुलांस आईबापांची ताकीद झाली होती, तीं फार खिन्न झालीं. राहण्याविषयीं जो त्यांस मोह झाला त्याचें निवारण करण्यास त्यांस मोठें संकट पडलें. तरी त्या दोघांपैकीं वडिलानें धैर्य धरून आपल्या शेजारच्या मुलाच्या कानांत सांगितलें कीं, मला गेलें पाहिजे. इतकें तो बोलतांच, दिवाणखान्याभर लागलाच गलबला होऊन, जो तो मोठ्यानें निषेध करूं लागला

एकजण बोलला, मला माझी आई म्हणाली, तुला नऊ वाजत तोंपर्यंत बाहेर राहण्याची परवानगी आहे. दुसरा बोलला, माझी आई मला परत घरीं येण्याविषयीं कांहींच बोलली नाहीं; पाहिजे तितका वेळ ती मला बाहेर

राहूं देईल . एक दांडगा मुलगा दूर बसला होता तो म्हणाला , आईनें मला आपल्या कमरेशीं बांधिलें तरी मी घरीं राहावयाचा नाहीं . एक भित्रा मुलगा होता , जो त्या उभयतांच्या घराशेजारीं राहत असे , तो त्यांच्या जवळ येऊन तोंड वेंगाडून बोलला ; अहो , असच्से थांबाना बरें , मी साडे आठ वाजतां घरीं जाणार आहें ; मग आपण बरोबरच घरीं जाऊं ; एकट्यानें अंधारांतून घरीं जाणें मला चांगलें आवडत नाहीं . घरची बाई देखील येऊन म्हणाली ; मुलांनो , तुम्ही असळसे थांबून थोडाशी मेवा मिठाई खाल्ली असतां , तुमची आई तुम्हांला रागें भरेल असें मला वाटत नाहीं .

असें झाल्यावर त्या बापड्या मुलांनीं काय करावें बरें ? सर्वांची इतकी विनवणी त्यांनीं कशी लोटावी बरें ? क्षणभर त्यांनीं राहूं नराहूं केलें , आणि त्या मोहालानें कांहींसे वश झाले , तरी त्यांची सद्गुणाकडची बुद्धि क्षणमात्र ढळती , तों लागलेंच त्यांनीं आपलें संपूर्ण धैर्य धरून म्हटलें . आम्हांला गेलेंच पाहिजे . मग लगबगीनें , जातों हो म्हणून , सर्वांस पुसून , जितकी त्वरा करवली तितकी करून , त्यांनीं आपल्या टोप्या उचलून घेतल्या . त्यांस हें भय पडलें कीं . जर आपण गमलों तर मोहाच्या पाशांत

पडूं. मग झटकन निघून गेले. लखलखीत खिडक्यांकडे व आंतील आनंदी मुलांच्या मंडळीकडे पाहावयास क्षणभर देखील ते उभे राहिले नाहींत. एकमेकाचा हात धरून जितकें त्यांच्यानें लवकर धांववलें तितकें आपल्या घराकडे वाटेनें धांवत गेले.

ते घरीं पोहोंचले तेव्हां त्यांच्या आईबापांनीं हास्य वदन करून त्यांची भेट घेतली. आपला हुकूम मोडण्याविषयीं त्यांस जो मोहाचा प्रसंग पडला होता, तो जेव्हां आईबापांनीं ऐकिला, तेव्हां त्यांनीं मुलांकडे इतके आनंदानें डोळे भरून पाहिलें कीं, त्या पाहण्यानें मुलांच्या मनांतील दुःख दूर झालें. रात्रीं ते मुलगे जेव्हां निजावयास गेले, तेव्हां आम्हीं आपला पुत्रधर्म पाळिला, व आम्हीं आपल्या आईबापांस सुख दिलें, असें त्यांच्या मनांत आलें; आणि आईबापांनीं ज्या वेळेची परवानगी त्यांस दिली होती, त्या वेळेच्या पलिकडे आपल्या सोबत्यांबरोबर राहून जो आनंद त्यांस व्हावयाचा होता, त्याहून अधिक आनंद त्या मनांत आलेल्या गोष्टीनें झाला.

वाचणाऱ्यांनो, त्या लहान मुलांच्या धैर्याचा आणि आपला पुत्रधर्म पाळण्याच्या निश्चयाचा जो हा उत्कृष्ट दाखला त्याचा तुम्हाला आनंद वाटत नाहीं काय? तर

तुम्हीं जाऊन तसेंच करावें, म्हणजे त्यांस जें फळ मिळालें तें तुम्हांस ही मिळेल.



## पाठ १३

## हत्ती

हत्ती हा बळानें व शरीरानें सर्व भूचरांमध्यें श्रेष्ठ आहे; व शहाणपणानें केवळ मनुष्याच्या खालोखाल आहे. हा प्राणी एशियाखंडांत व आफ्रिकाखंडांत उत्पन्न होतो. केपआफगुडहोप येथील हत्तीची उंची बाराफुटांपासून पंधरा फुटांपर्यंत असती.

त्याच्या शरीराच्या मानाप्रमाणें पाहिलें असतां, त्याचे डोळे फारच लहान आहेत; तरी ते चंचळ व पाणीदार असतात. त्याचे कान फार रुंद व लांब असून लोंबत असतात; तरी तो त्यांस श्रम न लागतां उभारतो, आणि पंख्याप्रमाणें त्यांस वापरून त्यांकडून आपणास वारा घेतो, व मुरकुटें किडे वगैरे त्यांनें निवारण करितो. त्याचें कानाचें इंद्रिय तिखट असतें. त्यास वाद्यांच्या नादानें फार आनंद होतो. वाद्यांच्या तालाप्रमाणें तो आपले पाय ठेवायास लवकर शि-

फतो. त्याचें नाकाचें इंद्रिय ही तसेंच तिखट असतें. आणि सुगंधी औषधींच्या वासानें त्यास फार आनंद होतो. त्याच्या दोहों जाभाडांत चार चार दाढा असतात. एकेक दाढ कधीं कधीं नऊ इंच रुंद असती, व साडेचार पौंड वजन भरती. त्याच्या आंगाचें कातडें खरबरीत व सुरकुतलेलें असतें; आणि जुन्या झाडाच्या सालीला जशा खोल भेगा असतात, तशा त्याच्या कातड्याला असतात. त्याचा रंग पिंगट असून त्यांत धुरकट रंगाची छटा मारती.

त्या जनावराचे पाय केवळ जबर खांबच होत. एकेका पायाचा घेर तीन चार फुट असतो, आणि उंची पांच साहा फुट असती. त्याचे तळपाय वाटोळे असतात, व त्यांस पांच पांच बोटें असतात; परंतु वर कातडें असतें ह्यामुळें तीं दिसत नाहींत. त्यांचे अग्रास एकेक खुंभ किंवा नख असतें. तें शिंगाच्या द्रव्याच्या जातीचें असतें. त्याचें शरीर गरगरीत वाटोळें असून लठ्ठ असतें, आणि त्यावर केंस थोडे असतात.

ह्या चतुष्पाद प्राण्याचें फार चमत्कारिक आणि अनन्यसाधारण लक्षण, म्हणजे विशेष लक्षण, म्हटलें तर सोंड होय; सोंड म्हणजे मांसाची एक नळी आहे, ही त्या प्राण्यास वांकवितां, आंखुडतां, लांबवितां, आणि चहूंकडे

पुष्कळ सामान न्यावयाचें असलें, तर त्या कामास हत्ती
चा फार उपयोग पडतो. कारण पडल्यास एका दिवसांत
कांहीं उणें शंभर मैल इतकी मजल हत्तीला करतां ये
आणि मोठा प्रयास नपडतां नित्य नियमानें पन्नास सा
मैलांची मजल तो सहज करितो.

---

## पाठ १४

## मनोराज्य.

अलूनासूकर म्हणून एक मोठा आळशी माणूस हो
त्यानें बाप जिवंत असतां कोणताही धंदा हातीं धरिला
नाहीं. बाप वारला तेव्हां त्यानें शंभर रुपयांचें धन आ
पल्या मुलास ठेविलें.

त्या धनापासून चांगला नफा मिळावा म्हणून त
नें त्याचे सिसे, कुप्या, आणि मातीचीं नामी नामी भांडीं ख
रेदी केलीं. हे दागिनें त्यानें एका मोठ्या पसरट हा-
र्‍यांत एकावर एक रचून ठेविले; आणि एक अगदीं ला
हान दुकान भाड्यानें घेऊन, त्यांत आपल्या पायाजव
ळ तो हारा ठेवून, भिंतीशीं पाठ टेंकून, तो गिन्हाइकाच

वाट पाहात बसला.

अशा प्रकारें तो बसला असतां, व त्याची दृष्टि हाऱ्यावर लागली असतां, त्याच्या मनांत एका मागून एक चमत्कारिक कल्पना येऊं लागल्या. आणि पुढें लिहिल्या प्रमाणें तो आपणाशीं बोलूं लागला; तें एका शेजाऱ्याचे कानावर सहज गेलें.

तो म्हणाला, माझी दौलत काय ती शंभर रुपये, ती ठोक विकरीच्या व्यापाराकडे देऊन त्या हाऱ्यांतील दागिने म्यां खरेदी घेतले. हे फुटकळ विकून मी लवकर शंभराचे दोनशें रुपये करीन. दोनशें रुपयांचे फार वेळ न लागतां चारशें होतील; आणि चारशांचे होतां होतां कालगतीनें सहज चार हजार होतील; व चार हजारांचे आठ हजार खचीत होतील.

त्या रीतीनें मी दहा हजारांचा धनी झालों, म्हणजे कांचेच्या भांड्यांचा धंदा सोडून मी जवाहिऱ्या होईन, आणि हिरे, मोत्यें, व दुसरीं सर्व प्रकारचीं रत्नें, यांचा व्यापार करीन. मला यथेष्ट संपत्ति मिळाल्यावर फार चांगला वाडा पाहून मी विकत घेईन. तसेंच जमिनी, दास, घोडीं, हीं खरेदी करीन. मग मी सुखाचा उपभोग करूं लागेन, आणि लोकांत आपलें नांव गाजवीन.

इतक्यानेंच मी धंदा सोडणार नाहीं. एक लक्ष रुपये गांठीं राहील तोंपर्यंत तो तसाच चालवीन. मी लाख रुपयांचा धनी झालों, म्हणजे राजे लोकांची व माझी बरोबरी सहजच होईल; मग वजिराची मुलगी आपली बायको करण्याकरितां मी सत्तेनें मागेन.

ती राजकन्या घरीं आणल्यावर ती माझा चांगला बोज ठेवील असा उपाय मी करीन. त्याकरितां, तिनें आपल्या खोलींतून बाहेर पडूं नये, अशी मी बंदी करीन. तिच्या भेटीला मी गेलों असतां तेथें थोडीच वेळ राहीन, आणि तिशीं थोडेंच बोलेन.

मग तिच्या दासी येऊन मला विनंती करतील कीं आपल्या अवकृपेमुळें राणीसाहेब फार दुःखांत पडल्या आहेत; तरी मी कठोरपणा सोडणार नाहीं. नंतर तिची आई आपल्या मुलीस घेऊन, मी सुखासनावर बसलों असतां, मजकडे येईल. मग माझी बायको डोळ्यांत पाणी आणून, माझ्या पायां पडून, मजवर कृपादृष्टि करा, अशी प्रार्थना करील. तेव्हां मजविषयीं पूर्ण पूज्यबुद्धि तिच्या मनांत ठसावी, म्हणून मी पाय आंखडून ती कांहीं हातभर लांब जाऊन पडे अशी तिला लात मारीन.

अलनास्कर हा आपल्या मनोराज्यांत अगदीं ग

ढून गेला होता, आणि त्याच्या मनांत जी गोष्ट आली ती करून दाखविल्यावांचून त्याच्यानें राहावलें नाहीं; म्हणून त्यानें आपला पाय झाडला, तों हाऱ्यासलात लागून त्याच्या ऐश्वर्याचा पाया जीं कांचेचीं वगैरे भांडीं तीं सर्व फुटून त्यांचे लक्षशः तुकडे होऊन ते उडून रस्त्यांत जाऊन पडले.

---

## पाठ १५

## पाप पदरीं घ्यावें, आणि घेतलेला माल भरून द्यावा

रावर्ट ह्या नांवाचा मुलगा होता, तो बहुतकरून चांगलें रीतीनें वागत असे; तो कोणे एके दिवशीं तिसरे प्रहराचे सुमारें फार उदासवाणा आणि खिन्न दिसला, म्हणून त्याच्या आईनें त्यास विचारिलें कीं, बेटा, तुला बरें वाटत नाहीं काय? मला बरें वाटतें, असें त्यानें उत्तर केलें, खरें, तरी तो इतकें थोडें बोलला, आणि इतके उसासे टाकिले, कीं त्याला कांहीं तरी झालें आहे, असें त्याची आई समजली.

संध्याकाळीं राबर्ट आपल्या आवडत्या आईचीआ ज्ञा घेऊन आंथरुणावर जाऊन निजला. तो फार चळवळ करीत आहे, व उसासे टाकीत आहे, असें जवळ होते त्यांनी पाहिलें. शेवटीं त्यानें आपल्या बहिणींतून एकीला हाक मारून सांगितलें कीं, आईकडे जाऊन एक वेळ मजकडे येण्याविषयीं तिची प्रार्थना कर; कांकीं, कोणे एके गोष्टीनें मी फार असुखी झालों आहें. ती गोष्ट तिजपाशीं सांगितल्यावांचून मला झोंप येणार नाहीं.

त्याची भली आई तात्काळ त्याजकडे गेली. ती त्याच्या आंथरुणाजवळ जातांच त्यानें आपले चिमुकले हात तिच्या गळ्यांत घातले; आणि त्याला रडें कोसळून तो तिला म्हणाला, माझे आवडते आई, मला क्षमा कर; आज म्यां फार द्वाडपणा केला. म्यां एक लबाडी केली आहे, आणि ती म्यां तुजला सांगितली नाहीं. मी आपल्या भावांशीं गोट्या खेळत होतों, तेव्हां ते खेळतांना कांहीं चुकले. ती चूक त्यांस उमगली नाहीं; त्या चुकीमुळें म्यां डाव जिंतला. जितीचा मला इतका आनंद झाला कीं त्यांची चूक म्यां त्यांस सांगितली नाहीं तेव्हांपासून ती गोष्ट माझ्या मनास लागून मी फार असुखी झालों आहें. मी आपला अपराध तुजपाशीं कबूल करीं, आणि देवलोकांतला

आपला पिता भगवान्, जो हरएक गोष्ट पाहतो व जाणतो, त्यानें मला क्षमा करावी म्हणून म्यां काय करावें, हें तुला पुसें तोंपर्यंत मला झोंपीं जायास भय वाटतें.

त्याची आई म्हणाली, हे माझ्या आवडत्या मुला, जे मनापासून आपल्या अपराधांचा खेद करितात, आणि जें नीट आहे तेंच करण्याचा निश्चय करितात, त्यांस क्षमा करण्याविषयीं भगवान् सर्वकाळ सिद्ध आहे. त्यानें तुझे अपराधांची क्षमा करावी, म्हणून तूं त्याची प्रार्थना कर, आणि तसें काम फिरून तुजकडून घडूं नये, म्हणून जपत जा; नाहीं तर कोण जाणे तुजकडून दुसरा अपराध पहिल्या अपराधापेक्षां मोठा घडेल.

त्या लहान मुलानें आपल्या कृपाळू आईचा उपकार मानून, तिनें जो बुद्धिवाद केला होता त्याचा पुष्कळ विचार केला; आणि भगवानानें आपणास क्षमा करावी, आणि पुढें चांगलें काम करण्याविषयीं त्यानें सुबुद्धि द्यावी, म्हणून त्याची प्रार्थना केली. त्यानंतर त्याला चांगली गोड झोंप लागली; आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं सुखी आणि उल्लासवृत्ति असा निजून उठला.

त्याची व त्याच्या भावांची गांठ पडली तेव्हां त्यांची चूक त्यानें त्यांस कळविली, आणि त्या चुकीच्या साधनानें

आपण डाव जिंकिल्यामुळें आपणास किती दुःख झालें, हेंही त्यांस त्यानें सांगितलें. मग आपला अपराध निस्तरायाचें सांप्रत एवढेंच साधन आहे असें समजून, त्यानें त्या गोट्या अन्यायानें त्यांजपासून जिंकून घेतल्या होत्या त्या त्यांस परत दिल्या.

---

# पाठ १६

## पानचक्कीवाला.

व्हांग ह्या नांवाचा कोणी पानचक्कीचा धनी होता. पेशादर तो जितकी आवड ठेवी, तितकी आवड दुसरा कोणी ठेवीत नसे; आणि पैकेकऱ्यांचा बोज त्याहून कोणी अधिक बाळगीत नसे. मंडळीमध्यें पैकेकऱ्याची गोष्ट कोणीं काढल्यास व्हांग म्हणेकीं, हो, त्याचा माझा चांगला परिचय आहे, फार दिवसांची त्याची माझी ओळख आहे; तो व मी जिवींचे जिवलग आहों, परंतु दरिद्र्याची गोष्ट जर निघाली, तर व्हांग म्हणे, त्याची माझी कांहींच ओळख नाहीं; तो चांगला माणूस असेल, मला कांहीं त्याचें वाईट ठाऊक नाहीं; परंतु बहुतांची ओळख करणें मला आवडत नाहीं; निवडून निवडून सो-

बंन करणें मला आवडतें.

धन मिळविण्याची होस जरी व्हांगास होती, तरी तो दरिद्रीच राहिला. त्याच्या पानचक्कीचे उत्पन्नाशिवाय त्याच्या गुजाऱ्याला दुसरें कांहींच नव्हतें. उत्पन्न थोडें जरी होतें, तरीं रखचीत होतें; पानचक्की शाबूद राहून चापरे तोंपर्यंत त्याला खाण्यापिण्याची काळजी पडायाची नव्हती. तो संसार इतक्या काटकसरीनें करीत असे कीं, खर्च पुरवून दोन पैसे नित्य गांठीं बांधीत असे. हे गांठीं बांधलेले पैसे तो बरखेवर मोजी, आणि डोळेभरून संतोषानें पाही; तरी त्याच्या इच्छेप्रमाणें संग्रह होण्याजोगी प्राप्ति नव्हती. त्याला खाण्यापिण्याची काळजी नसे खरी, परंतु द्रव्यसंपन्न होण्याची इच्छा होती ती सिद्धीस जाईना, हें दुःख मोठें होतें.

एके दिवशीं तो त्या गोष्टीच्या चिंतेंत असतां, त्याला वर्तमान समजलें कीं, त्याच्या कोणी एका शेजाऱ्याला भुईंत पुरलेल्या रुपयांच्या हांड्याचें तीन रात्र लागोपाठ स्वप्न पडून, तो हांडा त्याला सांपडला आहे. हें वर्तमान त्या बिचाऱ्या व्हांगाच्या मनाला कटारीसारखें टोंचलें. तो म्हणाला मी सकाळपासून रात्रपर्यंत दोन चार पसुरड्या मिळविण्याकरितां खस्ता काढीत असतों, आणि हा माझा शेजारी रात्रीं सुखी निजतो, आणि पांहाट झाली नाहीं तों स्वप्नानें हजारों

रुपये मिळविते. अहाहा! त्याच्या सारिखें मला स्वप्न पडावें! पडलें तर किती आनंदानें त्या स्वप्नांतील हांड्याच्या सभोंवतीं मी खणीन! काय चोरगत्तीनें मी घरीं नेईन; माझी बायको देखील मला पाहाणार नाहीं असें मी नेईन. आणि मग कोंपरापर्यंत रुपयांच्या ढिगाऱ्यामध्यें हात खुपशीन, त्यानें मला किती सुख होईल! अशा कल्पनेनें तो पानचक्कीचा धनी अस्वस्थ झाला, एवढेंच तिचें फळ त्यानें आपला पहिला उद्योगीपणा सोडला. थोडक्या मिळकतीचा अगदीं कंटाळा त्याला आला, आणि त्याचें गिऱ्हाईक त्याला सोडूं लागलें.

जसा दिवस आला तशी त्यानें मनांत आकांक्षा धरावी, आणि जशी रात्र आली तसें स्वप्न पडण्यासाठीं त्यानें निजावें. फार दिवसपर्यंत त्याचें दैव निर्दय होतें, तरी शेवटीं त्याच्या संकटाचा कळवळा येऊन तें उगवलेंसें दिसलें, आणि आशा पुरून त्याला स्वप्न पडलें. तें असें कीं, पानचक्कीच्या पायाखालीं एका ठिकाणीं मोहरांनीं आणि हिऱ्यांनीं भरलेला फार मोठा हांडा भुईंत खोल पुरलेला, आणि मोठ्या शिपेनें झांकलेला. असा आहे. पेशाचें स्वप्न पडल्याच्या रीतीप्रमाणें त्यानें आपलें सुभाग्य सर्वांपासून लपविलें, अशा करितां कीं; पुढल्या दोन रात्रीं तें स्वप्न फिरून पडून

त्याच्या खरेपणाविषयीं आपली खातरी व्हावी. त्याविषयीं ही त्याचे इच्छेप्रमाणें घडून आलें. त्याच ठिकाणच्या त्याच हां-ड्याचें स्वप्न त्याला फिरून पडलें, असें तीन दिवस झालें; आतां त्या गोष्टीची भ्रांति राहिली नाहीं, म्हणून तिसऱ्या दि-वशीं फार लवकर उठून कुदळा घेऊन तो एकटा पानच-क्कीकडे गेला; आणि स्वप्नामध्यें ज्या ठिकाणची सूचना झा-ली होती, त्याच ठिकाणीं भिंतीखालीं कुदळ्यानें खणूं ला-गला.

त्याला यश येण्याचा जो पहिला शकुन झाला तो तुटकी मुटी, पुढें आणखी खणतां कोरें आणि धड असें क-ऊलं त्यानें कुदळ्यानें काढलें; नंतर फार खणल्यावर त्याला एक रुंद चीप लागली, एवढी मोठी कीं, तिला काढायास एका मनुष्यानें बळ पुरायाचें नाहीं. त्याला हर्षानें रोमांच येऊन तो आपणाशीं बोलतो, सांपडलें रे सांपडलें! त्या चि-रेखालीं हिऱ्यांचा फारच मोठा हांडा मावेल खरा; आतां मला घरीं जाऊन बायकोला सर्व हकीकत सांगणें भाग आ-हे; आणि चीप उचलण्याची मदत करण्याविषयीं तिला सोबतीस घेतलें पाहिजे. असें म्हणून तो घरीं जाऊन आ-पल्या सुभाग्याचा सर्व मजकूर बायकोला सांगता झाला. त्या प्रसंगीं तिला जो आनंद झाला तो सहज सर्वांच्या म-

नांत येईल. तिनें गळां मिठी मारून हर्षावेशानें त्याचें आलिंगन घेतलें. एकंदर ऐवज किती, हें जाणण्याविषयीं जी त्यांची उत्कंठा होती, ती हा हर्षावेश झाला असतां ही तशीच राहिली, म्हणून तीं दोघें मिळून जेथें ब्हांगानें खणलें होतें त्या जागीं गेलीं; तेथें त्यांला काय सांपडलें? जी ठेव त्यांच्या मनांत होती ती सांपडली नाहीं; तर त्यांचें एकच उपजीविकेचें साधन पानचक्की होती, ती पाया खणल्यामुळें कोसळून पडलेली सांपडली!

---

## पाठ १७

## नित्य समाधानी असण्याचें बीज

इटाली देशांतील कोणी धर्माध्यक्ष नित्य समाधानी आणि आनंदवृत्ति म्हणून प्रसिद्ध असे. तो आपल्या आयुष्याचा प्रवास क्रमीत असतां त्याला कितीएक लोकांकडून बहुत वेळ अडथळा झाला, व त्यास बहुत वेळ संकटें प्राप्त झालीं, तरीं त्यानें कधीं कुरकूर केली, किंवा कधीं शांतवृत्ति सोडली असें कधीं कोणाच्या दृष्टीस पडलें नाहीं.

त्याचा कोणीएक अंतरंग मित्र होता, त्यास त्याच्या सद्गुणाचा मोठा चमत्कार वाटत असे, त्याची वृत्ति पाहून तो मित्र आनंद पावत असे, तरीं, अशी वृत्ति आपणास होणें अशक्य, असेंही तो मनांत मानीत असे.

एके दिवशीं त्यानें धर्माध्यक्षास विचारिलें कीं, नित्यसमाधानी असण्याचें बीज आपल्यानें मला सांगवेल काय? त्या भल्या म्हाताऱ्यानें उत्तर केलें, होय, त्याचें बीज माझ्यानें सांगवेल; तें सांगावयास अगदीं सोपें आहे. मी आपल्या दृष्टीचा चांगला उपयोग करतीं, ह्यांतच सगळें आहे.

त्याच्या मित्रानें म्हटलें, आपल्या बोलण्यांतील भाव मला समजला नाहीं; कृपा करून नीट फोडून सांगा. धर्माध्यक्षानें उत्तर केलें, फार बरें; मी मोठ्या आनंदानें सांगेन. माझी कोणती ही अवस्था असो, प्रथम मी देवलोकाकडे डोळे लावितीं, आणि विचार करतों कीं, त्या लोकांस पोहोंचण्याचें साधन करणें हेंच माझें इहलोकींचें मुख्य काम आहे. मग मी भुईकडे डोळे लावितों, आणि आठवण करितों कीं, माझा प्राण गेल्यावर हींतील थोडीच जागा मला पुरेल. शेवटीं चोहोंकडच्या लोकांकडे डोळे लावतो, आणि पाहतों कीं, माझ्यापेक्षां दुःखी असे पुष्कळ

आहेत. त्या रीतीनें मला त्या तीन गोष्टींचें ज्ञान प्राप्त होतें; म्हणजे खरें सुखाचें स्थान कोणतें, आपलीं सर्व दुःखें संपतात कोठें; आणि कुरकूर करावयाला व गाऱ्हाणें सांगावयाला मला कारण थोडकेंच असतें.



# पाठ १८

## कोणेका मोरेव्यनाचा* प्रामाणिकपणा.

जर्मनी देशांत नुकती लढाई झाली होती, त्या लढाईतील एका स्वारांच्या कपतानास कहीस जाण्याचा हुकूम झाला. तो हुकूम बजाविण्याकरितां सांगितलेल्या ठिकाणास तो आपले स्वार घेऊन गेला.

तें ठिकाण आडवळणीचें एक खोरें होतें; तेथें कोठें कोठें थोडथोडीं झाडें मात्र होतीं, त्यांवांचून दुसरें कांहीं दृष्टीस पडलें नाहीं. पाहतां पाहतां शेवटीं एक खोंपटी त्या कपतानाच्या दृष्टीस पडली.

---

* मोरेव्यन म्हणून ख्रिस्तियनांतील एक भेद आहे.

मग दारास त्यानें ठोंठावल्यावर पांढऱ्या दाढीच्या एका वृद्ध मोरेव्यनानें दार उघडलें. कपतान त्यास म्हणाला बाबा, जेथें आम्हांस दाणा वैरण मिळेल असें शेत दाखीव. म्हाताऱ्यानें उत्तर केलें. दाखवितों. मग आपण त्यांच्या पुढें होऊन त्यानें त्यांस त्या खोऱ्यांतून नेलें.

घटका दीड घटका चालल्यानंतर ते जवाच्या एका चांगल्या शेतास पोहोंचले. कपतान त्या आपल्या म्हाताऱ्या वांटाड्यास म्हणाला. थांबा. आम्हांला पाहिजे तें हेंच. मोरेव्यन त्यानें उत्तर केलें. अमळसा धम धरा. म्हणजे आम्ही तुमची इच्छा पुरवूं.

मग ते पुढें चालते होऊन अर्ध कोसावर जवाच्या दुसऱ्या शेतास जाऊन पोहोंचले. स्वारांनीं शेत कापून घेऊन फिरून घोड्यांवर बसल्यानंतर कपतान त्या म्हाताऱ्यास म्हणाला, बाबा, तां उगीच एथवर आम्हांस कां आणिलें; पहिलें शेत ह्यापेक्षां चांगलें होतें. म्हातारा म्हणाला ती गोष्ट खरी, पण तें शेत माझें नव्हे.

पाहा, वास्तविक ख्रिस्ती सद्गुणाचें हें केवढें अमल उदाहरण! त्या भल्या मोरेव्यन म्हाताऱ्यानें शेजाऱ्याच्या मालाचा खराबा होऊं देण्यापेक्षां आपल्या मालाचा

सरदार बोलला, असें आहे काय? जो रे त्याला वर घेऊन या लागलेंच; त्याच्या बोलीचें अर्धें तंतोतंत त्याला मिळालें पाहिजे. मग हें कृत्य झाल्यावर सरदारानें देवडीवाल्यास बरतरफ केलें, आणि धीवरास मोठें बक्षीस दिलें.



# पाठ २०

## हिरा.

कोणी एक धीवर होता तो म्हणतो, माझी बायको एका माशाचीं आतडीं काढीत होती, त्यांत तिला एक मोठा हिरा सांपडला. तो धुतल्यावर, हा कांचेचा तुकडा आहे, असें ती समजली. त्याच्यापूर्वीं तिनें हिऱ्याचें नांव मात्र ऐकिलें होतें खरें. परंतु हिरा तिनें कधीं पाहिला नव्हता. मग खेळणें म्हणून तो तुकडा तिनें मुलांकडे दिला.

दिवेलागणीपर्यंत तीं मुलें उजेडांत हिऱ्याशीं खेळत होतीं, मग अंधारांत त्याचा उजेड पडतो असें जेव्हां त्यानीं पाहिलें, तेव्हां ती मौज पाहावयासाठीं एकमेकांपासून तो हिसकावून घेऊं लागलीं, आणि असें करतांना

त्यांनीं मोठा गलबला मांडला. मेव्हां, कायरे आहे? म्हणून वडील मुलास मीं हाक मारून विचारिलें; त्यानें सांगितलें, एक कांचचा तुकडा आईनें आम्हांस खेळावयास दिला आहे; आम्ही गाठ दिव्याकडे केली असतां पडसावलींत त्याचा उजेड पडतो.

तो कांचेचा तुकडा मजकडे आण, म्हणून मीं त्यास सांगितलें. मीं तसें करून पाहिल्यावर मला इतका चमत्कार वाटला कीं, हा तुला कोठून मिळाला? असें मीं बायकोस मोठ्या उत्कंठेनें पुसलें. तिनें सांगितलें, मी माशाचीं आंतडीं काढीत असतां त्यांत तो मला सांपडला. मग त्याच्या गुणाची आणखी पारख करावी, असा निश्चय करून, दिवा आड करून ठेव, म्हणून म्यां बायकोस सांगितलें. ज्या वस्तूला आम्ही कांचेचा तुकडा समजत होतों त्या वस्तूनें इतका प्रकाश दिला कीं, निजते वेळेस अंथरूण घालावयास दिव्याची गरज राहिली नाहीं, मग दिव्यास निरोप देऊन त्याचे ऐवजीं उजेड देण्याकरितां तो कांचेचा तुकडा कोनाड्यांत ठेविला.

दुसऱ्या दिवशीं कोणीएक धनिक जोहारी त्याची बायको दैववशात् आमच्या घरीं आली. तिला तो माझ्या बायकोनें दाखविला. तो पाहून माझ्या बायकोस पैरत देतांना

ती म्हणाली, हा कांचेचा तुकडा आहे, असें मला वाटतें, परंतु नेहमींच्या पाहाण्यांतल्या कांचेपेक्षां हा फार सुंदर आहे, आणि त्याच्या जोडीचा तुकडा माझ्या जवळ घरीं आहे, त्या अर्थीं तुम्हीं जर हा विकत द्याल तर मी विकत घेईन. हें ऐकून मुलें रडूं लागलीं, आणि आपलें खेळणें जाऊं देऊं नये म्हणून आपल्या आईच्या गळां पडलीं. त्यांची समजूत करण्या करितां ती म्हणाली, मी खास जाऊं देणार नाहीं.

त्या बाईच्या सब द्यास माझ्या मुलांनीं मोडती घातली, म्हणून ती निघून गेली. जातांना तिनें माझ्या बायकोचे कानांत सांगितलें कीं, हा कांचेचा तुकडा मला मिळेल तर बरें वाटेल. ती आपल्या नवऱ्याकडे धांवत गेली, आणि तिला जी गोष्ट आढळली ती तिनें त्यास सांगितली. त्यानें आपली बायको माझ्याकडे बोलीचाली करावयास परत पाठविली; त्याप्रमाणें ती माझ्या बायकोकडे येऊन, कांचेचा म्हणून म्हटलेल्या तुकड्याच्या वीस मोहरा ये, म्हणून तीस बोलली.

त्या दोघी द्वारापाशीं बोलत असतां मी जेवायाकरितां घरीं आलों, तेव्हां माझ्या बायकोनें मला विचारिलें कीं, जो कांचेचा तुकडा माशाच्या पोटांत मला सांपडला, त्याज बद्दल वीस मोहरा शेजारीण बाई देईन म्हणते, तर तुम्ही वि-

कंत देतों का.? त्यावर मीं कांहीं उत्तर केलें नाहीं.

आपण किंमत लावली ही थोडी, म्हणून हा उत्तर करीत नाहीं, असें ती जोहारीण समजून मला म्हणाली, शेजारी बावा, पन्नास मोहरांनीं जर तुमचा संतोष होईल तर मी पंनास देईन. मी बोललो, अझून फार दूर जावयाचें आहे. ती म्हणाली, बरें तर, शेजारीबावा, मी शंभर देईन. मीं म्हटलें, अझून मजल आटपली नाहीं. तिनें तो कांचेचा तुकडा फिरून घेऊन पाहिला, आणि म्हणाली, बरें बावा, मी त्याच्या पांचशें मोहरा देईन; परंतु इतकें मोल कबूल केल्याबद्दल माझा नवरा रागें भरेल त्यानें मला फार भय वाटतें.

ही नवी किंमत त्या बाईनें लावली, तिजवरून माझ्या मालाच्या किंमतीचा भास मला झाला, आणि मी तिला बोललों कीं, मला एक लाख मोहरा पाहिजेत. रात्रीस जवाहिऱ्या मजकडे येऊन म्हणाला, जो हिरा तुमच्या बायकोनें माझ्या बायकोस दाखविला होता तो मला पाहूंद्या. त्याला तो मी दाखविला. त्या वेळेस काळोख बराच पडला होता, आणि दिवा लागला नव्हता, म्हणून हिऱ्यानें जो उजेड पाडला त्यास पाहून तो तत्काळ समजला कीं, हिऱ्याविषयीं बायकोनें जी गोष्ट सांगितली ती खरीच.

तो फार वेळ हिरा पाहून मोठें कौतुक मानीत राहिला; शेवटीं तो बोलला, शेजारीबाबा, माझी बायको त्या तुकड्या च्या पन्नास हजार मोहरा देईन म्हणून बोलली होती, चला, मी आणखी वीस हजार देईन. मी बोललो, शेजारीबावा, ऐका! तुम्ही आपल्या बायकोस विचाराल तर ती तुम्हांस सांगेल; मीं आपल्या हिऱ्याची किंमत एक लाख मोहरा केली आहे; त्यांतून एक दमडी देखील कमी घेणार नाहीं. मीं कांहीं तरी किंमत उतरावी, त्या आशेनें त्यानें फार वेळ मशीं घासाघीस केली, शेवटीं माझा पक्का निश्चय जाणून त्यानें माझी किंमत कबूल केली.



# पाठ २१

## फिरून करून पाहा

कोणी स्त्री म्हणती, माझा लहान भाचा, गोविंदा, आपला पतंग उडविण्याकरितां त्याला भुईवर फरपटत ओढओढून दमला, आणि त्याचा सारा श्रम व्यर्थ गेला, तेव्हां तो आपल्या वेणूनांवाच्या बहिणीस म्हणाला, अगे ताई, माझ्या पतंगास एकवेळ झोंका देशील कायगे? वेणूनें भलाईनें तो पतंग उचलून घेऊन आकाशीं झोंकून दिला, परंतु त्या झोंकण्यासरशीं धांवण्याची उपेक्षा गोविंदानें केल्यावरून पतंग फिरून भुईवर पडला. हा, हा, पहागे, कशी तूं अडाणी आहेस, असें गोविंदा बोलला. वेणूनें उत्तर केलें कीं, ही केवळ तुझीच चूक आहे.

मी बोलिलें, मुलांनो, फिरून करून पहा. मग वेणूनें आणखी एकवेळ पतंग उचलून घेतला, त्या वेळेस गोविंदा फार उतावळा होता; तो इतका अवचित पळत सुटला कीं, वेणूच्या हातांतून पतंग निसटून जाऊन भुईवर पालथा पडला.

वेणू म्हणाली, आतां कोणाकडे दोष आहे बरें? मी बोललें, फिरून करून पाहा. मग त्यांनीं फिरून पहिल्यापेक्षां अधिक जपून उद्योग केला.

वेणूनें पतंग वर झोंकला, इतक्यांत आडवा वारा येऊन त्याबरोबर जाऊन तो एका झुडपाशीं लागला, आणि तसेंच त्याचें शेंपट झुडपास गुंतून, त्याचा माथा खालीं होऊन, तो लोंबत राहिला.

पहा, आतां त्वां एके बाजूस झोका दिला, त्यानें असें झालें, असें गोविंदा मोठ्यानें म्हणाला. त्याचें उत्तर वेणूनें दिलें कीं, वारा सारखा वाहावा ही माझ्या स्वाधीनची गोष्ट आहेना?

इतक्यांत मी पतंगास हात द्यावयास गेलें, आणि शेपटीचा गुंता काढून तें गुंडाळून घेतलें, आणि म्हणालें, चला मुलांनो, एथें झाडें पुष्कळ आहेत; आपण मैदान जागा पाहूं या, मग तुम्ही फिरून करून पाहा.

तेव्हां आम्हांला लवकरच चांगलें हिरवळीचें मैदान सांपडलें; मग त्याच्या एके बाजूस मी उभी राहिलें. सगळ्या गोष्टींची तयारी झाल्यावर गोविंदा धांवत सुटला, तों म्यां पतंगास वर झोंक दिला; तो विमानाचे डौलानें वर चालला.

तो फार वर जाईल अशी उमेद होती, परंतु पतंग दोरीला फार ओढतो असें समजून गोविंदा वरची मौज पाहण्याकरितां थबकून राहिला, तों दोरी ढिली पडून पतंग गोते खाऊं लागला, आणि वारा फार अनुकूळ नव्हता म्हणून तो फिरून खालीं मैदानावर पडला.

मी बोललें, अरे गोविंदा, तुला थांबून राहावयाचें काम नव्हतें; असो, फिरून करून पाहा.

गोविंदा अंमळसा फुरगुटून म्हणाला, मी फिरून नाहीं करून पाहाणार. फिरून करून पाहाण्याचा उपयोग नाहीं, असें तुम्हांस दिसतेंच आहे. पतंग उडत नाहीं, आणखी नको मला त्याची पीडा.

मीं म्हटलें, छी, छी, माझ्या लहानग्या, आपण दोघांनीं पतंग करण्याचे आणि तो उडविण्याचे इतके श्रम घेतले, आणि आतां तूं खेळ सोडून देतोस काय? दोन चार वेळ उद्योग फसला, म्हणून आपलें धैर्य खचूं नये. चला, तुझी दोरी मी गुंडाळली आहे; आतां फिरून करून पाहा.

त्यानें फिरून करून पाहिलें, आणि त्याचा उद्योग सिद्धीस गेला. कांतर, वाऱ्यास कांहीं ओझें न होतां जसें पांखराचें पीस वर जातें, तसा पतंग वाऱ्या बरोबर वर गेला. सगळी दोरी संपल्यावर गोविंदा काठी बळकट धरून आभा-

त्यांत लहानशा पांढऱ्या ठिपक्याप्रमाणें पतंग दिसत होता तो पाहून मोठा आनंद पावला.

आत्याबाई, आत्याबाई, किती उंच उडतो आहे हा! घोडयांच्या जोताप्रमाणें पतंग ओढ घेत आहे; ह्याची दोरी धरून ठेवण्यास मला फार कठीण पडतें. अर्ध कोश लांबीची दोरी असती तर बरें होतें; माझी खातरी आहे कीं, ती सगळीच संपली असती.

डोळे भरून ती मौज पाहिल्यानंतर लहान गोविंदा हळू हळू पतंगाची दोरी गुंडाळूं लागला, आणि पतंग पडल्यावर मोठ्या उत्साहानें तो उचलून म्हणाला, ह्याला कांहीं धक्का लागला नाहीं; हा फार चांगला उडाला. तो मला म्हणाला, आत्याबाई उद्यां आमचा धडा झाल्यावर आपण बाहेर येऊं ना? आणि फिरून करून पाहूं ना?

मी म्हणालें, माझ्या लाडक्या, पाऊस नसला तर मी खुशीनें येईन. आतां आजच्या खेळापासून तूं काय शिकलास, हें आपण घराकडे जात असतां मला सांग.

गोविंदा म्हणाला, मी आपला पतंग चांगल्या रीतीनें उडविण्यास शिकलों. वेणू म्हणाली, दादा, ह्या गोष्टी विषयीं तूं आत्याबाईचा ऋणी आहेस, कां तर फिरून करून पाहण्याविषयीं जर तिनें तुला समजावलें नसतें, तर

त्यां खेळ केव्हांच टाकून दिला असता.

मी म्हणालें. होय, माझ्या प्रियमुलांनो, केवळ पतंग उडविणें इतकेंच जरी काम असलें, तरी दृढ निश्चयाचा मोठा उपयोग आहे, हें तुम्हांस शिकविण्याची माझी इच्छा आहे. चांगलें काम करण्याविषयीं जर तुमचे उद्योग कधीं फसले, तर, फिरून करून पाहा हें वाक्य तुमच्या ध्यानांत असावें.



## पाठ २२

## खोटें बोलणारा मुलगा आणि खरें बोलणारा मुलगा ह्यांचा भेद.

राबर्ट नांवाचा मुलगा त्याचा धाकटा भाऊ फ्रांक त्यास म्हणतो, आपला म्हातारा कुतरा झोंप लागून चुली जवळ पडला आहे, चल, आपण जाऊन त्यास जागें करूं, म्हणजे तो आपणांबरोबर खेळेल. फ्रांक म्हणाला, हो हो; फार चांगली गोष्ट; चल, तसेंच करूं. मग ते दोघे कुत्र्यास जागें करण्याकरितां चुलीकडे बरोबर धांवत गेले. त्या चु-

लीपुढें दुधाचें मडकें ठवलेलें होतें, तें कोठें होतें हें त्या- लहान मुलांच्या दृष्टीस पडलें नाहीं. ते दोघे त्या कुतऱ्याशीं खेळत असतां, त्यांचे पाय त्या मडक्यास लागून तें खालीं लवंडून फुटलें, व त्यांतील दूध वाहून गेलें.

आपल्या हातानें जें कृत्य झालें तें पाहून त्या लहान मुलांस फार खेद झाला, आणि भय ही फार झालें. कांहीं वेळ तीं मुलें स्तब्ध राहिल्यावर राबर्ट पहिल्यानें बोलला; तो सुसकारा टाकून म्हणाला, आतां आपणांस रात्रीं जेवणास दूध मिळावयाचें नाहीं! फ्रांक बोलला, रात्रीं जेवणास दूध मिळावयाचें नाहीं! कां नाहीं? घरांत दूध नाहीं काय?

राबर्ट म्हणाला, होय, दूध आहे; पण त्यांतील एक थेंब देखील आपणांस मिळावयाचा नाहीं. तुला आठवत नाहीं काय? मागल्या सोमवारीं आपण दूध सांडलें, तेव्हां आई म्हणाली होती कीं, तुम्ही फार गाफील आहां; असें पुन्हा कराल तर तुम्हांस रात्रीच्या जेवणास दूध मिळणार नाहीं.

फ्रांक बोलला, बरें तर, आज दुधावांचून आपणांस जेवलें पाहिजे, इतकेंच काय तें ना? दुसऱ्या वेळेस आपण अधिक जपूं; चल, आपण धांवत जाऊन ही गोष्ट आईला सांगूं; कांकीं, तुमच्या हातून कधीं कांहीं फुटलें मोडलें, तर

लागलेंच येऊन मला कळवा, अशी आपणांस ताकीद आईनें दिली आहे, हें तुला माहीत आहेना? राबर्ट म्हणाला, होय, थांब, येतों; पण इतकी घाई करूं नको; तुझ्यानें एक क्षणभर थांबवत नाहीं काय? राबर्ट असें बोलल्यावर फ्रांक असमळ थांबून म्हणतो, चल आतां, राबर्टा. राबर्टानें उत्तर केलें, आणखी असमळ थांब, अझून मला जाण्याची धमक आली नाहीं; मला भय वाटलें आहे.

लहांन मुलांनो! तुम्हांस माझा बुद्धिवाद आहे कीं, खरें वर्तमान सांगण्यास कधीं भिऊं नका; क्षणभर थांबा, आणखी असमळ थांबा, असें कधीं बोलूं नका; परंतु जें कांय तुम्हीं वाईट केलें तें तत्काळ जाऊन सांगा. जों जों तुम्ही अधिक थांबाल, तों तों तुमचें भय वाढत जाईल; इथवर कीं, शेवटीं खरी गोष्ट सांगायास, कोण जाणे, तुम्हांस अगदीं धैर्य राहणार नाहीं. राबर्टाची काय गोष्ट झाली एका.

जों जों राबर्ट अधिक थांबत गेला, तों तों, आपण दूध सांडलें, हें आईस जाऊन सांगण्याविषयीं त्याचें मन पराङ्मुख झालें. शेवटीं, त्याला सोडून आईचा शोध करावयास फ्रांक निघून गेला. फ्रांक निघून गेल्यावर राबर्ट एकटाच खोलीमध्यें होता. जोंपर्यंत तो एकटा होता तोंपर्यंत आईस बाहाणें सांगण्याच्या योजनेंत होता. तो आपल्या

मनांत म्हणाला, आम्हीं मडके लवंडलें नाहीं, असें जर फ्रां-
क आणि मी दोघे बोललों, तर ती आमचें बोलणें खरें मा-
नील, आणि रात्रीं जेवणास दूधही मिळेल. तिला सांगण्या-
करितां जाण्याचा आग्रह फ्रांकानें धरिला, हें मला फार
वाईट वाटतें. असें तो आपल्या मनांत म्हणत आहे, तों
इतक्यांत त्याची आई जिना उतरून खालीं येतांना ति-
चीं पावलें त्यानें ऐकिलीं.

तो मनांत म्हणाला, हां, असें काय? तर ह्यावरून
फ्रांक आईला भेटला नाहीं; आणि दूध सांडल्याची गोष्ट
त्यानें सांगितली नाहीं; तर आतां पाहिजे तसें मला आई
स सांगतां येईल. मग ह्या भितऱ्या पोरानें आपल्या आ-
ईस खोटी गोष्ट सांगण्याचा निश्चय केला.

आई खोलींत आली, आणि फुटलेलें मडकें व सां-
डलेलें दूध पाहून एकाएकीं थबकून म्हणाली, कायरे,
राबर्टा, हें कोणाचें कृत्य? राबर्ट हळूच उत्तर करतो, बया,
मला ठाऊक नाहीं. आई म्हणती, ठाऊक नाहीं म्हणून म्हण
तोस, राबर्टा? खरें सांग; मी तुजवर रागें भरणार नाहीं. मा
झीं जितकीं मडकीं आहेत तितकीं सारीं त्वां फोडावीं, हें
मला पुरवेल, पण त्वां एक गोष्ट खोटी सांगावी, हें मला पु-
रवणार नाहीं; आतां मी तुला निक्षून विचारतें, राबर्टा,

तुजकडून मडकें फुटलें कीं नाहीं ?

रावर्ट म्हणाला, बया, मजकडून फुटलें नाहीं. असें म्हणतांच त्याची मुखश्री पालटली. आई म्हणाली बरें तर, फ्रांक कोठें आहे ? त्याजपासून फुटले काय ? राबर्टानें उत्तर केलें, नाहीं, बया, त्याजकडूनही फुटलें नाहीं. तो असें बोलला त्याचें कारण, कीं फ्रांकआला म्हणजे, म्यां केलें नाहीं, असें त्याजकडून सांगविण्याविषयीं त्याचें मन वंळवून घेऊं, अशी त्यास आशा होती

आई फिरून बोलली, फ्रांकापासून फुटलें नाहीं, हें कशावरून तुला माहीत आहे ? लबाड लोक आपल्यां मनांत बहाणा रचनें वेळेस जसे घुटमळतात तसा घुटमळून राबर्ट बोलतो, का का का कारण कीं, मीं सारावेळ खोलींत बसलों आहें. त्याला मडकें फोडतां मीं पाहिलें नाहीं. मग आई बोलली, तर दुधाणें कशानें सांडलें ? जर तूं सारा वेळ खोलींत बसला आहेस, तर हें तुला सांगतां यावें.

मग राबर्ट एका लबाडीकडून दुसऱ्या लबाडीकडे सरून बोलतो, हें कुतऱ्यानें सांडलें असावें. आईनें विचारिलें, त्यानें सांडतांना त्वां पाहिलें काय ? मग त्या दुष्ट पोरानें उत्तर दिलें, होय, म्यां पाहिलें. मग कुतऱ्याकडे

वळून आई म्हणाली, छी, छी, वस्ती कुतऱ्या, छी, हें काय! राबर्टा, बागेंत जाऊन एक शिपटी घेऊन ये; त्या बद्दल त्याला मार दिला पाहिजे.

राबर्ट शिपटी आणावयास धांवत निघून गेला, तिकडे बागांत त्याच्या भावाची गांठ पडून त्यानें त्यास थांबवून आईस जें आपण सांगितलें होतें तें त्यास मोठ्या घाईनें कळविलें; आणि तूं खरें सांगूं नको, मीं जसें सांगितलें तसेंच तूं सांग, अशी त्याची प्रार्थना केली, फ्रांक बोलला, नाहीं, नाहीं, मी कधीं खोटें बोलणार नाहीं; आणि वस्तीला मार बसणार काय? त्यानें दूध सांडलें नाहीं, आणि त्याबद्दल मी त्याला मार बसूं देणार नाहीं; मला आईकडे जाऊंदे. मग ते दोघे घराकडे धांवत गेले. राबर्ट पुढे जाऊन पोहोंचला; आणि फ्रांकानें आंत येऊं नये, म्हणून दाराला आंतून त्यानें कडी लावली. राबर्टानें आईजवळ शिपटी दिली. बिचारा वस्ती! त्याच्या डोक्यावर तिनें शिपटी उगारली तेव्हां त्यानें वर डोळा केला; परंतु खरें वर्तमान काय तें सांगण्याची त्याला शक्ति नव्हती.

शिपटीचा तडाखा त्यावर बसावा इतक्यांत खिडकीजवळ फ्रांकाचा शब्द ऐकूं आला जेवढ्या मोठ्यानें

त्याला ओरडवलें तेव्हां धोरल्यानें तो ओरडून बोलला, आई! आई! नया! थांब, थांब, त्रस्तीनें तें काम केलें ना-हीं. मी आणि राबर्ट ह्या आम्हीं उभयतांनीं केलें; तरी राब-र्टाला तूं मारूं नको. इतक्यांत, दार उघड, दार उघड, असा दुसऱ्याचा शब्द ऐकूं आला.

हा शब्द आपल्या बापाचा आहे म्हणून राबर्टानें ओळखिला; कांकीं जेव्हां जेव्हां तो लबाड बोले तेव्हां तेव्हां त्याचा बाप नेहमीं त्यास मारीत असे. त्याच्या आ-ईनें झटकर दारापाशीं जाऊन कडी काढली. बाप आंत ये ताक्षणीं म्हणतो, हा काय गोंधळ आहे? मग आईनें झालेलें वर्तमान सर्व त्यास निवेदिलें. बापानें तिला वि-चारिलें, ज्या शिपटीनें तूं त्रस्तीस मारणार होतीस, ती को-ठें आहे?

मग राबर्ट आपल्या बापाच्या मुद्रेवरून हा मला मारतो, असें पाहून त्याच्या पायां पडला, आणि काकळूत केली कीं, बाबा, ह्यावेळेस मला क्षमा करा; फिरून मी क-धीं खोटें बोलणार नाहीं. बाप त्याचा दंड धरून म्हणाला, आतां मी तुला मारतों, मग तूं पुढें खोटें बोलणार नाहीं-स, अशी आशा धरतों. असें म्हणून त्यानें राबर्टास इतकें सडकलें कीं, माराच्या वेदनेनें जी ओरड त्यानें केली ती

शेजारच्या पाजारच्या लोकांस ऐकूं गेली.

मग मारतां राहिल्यावर बाप त्यास म्हणाला, जा पोरा, आतां रात्रीचा उपाशीं ऐस. तुला जेवणाला दूध मिळावयाचें नाहीं, आणि तुला मारही बसला. पहा, लबाड लोकांची कशी वाट होती ती? मग फ्रांकाकडे बघून म्हणतो, फ्रांका, ये, माझा हात धर; तुला रात्रीं जेवणाला दूध मिळावयाचें नाहीं खरें; पण त्याची काय चिंता? तूं खरें बोललास, तुला मार बसला नाही; तुजवर सर्व लोकांची प्रीति आहे. आतां मी तुजकरितां काय करणार, हें सांगतों. हा चिमकुला त्रस्ती कुतरा तुला देतों; हा पुढें तुझाच कुतरा. त्याला मारापासून त्वां वांचविलें, आणि माझी खातरी आहे कीं, तूं त्याला चांगला धनी होशील. उद्यां मी तांबटाचे दुकानीं जाऊन त्यासाठीं एक तोक आणून देतों. आजपासून त्यास तुझें नांव ठेविलें; त्याला सर्व लोक फ्रांक असें म्हणतील. मग बायकोस म्हणतो, शेजाऱ्या पाजाऱ्यांच्या मुलांपैकीं कोणीं येऊन तुला विचारलें कीं, त्रस्ती कुतऱ्यास फ्रांक कां म्हणतां? तर तूं त्यांस ही आपल्या दोन मुलांची गोष्ट सांग, आणि खरें बोलणारा मुलगा आणि खोटें बोलणारा मुलगा ह्यांचा भेद त्यांस समजूं दे.

# पाठ २३

## वेळ लवकर जाण्याचा उपाय

एके शहरांत धोंडोपंत म्हणून श्रीमंत गृहस्थ राहात असे. त्यास दोन मुली व एक मुलगा अशीं तीन मुलें होतीं. त्यांतील धाकट्या मुलीचें नांव सखी, व थोरल्या मुलीचें नांव गोदावरी, व मुलाचें नांव विश्वनाथ, अशीं होतीं. एके दिवशीं दाहा वाजतां जेवणें खाणें आटपल्यावर धोंडोपंताची स्त्री, यमुनाबाई, आपल्या मुलींस घेऊन एका खोलींत बसली होती; त्या खोलींत एका जाळीदार फडताळांत एक मोठें घड्याळ होतें; त्या फडताळाजवळ यमुनाबाई शिवीत बसली होती, व गोदावरी तिच्या शेजारीं आपल्या चोळीवर कशीदा काढीत होती, व तेथें सखी हातांत एक वाळूचें घड्याळ घेऊन त्यांतील वाळू पडत होती तिजकडे पाहात बसली होती. तेव्हां सखी आपल्या आईस म्हणती, आई, तूं शिवण्याच्या कामांत फार गुंतली आहेस, नाहीं बरें, बये? पण, बये, मजकरितां आणखी एक वेळ मागें पाहून जाळींतल्या त्या घड्याळांत

किती वाजले ते मला सांग बरें.

आई— सखू, त्या एका तासांत तुजकरितां मी चारदां घड्याळ पाहिलें, आतां बराबर बारा वाजले आहे

सखी— बंय, बाराच सोरे! मला वाटलें होतें कीं, हें व ळूचें घड्याळ चुकलें आहे. मघांशीं मीं जेव्हां हें वा चें घड्याळ उलटलें, व जेव्हां त्वां मला सांगितलें कीं आतां अकरा वाजले, तेव्हांपासून आतांपर्यंत म्हटले म्हणजे एका तासापेक्षां फार अधिक वेळ खर्चीत झा ला असावा. अबब! केवढा मोठा तरी हा तास, गे बरे कायगे गोदूताई, तुला मी म्हणतें असें वाटत नाहीं बरें

गोदावरी— (खालीं पाहून कशीदा काढीत होती ती वर पाहून म्हणती.) सखू मला तर वाटलें कीं, हा तास फार च लहान गेला. आई आतां म्हणाली कीं, बारा वाजले हें ऐकून मला मोठा अचंबा वाटला. इतक्यांत एक स गळा तास झाला काय!

सखी— ताई, तूं कशीदा काढण्याच्या कामांत अगदीं गढून गेली होतीस, म्हणून तुला असें वाटतें. मी मघां-पासून एकसारखी ह्या घड्याळांतल्या वाळूकडे टक ला वून बसलें आहें, त्यापक्षीं तास मोठा किंवा लहान हें तुजपेक्षां मला चांगलें ठाऊक आहे. एवढा मोठा तास

माझ्या जन्मांत गेलेला मला आठवत नाहीं.

**आई** — सखू, तास म्हटला तर तुझा आणि गोदूचा एकच, पण हें कसें, कीं एकीस तो तास मोठा वाटतो, व एकीस तोच लहान वाटतो?

**सखी** — मी केव्हांची आतां एक वाजेल, मग एक वाजेल अशी इच्छा करीत एकसारखी वाळूकडे नजर लावून बसलें आहें; कांकीं, एक वाजल्यावर तुला चित्रें दाखवीन, असें दादानें मला वचन दिलें आहे; व मला बाबांचें ही सांगणें असें आहे कीं, मी एक वाजेतों पर्यंत विसूस लिहिणें शिकवितों आहें, तोंपर्यंत तूं इकडे येऊं नको, व्हावें तर मग ये; म्हणून मी एक वाजण्याची वाट पाहात बसलें आहें. आतां आणखी एक दुसरा सगळा मोठा तास मला वाट पाहात बसलें पाहिजे.

(असें म्हणून ती आळसानें हातपाय पसरून जांभया देऊं लागली.)

**आई** — सखे, तास मोठा कां म्हणतेस? तो मोठा करणें किंवा लहान करणें हें तुझ्या हातीं आहे. तूं करशील तसा होईल.

**सखी** — बये, मीं काय करावें, म्हणजे तास लहान होईल? होय, गडे, मी आपली आतां हें वाळूचें घड्या-

हालवीत असतें, म्हणजे वाळू अमळ जलद पडू तास लवकर जाईल, नाहीं बरें, बये? (असें म्हणून तीतें घड्याळ हालवूं लागली.)

आई — तास लवकर जाण्यास तुला त्यावेगळें दुसरें कांहीं करतां येत नाहीं, कां सखे? तुजपेक्षां गोदू हा तास लहान वाटण्याचें कारण त्वां मला आतां तुकतेंच सांगितलें.

सखी — होय बये, मीं सांगितलें, कीं ती काम करीत होती म्हणून तिला तसें वाटलें. पण बये, गोदूताई जसा कशीदा काढीत आहे तसा मला कोठें काढतां येतो आहे?

आई — काय सखे, कशीदा काढण्यावांचून माणसांस दुसरा कांहीं उद्योगच नाहीं काय? मी काम करीत आहें, मी कोठें कशीदा काढतें आहें?

सखी — बरें तर, बये, त्वां मला काल एका रेशमाच्या गुंडीची गुंतागुंत काढायास सांगितलें होतें; त्यामानें हा तास कदाचित् लहान वाटला तर वाटेल नाहीं बरें बये?

आई — सखे, आतां उगीच बोलूं नको; हातानें तें काम करून पहा, म्हणजे तुला समजेल.

मग सखी आपल्या मांगशींतून तें रेशीम काढून त्याची गुंतागुंत काढूं लागली. त्या रेशिमाची फार गुंतागुंत झाली होती, म्हणून ती काढण्यांत सखीचें अंतःकरण अगदीं गर्क होऊन गेलें. मग तिनें त्या रेशिमाची सर्व गुंतागुंत काढून त्याची चांगली गुंडी करून, ही घे. बये, असें म्हणून ती आपल्या आईपुढें ठेविली. मग ती आईस म्हणती, बये, इतकी गुंतागुंत काढण्यांत मीं पांचरां सारी तोडातोड केली. अधिक केली नाहीं; आणि मला वाटतें कीं, मी गुंतागुंत काढूं लागल्यापासून फारसा वेळ झाला नाहीं. झाला काय बये?

आई—अर्ध्या तासावर झाला नाहीं. अर्धा तास मात्र झाला.

सखी— काय बये, अर्धा तास! ही गुंतागुंत काढूं लागण्याच्या आधीं मी तुझ्याशीं शेवटीं बोललें तेव्हां पासून इतक्याशा वेळांत अर्धा तास लोटला काय? बये, हें मला खरें वाटत नाहीं. असें बोलून ती वळून आपल्या वाळूंच्या घड्याळाकडे पाहूं लागली, आणि त्याच्या खालच्या कुपींत अर्ध्या वाळूचा ढीग पाहून तिला मोठा विस्मय झाला; आणि ती आईस म्हणते, बये, हा अर्धा तास फारच लवकर गेला. कांहीं उद्योग करीत असलें

म्हणजे वेळ लवकर जातो म्हणून जें त्वां सांगितलें तें खरें, बंधू. मला तर रेशिमाची गुंतागुंत काढण्याचें काम फारसें आवडत नाहीं, तरी तें करीत असतां वेळ किती लवकर गेला! मला जें काम आवडतें तें जर मी करीत बसलें, तर हा उरलेला अर्धा तास त्यापेक्षांही लवकर जाईल, अशी माझी पक्की खातरी आहे.

---

## पाठ २४

## म्हातारा मनुष्य आणि त्याचा गाढव.

कोणी एक म्हातारा मनुष्य व त्याचा मुलगा हे दोघे आपला गाढव बाजारांत विकण्याकरितां हांकून नेत असतां, रस्त्यावरील कोणी गृहस्थ बोलला, काय हो, हा मनुष्य केवढा मूर्ख आहे! आपल्या गाढवास ओझें न व्हावें म्हणून आपण आपल्या मुलासहवर्तमान पायीं चालून थकून जात आहे! हें ऐकून म्हाताऱ्यानें आपल्या मुलास गाढवावर बसविलें, आणि आपण शीळ वाजवीत त्याच्या बाजूनें चालला.

दुसरा कोणी गृहस्थ त्या मुलाला म्हणतो, कायरे, लुच्चा, विचारा म्हातारा तुझा बाप पायीं चालत असतां त्वां गाढवावर बसावें, हें चांगलें काय? हें ऐकतांच तो म्हातारा मुलास खालीं उतरून आपण वर बसला. तिसरा म्हणाला, पाहा हो, बापडा लहान मुलगा चालतां चालतां थकला असतां, हा आळशी थेरडा कसा मौजेनें वर बसून चालला आहे! हें ऐकतांच म्हाताऱ्यानें आपला मुलगा आपल्या पाठीमागें बसवून घेतला.

चवथा म्हणाला, काय बाबा, हा गाढव तुमचाच खुद्द आहे काय? म्हातारा म्हणाला, होय. त्या गृहस्थानें उत्तर केलें कीं, तुम्ही निर्दयपणानें हा असा लादला आहे, त्यावरून हा गाढव तुमचा आहे असें कोणास वाटावयाचें नाहीं. त्यानें तुम्हां दोघांस वाहून न्यावें त्यापेक्षां तुम्हा दोघांच्यानें त्यास सहज वाहून नेववेल. म्हातारा म्हणाला, बरें, तुमच्या मर्जीसाठीं तसें का होईना? असें म्हणून तो आणि त्याचा मुलगा हे उभयतां खालीं उतरून, त्या गाढवाचे चाऱ्ही पाय एकत्र बांधून, मध्यें वांसा घालून, त्यास खांद्यावर घेऊन, ज्या पुलावरून शहरांत जाण्याचा रस्ता होता त्या पुलावरून घेऊन चालले.

ही इतकी चमत्कारिक गोष्ट झाली कीं ती पाहाव-

यास लोकांचे थवेचे थवे धांवले. शेवटीं धन्याचा अति कृपाळूपणा त्या गाढवास न आवडून तो मोकळा होण्याकरितां आपले पाय झाडूं लागला असतां, ज्या दोऱ्यांनीं त्याचे पाय बांधले होते त्या दोऱ्या तुटून तो बांशापासून निसटला, आणि खालीं नदींत पडून बुडून मेला. बापडा म्हातारा, त्यानें ज्याला त्याला संतुष्ट करण्याकरितां जे प्रयत्न केले त्यांनीं कोणास संतोष झाला नाहीं; त्याला मात्र श्रम पडले; वरता गाढवही गेला; ह्यावरून तो फारच लाज आणि खेद पावून तडक आपल्या घराकडे चालता झाला.

# पाठ २५

## गोल्डफिंच

गोल्डफिंच म्हणून पांखरांत एक जात आहे. त्या जातीचीं पांखरें, त्यांच्या गरीबपणावरून व त्यांच्या स्वरांच्या मधुरपणावरून, लोकांच्या आवडींतलीं आहेत. फळबागांत राहणें त्यांस फार आवडतें; आणि तीं आपलीं सुंदर घरटीं शेवाळीनें बहुतकरून आपल + नांवाच्या फळझाडांवर किंवा पेरनांवाच्या फळझाडांवर बांधितात. एप्रिल महिन्यांत फळझाडें फुललेलीं असतात, त्यावेळीं तीं आपलीं घरटीं बांधण्याच्या कामाचा आरंभ करितात. त्यांचीं घरटीं लहान असतात. घरट्याचें बाहेरचें आंग तीं बारीक शेवाळ व दुसरे मऊ मऊ पदार्थ एकमेकांत विणून त्याचें करितात. आंतून गवत, घोड्याचे केस, मेंढ्यांची लोंकर, पांखरांचीं पिसें, व लव, हीं लावतात. घरट्यांत आंडीं पांचच घालतात. आंड्याचा रंग पांढरा असून वर पिंगट रंगाचे टिपके व रेघा असतात.

---

+ आपल व पेर ह्या नांवांचीं फळें युरोपखंडांत फार प्रसिद्ध आहेत.

हीं पांखरें पाहिजेल त्या ऋतूंत झाडांस चिकटा लावून, किंवा जाळें बांधून, पुष्कळ धरितां येतात. तरी त्यांस धरण्याचा चांगला समय म्हटला असतां सप्तंबर महिन्याचे अखेरीस, म्हणजे विषुवसंक्रांतीचे सुमारें आहे, असें म्हटलें आहे. हीं पांखरें लौकर माणसाळतात; आणि कवाइतींचीं कितीएक कृत्यें हुबेहुब करावयास, व फटाकडे उडवावयास, व आपल्या खाण्यापिण्याचे भरलेले पेले वर ओढून घ्यावयास, त्यांस शिकविण्याविषयीं फार श्रम लागत नाहीं.

कांहीं वर्षांपूर्वीं रोमननामें साहिबानें आपल्या पांखरांचे चमत्कारिक खेळ इंग्लंडदेशांत प्रसिद्धपणें दाखविले. त्याच्या जवळ गोल्डफिंच, लिनिट्, व कनेरीबर्ड, अशीं तीन जातींचीं पाखरें होतीं. एकानें मेल्याचें सोंग घेतलें; आणि त्याचें शेपूट किंवा नख धरून त्यास कोणीं उचललें असतांही जिवंतपणाचें लक्षण त्यानें कांहींच दाखविलें नाहीं. दुसरें पांखरूं पाय वर करून डोईवर उभें राहिलें. तिसरें पांखरूं त्यानें आपल्या खांद्यावर दुधाचीं भांडीं घेऊन हालंडदेशाची दूधवाली दूध घेऊन बाजारांत जाती तिची नक्कल केली. चौथ्यानें वेनिस एथील मुलगी आपल्या खिडकींतून डोकावून पाहात आहे अशी तिची नक्कल केली.

पांचवें पांखरूं शिपायाचें सोंग घेऊन चौकीवर येऊन पाहारा करूं लागलें. साहाव्यानें गोलंदाजाचें सोंग घेऊन, डोकीस टोपी घालून, खांद्यावर बंदूक घेऊन, बोटांत तो-डा धरून, एक लहानशी तोफ डागली. त्याच पांखरानें आ-पणास जखम लागलीशी दाखविली; मग लहानशा एक चाकी गाडींत त्यास घालून कोणी इस्पितळाकडे नेण्याचा बहाणा करतांच तें सर्व देखत उडून गेलें. सातव्यानें एक प्रकारची पवनचक्की फिरविली. शेवटलें पांखरूं हें भोंवतालीं लोक दारूकाम उडवीत असतां आपण मध्यें राहून भ्याल्याचें चिन्ह कांहींच दाखविलें नाहीं.

गोल्डफिंच एकटा असतो तेव्हां आरशांत आपलें प्रतिबिंब पाहाण्यास त्यास फार आवडतें; कांतर आ-पल्या जातीचें दुसरें पांखरूं दृष्टीस पडतें, असें त्यास वाटत असेल. बहुतांनी पाहिलें आहे कीं, गोल्डफिंच आंबाडीचें बीं वेंचून आपण तेथें दुसऱ्याचे पंक्तीनें खा-तों असें मानून तें बीं आरशाजवळ नेऊन खातो; त्या-वरून असें दिसतें कीं, जशी भूक, तशी तहान, तशी सोबतीची आवड त्यास आहे.

कनेरीवर्ड, वूडलार्क, किंवा दुसरें कोणी नर गा-णारें पांखरूं त्याच्या जवळ तरणा गोल्डफिंच ठेविला असतां

हा त्याचें गाणें लवकर घेतो. आल्डबिन् नामें कोणी ग्रंथकर्ता त्यानें एका बाईची गोष्ट लिहिली, तीन कितीएक शब्द अगदीं स्पष्ट ज्यास बोलतां येत होते, असा गोल्डफिंच तिचे जवळ होता, असें लिहिलें आहे. हिंवाळा जवळ आला म्हणजे प्रायशः हीं पांखरें कळप करितात. हीं पांखरें नानाप्रकारचीं बीजें खातात, तरी त्यांच्या आवडीचा आहार म्हटला असतां थिसल* नामें झाडाचें बीं होय. हीं पांखरें कधीं कधीं वीस वर्षेंपर्यंत जगतात, असें आढळलें आहे.

---

* थिसल या नांवाचें लहान कांटेझाड बहुत देशांत प्रसिद्ध आहे.

# पाठ २६

## व्हेल नामक जलचर प्राणी

ज्या प्राण्यांचें खातरीचें वर्णन आपणाजवळ आहे. त्या सर्वांमध्यें व्हेलनांवाचा प्राणी निर्विवाद अतिशयित मोठा आहे. ग्रीनलांड येथें व्हेलाची जी मोठी जात आहे तिचा इतका जबर आकार असतो, कीं बहुधा साठ फुटांपासून सत्तर फुटांपर्यंत त्याची लांबी भरती त्याच्या जबड्याची भेग सुमारें वीस फूट लांब असती जी ही भेगेची लांबी त्या प्राण्याच्या सर्व शरीराच्या लांबीचा एक तृतीयांश आहे. त्याचें शेपूट सुमारें चोवीस फुट रुंद असतें, आणि त्या शेपटाचा तडाखा कधीं कधीं मोठा भयंकर असतो.

ग्रीनलांड येथील समुद्रांत बहुधा एक मैलाहून लांब, व शंभर फुटांहून जाड, असे जे थिजलेल्या पाण्याचे खडपे असतात, त्यामधून व्हेल धरणें हा दृष्टीचा फार विलक्षण एक विषय आहे. त्याहून अधिक विलक्षण विषयाची कल्पना होत नाही.

त्या कामास जीं गलबतें लागलेलीं असतात, त्या प्रत्येकामागें साहा साहा होड्या असतात, आणि एकएक होडीवर वल्हे मारणारे साहा साहा जण, व व्हेल मारण्याकरितां एक एक बर्चीवाला असे असतात. त्या होड्यांपेकी दोन होड्या गलबतापासून कांहीं अंतरावर नेहमीं व्हेलाच्या टपणीस असतात.

व्हेल दृष्टीस पडतांच त्या दोन्ही होड्या त्याचा पाठलाग करावयास निघतात; त्यांतून एके होडीच्यानें व्हेल पाण्यांत तळीं जाण्याचे अगोदर त्याला आटपून घेववलें तर बर्चीवाला त्याचे आंगावर बर्ची मारतो. व्हेल तळीं जाण्याची खूण हीच कीं, तो बुडी मारतेवेळेस आपलें शेपूट वर करतो.

व्हेलास बर्ची लागतांच होडींतील माणसें गलबतास इशारा करतात; त्या गलबतांत जो टपणीस बसलेला टेहळ्या असतो तो, पडा, फडा, अशी आरोळी करून सर्वांस उठवितो; मग दुसऱ्या सर्व होड्या पहिल्या दोन होड्यांच्या कुमकेस लागल्याच निघतात.

आपणास जखम लागली असें समजतांच व्हेल मोठ्या विलक्षण त्वरेनें पळूं लागतो. कधीं कधीं तो

नीट खालीं जातो, व कधी कधीं थोडासा खालीं जाऊन मग पळत सुटतो. बर्चीला जो दोर बांधलेला असतो, तो सुमारें दोनशें वांवा लांब असतो. एका होडीवरचा दोर संपला तर लागलाच दुसऱ्या होडीवरचा दोर त्यास जोडतात; आणखी गरज लागल्यास, तिसऱ्या चवथ्या होड्यांवरचे दोर जोडीत जातात. साहाही होड्यांवरील दोरांची गरज लागली असे कितीएक वेळां प्रसंग गुद्रले आहेत.

व्हेल खालीं जातो तेव्हां दोन तीनशें वांवा खोल गेल्यावर पुनः हवेसाठीं त्याला वर यावें लागतें. तो जेव्हां वर येतो तेव्हां पाण्याचा मोठा फवारा सोडतो. त्यावेळेस असा भयंकर शब्द करितो कीं, कितीएकांस तोफेच्या अवाजाप्रमाणें तो वाटला आहे.

तो पाण्यावर दृष्टीस पडतांच दुसरा कोणी बर्चीवाला त्याला बर्ची मारतो; मग तो फिरून खोल पाण्यांत जातो. तो दुसऱ्यानें वरतीं आल्यावर बर्चीवाले त्याला इतक्या बर्च्या टोंचतात कीं शेवटीं पाण्याचे ऐवजीं तो रक्ताचे फवारे टाकूं लागतो; आणि सगळा समुद्र फेंसाळेपर्यंत आपल्या शेपटानें व पंखांनीं लाटांस तडाखे मारतो

प्राण मोडते वेळेस तो पाठ फिरवून उताणा होतो; मग होडीवाले, किनारा जवळ असल्यास त्यास तिकडे ओढून नेतात; किनारा जवळ नसल्यास गलबताकडे ओढून नेतात.

## पाठ २७

## न्यूकासल नामक बंदराजवळची दगडी कोळशांची खाण

इंग्लंडांत न्यूकासल म्हणून एक बंदर आहे, त्याच्या आसपास दगडी कोळशांच्या खाणी बहुत आहेत. त्यांतून एक खाण पाहावयास कोणी गृहस्थ गेला होता, त्यानें तेथें आपण काय पाहिलें ह्याचा मजकूर आपल्या एका मित्रास लिहून पाठविला, तो असा.

आम्ही खाणीजवळ गेल्यावर तेथील लोकांनीं आमचीं पांघरुणें काळें लागून खराब होऊं नयेत, म्हणून सर्वांग झांकेशीं डगलीं आमच्या आंगावर घातलीं; मग खाणींतील पाणी उपसण्याकरितां खाणीच्या तोंडा-

शीं एक वाफेचें यंत्र चालत होतें, तें त्यांनीं आम्हांस दाखविलें; आणि त्याच्याजवळ खाणींतील वायु शुद्ध करण्याकरितां दुसरें एक यंत्र चालत होतें तेंही दाखविलें.

नंतर झोपाळ्यासारखी एक फळी दोरीनें निकालून एका लोखंडी सांखळीस बांधलेली होती, तिजवर आम्हांस बसविलें, आणि त्या सांखळीस साहा घोडे लावून मोट सारखी ती फळी हळूच खाणींत सोडली. खरें पुसाल तर अशा प्रकारची स्वारी आम्हांस चांगली वाटली नाहीं, आम्हांस धास्ती पडली; परंतु खाणीच्या तळीं भरींव जमिनीवर जेव्हां आम्ही पोहोंचलों, आणि आमचा स्नेही फ्रांकूलीन साहेब हास्यमुख करून आमच्या जवळ उभा राहिलेला आम्हीं पाहिला, तेव्हां आम्हांस धैर्य आलें.

फ्रांकूलीन साहेबानें आमचें आगतस्वागत केलें, आणि हवा चांगली शुद्ध राखण्याकरितां एक मोठी भंवाळ आगटी पेटविलेली होती ती आम्हांस बोटानें दाखविली. त्या खाणीमध्यें ज्या खोल्या केलेल्या आहेत, त्यांच्या जवळ आम्ही गेलों तेव्हां आम्हांस धैर्य येऊन. जसें राहत्या घराच्या खोल्यांत फिरावें तसें मी आणि माझा भाऊ असे आम्ही उभयतां त्या खाणींतल्या खोल्यांत स्वस्छपणें फिरलों.

खाणींत कोळसा खोदून चार चार वार रूंद अशा

जागा केलेल्या असतात, त्यांच्या त्यांच्या मध्यें दाहा दाहा वार रुंद व वीस वीस वार उंच असे कोळशांचे भक्कम खांब वरच्या छावणीचा सोडलेला भाग कोसळूं नये म्हणून ठेवलेले असतात. खाणी मध्यें कांहीं वर्षें पर्यंत बाहेर पडल्यावांचून कितीएक घोडे राहत असतात; त्यांस तेथें स्वास पडतेसें वाटतें. खोदलेला कोळसा खाणीच्या तोंडाखालीं ओढून नेण्याच्या कामास हे घोडे लावतात. खाणींतला कोळसा वर काढण्याचें जें यंत्र आहे तें ही चांगलें भक्कम घोडे फिरवितात.

तो कोळसा शेरणीच्या बळकट पांट्या करून त्यांत आणतात. एकेक पांटींत सुमारें तेराशें पौंड वजन कोळसा भरतो. एक पांटी वर चढत असतां दुसरी पांटी खालीं उतरत असती. खाणीच्या तोंडाशीं एक मनुष्य उभा असतो, तो पांटी वर आली म्हणजे सोडून घेऊन गाड्यावर ठेवितो; मग भरलेल्या पांटीच्या जागीं दुसरी रिती पांटी अडकवितो. आणि कांहीं अंतरावर एक झोपडी असती तेथपर्यंत गाडा हांकून नेऊन कोळसा रिचवितो.

तेथें एक गाळण केलेली असती, तिजवर कोळसा टाकला म्हणजे भोंकांतून चुरा व धुरळा खालीं गळून मोठाले कोळसे उतरणीवरून खालीं पडून त्यांचे मोठे

ढीग होतात. मग दूरदूरच्या बंदरीं कोळसा नेण्याकरितां जीं गलबतें वाट पाहत असतात, त्यांजवर भरण्याकरितां ते कोळशांचे ढीग गाड्यांवर लादून नदीकिनाऱ्याच्या धक्क्यावर नेतात. खाणीपासून धक्क्यापर्यंत उतंरता लोखंडी रस्ता केलेला असतो, त्यावरून हे भक्कम भरलेले गाडे घोड्यांवाचून धांवत जातात. चाकें सरळीत जावीं म्हणून चाकांच्या धांवेच्या रुंदी इतक्या त्या रस्त्यास खांचण्या केलेल्या असतात.



# पाठ २८

## विद्येची वडाई.

मुंबई नांवें राजधानी येथें मोरोपंत म्हणून एक गृहस्थ राहात असे, त्यास नारायण त्या नांवाचा एक मुलगा होता; त्यानें अनेक शाळांत जाऊन विद्याभ्यास केला होता. वैशाखमासीं मुंबईतील शाळांस महिनाभर सुटी असती, त्या सुटीच्या दिवसांत एके वर्षी नारायणाचा मामा पुण्यांत राहत असे त्याला भेटावयास तो पुण्यास गेला.

नारायणाच्या मामाचे घरांत मोठी अशी एक चखोली होती. तीच प्रसंगानुसार दिवाणखाना, बैठकीची जागा, व मुलांस खेळण्याची जागा, होत असे. ही खोली फार मोठी नव्हती, तरी तींत उपयोगी असे जिन्नस पुष्कळ होते. आणि कांहीं चमत्काराचे व कांहीं शोभेचेही जिन्नस होते. मुलांचीं पुस्तकें ठेवण्याचें एक कपाट होतें, व त्यांच्या बापाचीं पुस्तकें ठेवण्याचें एक कपाट होतें; एक खगोल होता; एक भूगोल होता; कांहीं चित्रें होतीं; कांहीं पुतळे होते; वीणा सारंगी अशीं वाद्यें होतीं; एक्या फळीवर एक मोठें घड्याळ होतें; एक सूक्ष्मदर्शक यंत्र होतें; एक

दुर्बीण होती; आणि दूरदूरचे मिळविलेले कांहीं चमत्कारिक पदार्थ होते. खोलीस खिडक्या दारें पुष्कळ होतीं, म्हणून आंत चांगला प्रकाश पडत असे; आंत बसणाऱ्यास सुख व्हावयाजोगी जागा होती. तिच्यापुढें डाळिंब्या, नारिंग्या, पेरूवगैरे नाना प्रकारच्या फळझाडांची बाग होती.

नारायणाचीं मामेभावंडें पांच साहा होतीं; तीं सुशील व सुशिक्षित होतीं. नारायणाचे वयास तेरा वर्षे होऊन गेलीं होतीं; आणि तो सभ्यलोकांचे मुलांबरोबर शिकला होता, म्हणून त्यास असा गर्व झाला असे कीं, विद्याभ्यासांत माझीं मामेभावंडें माझी बरोबरी करणार नाहींत;. त्यांहून मी फार अधिक आहें. तो आपल्या घरीं कांहीं दिवस राहावयास आला आहे, यास्तव त्यास कांहीं करमणूक करावी, म्हणून त्याच्या भावंडांनीं मोठा प्रयत्न केला; परंतु त्यांचा तो प्रयत्न सिद्धीस गेला नाहीं. एके दिवशीं तीं सारीं मुलें त्या खोलींत बसलीं असतां त्यांचें असें भाषण झालें.

विष्णु — (नारायणाचा मधला मामेभाऊ) नाना, चल, तुला दाखवितों, आमच्या गुरूनें आम्हांस पांखरांचीं काय चमत्कारिक चित्रें दिलीं आहेत, पहा. अथवा बुदबळांचा खेळ तुला आवडत असला,

तर आमच्या गोपाळास बुद्धिबळें चांगलीं खेळतां ये-
तात, तो तुजबरोबर खेळेल. तिकडे तुझें मन ला-
गत नसलें, तर आम्हांजवळ राजांच्या व राणीं-
च्या तसबिरा क्रमानें काढलेल्या आहेत, व नकाशे
आहेत, पाहिजे तर त्या तसबिरा व ते नकाशे पहा.
कोणत्याही प्रकारानें आपण चार घटिका करमणूक
करूं.

नारायण — (गर्वानें) असले पोरखेळ, मला आव-
डत नाहींत.

जगू —(धाकटा माने भाऊ) पण, नाना, आमच्या गु-
रूचें म्हणणें असें आहे कीं, स्वस्त होऊन रिकामें
बसण्यापेक्षां कांहीं तरी करावें हें चांगलें; मग मोठें
काम नसल्यास पोरखेळ कां होईना? मागें बळवंत
राव सुभेदार बाबास भेटावयास आले होते, ते येथें
कांहीं दिवस राहिले होते, ते रिकामपणीं कधीं कधीं
आमच्या धाकट्या गोदीबरोबर पोरींचा खेळ दे-
खील खेळत असत. आणि आमच्या विष्णूनें चाकू-
नें लांकूड तासून एक लहानसें गलबत केलें होतें,
त्यास रावसाहेबांनीं दोरखंड करून दिलें.

नारा॰ — जगूभाऊ, मी म्हणजे उद्योग टाकून उगीच

फक्त बसलों, असें नाहीं. गुरुजीनें जो धडा मला करावयास सांगितला होता, तो मीं मघांच करून टाकिला. आतां मला आज करावयाचें कांहींच राहिलें नाहीं, म्हणून मी उगीच बसलों आहें.

**मामा नारायणाचा**— (पलिकडे बसला होता तो नारायणाचें गर्वाचें बोलणें ऐकून जगूस विचारितो.) काय जगू, नारायणास स्वतां शिकण्यास, किंवा दुसऱ्यास शिकविण्यास, अथवा आपल्या सोबत्यां बरोबर चार घटका करमणूक करण्यास, कांहींच उरलें नाहीं काय?

**नारायण**— नाहीं, मामा, कांहींच उरलें नाहीं; माझा धडा झाला; ह्या खोलींतील एकून एक पुस्तकें म्यां वाचलीं, आणि प्रत्येक चित्र पाहिलें; ह्या खोलींत जितक्या चिजा आहेत तितक्या झाडून मला ठाऊक झाल्या आहेत.

**मामा**— आमची ही खोली फार मोठी आहे असें नाहीं, सुमारें वीस फूट लांब व सोळा फूट रुंद अशी आहे; तरी, माझ्या लाडक्या नाना, ह्या चार भिंतींच्या आंत किती चमत्कारिक चिजा आहेत बरें? काय, नाना, ह्या खोलींतील एकून एक जिन्नस तुला ठाऊक आ-

हे तना? (हें ऐकून नारायण कांहींसा लाजून खालीं पाहूं लागतो.)

गोपाळ—(बापाकडे वळून) नानानें सारसंग्रहाचें पुस्तक तोंडपाठ केलें आहे, म्हणून त्याला पुष्कळ गोष्टी ठाऊक झाल्या आहेत. वायुगुरुत्वमापक यंत्राची त्याला माहितगारी आहे; व मेघगर्जना म्हणजे काय आहे, व इंग्लंड देशाच्या राज्याची व्यवस्था कशी आहे, ह्या गोष्टी, आणि अशा दुसऱ्या शेंकडों गोष्टी त्याला ठाऊक झाल्या आहेत. (मग नारायणास) नारायणराव, मेघगर्जना म्हणजे काय आहे, हें कृपा करून आम्हांस सांगा.

नारा०— तोफ सुटतांना जसा मोठा अवाज होतो तसा मेघांतून वीज निघूं लागली म्हणजे जो मोठा अवाज होतो, त्याला आणि मेघ व पृथ्वी ह्यांच्या मध्यें त्या अवाजाचा जो प्रतिध्वनि होतो त्याला प्राकृतभाषेंत अभाळाचें गडगडणें, आणि संस्कृतभाषेंत मेघगर्जना असें म्हणतात.

मामा— वायुगुरुत्वमापक यंत्र म्हणजे काय बरें, नाना?

नारा०— पृथ्वीच्या भोंवतीं जें वायूचें आवरण असतें त्याचें गुरुत्व किती आहे, हें समजण्याकरितां जें पाऱ्यानें

यंत्र केलेलें असतें, त्यास वायुगुरुत्वमापकयंत्र म्हणतात.

विष्णु— (त्यास हटकून) वायूचें गुरुत्व म्हणून तूं म्हणतोस, तें वायूचें गुरुत्व म्हणजे काय आहे, बरें, नाना? हें सांगशील तर ऐकण्याची मोठी इच्छा आहे.

नारा०— (मामास तिराईत करून) मामा, मला तर खचीत वाटतें कीं म्यां उत्तर बरोबर दिलें. हें उत्तर सारसंग्रहाचे पुस्तकांतील पाठ केलेलें म्यां आपल्या बापापुढें शंभर वेळ दिलें आहे.

गोपाळ— (लाबून बोलण्याच्या स्वरानें,) हें तुझें उत्तर ऐकून तुझ्या बाबास ज्ञान झालें असेल, आम्हांला तर ज्ञान झालें नाहीं. (त्यावर बाप गोपाळावर कटाक्ष करतो.) नारायणराव, इंग्लंडदेशाचा राज्यकारभार चालविण्याची रीति कशी आहे. हें कृपा करून सांगा.

नारा०— तेथें कायदे करणारी एक मंडळी आहे, ती जे जे कायदे करिते, व जे जे नेम ठरविते. त्यांच्या अनुसारानें राज्यकारभार चालतो. (हें उत्तर देऊन नारायणास वाटलें कीं मी आज जसा काय मोठा सभाजयच केला आहे. मग तो जयमुद्रेनें

इकडे तिकडे सर्वांच्या मुखांकडे पाहूं लागतो. वि-
ष्णु व जगू हे गालच्या गालीं हांसतात, गोपाळा न
मोठ्यानें खदखद हांसूं लागतो.)

**गोपाळ**— नारायणराव, तुला ठाऊक नाहीं अशी गो
आमच्या त्या खोलींत नाहींच, असें आम्हांस खच
त वाटतें.

**नारा०**— मलाही तसेंच वाटतें, गोपाळा.

**मामा**— बरें नाना, त्या चौरंगावर जी चहादानी वि
नें आणून ठेविली आहे, तिचें झांकण काय म्हण
न वर जोरानें उडतें? आणि तींतून फसफस श
करून धूर कां बाहेर येतो? त्या दोन गोष्टींचीं क
रणें जगूस समजावून दे बरें, पाहूं.

**नारा०**— मामा, त्यांत काय आहे? हें सांगायाचें तर
गदीं सोपें आहे. त्या गोष्टींचें कारण दुसरें काय
असायाचें आहे? त्याचें कारण पाण्याची वाफ.

**मामा**— होय, हें खरें, पण ज्या होदांतून तें पाणी भ
लें त्या होदाच्या पाण्यांत कांहीं वाफ नाहीं.

**नारा०**— पाणी कढलें म्हणजे उष्णतेच्या योगानें त्
ची वाफ होती.

**मामा**— होय, पण हें पोकींव उत्तर. परंतु कसी, कोण

रीतीनें, उष्णतेच्या योगानें हौदांतील पाण्याची वाफ होती, हें उलगडून आम्हांस सांग. (हें ऐकून नारायण गोंधळला, त्यावर त्यास उत्तर देतां येईना.) नारायणा, तर तुला ठाऊक नाहीं अशी गोष्ट त्या लहानशा खोलींत एक निघाली आहे बरें! आणखी अशा कांहीं गोष्टी निघणार नाहींत, असें तुला खचीत वाटतें? नीट विचार कर.

नारा०—(विचारपूर्वक चोहींकडे पाहून उत्तर देतो.) मला ठाऊक नाहीं अशी दुसरी गोष्ट निघणार नाहींसें वाटतें. त्या खोलींतील बाकीच्या गोष्टी सर्व मला माहीत आहेत, अशी माझी बरीच खातरी आहे.

विष्णु—(भलेपणानें हटकून बोलतो.) संभाळा; नारायणराव, उगीच खातरीचीं भाषणें बोलूं नका.

मामा—बरें तर, नाना, त्या पलिकडच्या दारास किल्ली घालावयाचें भोंक आहे, त्यांतून वारा पार जातांना शिळीसारखा कां वाजतो? (त्याच्यानें उत्तर देववत नाहीं.) पाहा, तुला ठाऊक नाहीं अशी ही दुसरी गोष्ट निघाली आहे. पहा, त्या खोलींत काय काय चमत्कारिक पदार्थ आहेत, त्यांपैकीं ईश्वरानें पदार्थांचे ठायीं जे गुण व ज्या शक्ति करून ठेविल्या

आहेत त्यांचे कांहीं परिणाम आहेत, व मनुष्याच्या कलाकौशल्याचे परिणाम कांहीं आहेत. त्यागुणांचें व शक्तींचें व कलाकौशल्याचें वर्णन करूं म्हटलें, तर मोठाले ग्रंथ होतील. तुला आणखी विचारतों, त्या चौरंगावर मोहळाच्या पोळीचा तुकडा आहे, तो कसा केला आहे, हें तुझ्यानें सांगवेल बरें? तें पलिकडे उष्णमापकयंत्र आहे त्यांतील पारा कां वर चढतो, व कां खालीं उतरतो, हें तुझ्यानें सांगवेल बरें? विठूनें लांकडें चुलींत घातलीं, तीं तडतड कां वाजतात, हें तुझ्यानें सांगवेल बरें? ती पाहा एक माशी भिंतीला धरून चालत आहे, व एक खालीं पाठ करून छतावर चालत आहे, असें त्यांस कशानें चालतां येतें, हें तुझ्यानें सांगवेल काय?

नारा०—(मला सर्व गोष्टी ठाऊक आहेत, अशी शेखी मिरवीत होता तिची कांहींशी लाज धरून) माझ्यानें सांगवत नाहीं, मामा.

मामा —ज्या कारणानें किल्लीच्या भोंकांतून वारा शिळीसारखा वाजतो, त्याच कारणानें त्या माशांस चालतां येतें, व त्याच कारणानें चाहादानीचें झांकण उडत आहे, आणि वाफेचीं जीं यंत्रें चालतां त्वां पाहिलीं

तीं ही त्याच कारणानें चालतात. त्याच कारणानें आणखी अशीं मोठमोठीं कार्यें होतात. कीं त्यांची गणना करवत नाहीं.

**विष्णु** — बाबा, पुस्तकें वाचून त्या गोष्टी आम्हांस शिकल्या पाहिजेत. कोणत्या पुस्तकांत त्या गोष्टी सांपडतील?

**मामा** — कितीएक गोष्टी अशा आहेत कीं, डोळ्यांनीं त्या पाहिल्या वांचून साफ समजत नाहींत. पुस्तकें वाचून जें त्याविषयीं ज्ञान होतें तें संदिग्ध ज्ञान. ज्या गोष्टी म्यां नारायणास पुसल्या त्या ह्याच जातीच्या आहेत, असो. ह्या सर्व गोष्टी तुमच्या ध्यानांत भरावयास तुम्ही अझून लहान आहां, तरी महिना पंधरा दिवस गेल्यावर त्या गोष्टी पाहाण्याची इच्छा तुमच्या मनांत राहिली, तर मला सांगा, म्हणजे मी तुमच्या गुरूची प्रार्थना करून वायुविद्येचे कांहीं चमत्कार त्याजकडून तुम्हांस दाखववीन.

# पाठ २१

## सहल करून येणें

कोंकण प्रांतीं, एका डोंगराच्या पायथ्याशीं, नदी किनाऱ्यास एक गांव आहे, तेथें एका विद्वानापाशीं रामा व गोविंदा असे सोळा सोळा वर्षांचे दोन मुलगे विद्याभ्यास करीत असत. त्या दोघांमध्यें रामाचा स्वभाव फार शोधक असे. त्यानें कोणतीही साधारण जरी गोष्ट पाहिली, तरी तींत खुबी काय, हें समजण्याविषयीं तो फार प्रयत्न करी, आणि ती समजली असतां त्यास फार आनंद होत असे; परंतु गोविंदाची प्रकृति अशी नव्हती. पोषाक डागिने, वगैरे लोकांत ज्या डामडौलाच्या गोष्टी आहेत, त्यांजकडे मात्र त्याचें लक्ष्य असे. असो, एक दिवस सुटी होती त्या दिवशीं रामा आणि गोविंदा हे दोघेही मौजेनें बाहेर फिरावयास गेले होते. मग सांजचे वेळेस गोविंदा पहिल्यानें घरीं आला, त्यास गुरु विचारतो.

गुरु— कां गोविंदा, आज कोणीकडे फिरावयास गेला होतास? तां आज काय काय मौज पाहिली बरें?

गोविंद— आजी, गुरुजी. मी आंबराईंत गेलों होतों.

व तेथून डोंगरावर गेलों, आणि तेथून घरीं आलों.

गुरु — तें चक्कर तर मोठें बाहारीचें आहे; तिकडून गेलें असतां बहुत चमत्कार दृष्टीस पडतात.

गोविंदा — गुरुजी, खरें पुसाल तर मला तें चक्कर फारच उदासवाणें दिसलें. त्या तिनक्या वाटेंत मला शपथेस देखील माणूस भेटलें नाहीं, किंवा एकही घोडें दिसलें नाहीं. इकडे गेलों त्यापेक्षां सडकेच्या रस्त्यानें गेलों असतों, तर बरें झालें असतें.

गुरु — गोविंदा, पुष्कळ माणसें आणि घोडीं पाहून तुला आनंद होतो, त्यास तूं रहदारीच्या रस्त्यावर गेला असतास, तर तुला खरोखरी संतोष झाला असता. बरें, रामा तुला भेटला होता काय?

गोविंदा — होय, गुरुजी; आम्ही उभयतां बरोबरच बाहेर पडलों; परंतु आंबराईंत जातांना वाटेनें जी पाणंद लागली तेथें तो मागें रेंगाळू लागला, म्हणून त्यास मागें टाकून मी एकटाच पुढें चालता झालों. तो वाटेनें चालला असतां त्याजकडे बघ, त्याजकडे बघ, असें करून तो फारच वेंगटपणा करितो.

गुरु — (गोविंदास उत्तर न देतां.) हा पहा आला! बं.

रामा, आज तूं कोणीकडे फिरावयास गेला होतास?

रामा— आहा, गुरुजी, काय सांगूं? आज ज्या वाटेनें मी सहल करावयास गेलों होतों ती वाट पराकाष्ठेची मनोरम होती. मी प्रथमतः सर्व आंमराईभर हिंडलों, मग डोंगराच्या माथ्यावर चढलों, नंतर तेथून खालीं उतरून लगेच नदीच्या कांठानें हिरव्या कुरणांत फिरावयास गेलों.

गुरु— असें कां बरें? तूं जें चक्कर घेऊन आलास, तें चक्कर घेऊन तुझ्या पुढें हा आतांच गोविंदा आला त्यांत तूं तें फार चांगलें होतें अशी त्याची स्तुति करतोस, आणि तो तर तें मनस्वी उदासवाणें होतें म्हणून त्याची निंदा करतो त्याचें कारण काय?

रामा— हें ऐकून मला मोठा अचंबा वाटतो. आतां त्यास काय वाटलें असेल तें थांटो, परंतु मला तर पावलागणीत कांहीं तरी चमत्कार म्हणून दिसला च, त्या पहा, म्यां आपल्या खिशांत किती नव्या नव्या चमत्कारिक चिजा भरून आणिल्या आहेत.

गुरु— बरें, त्वां वाटेनें काय काय चीजा पाहिल्या त्या आम्हास सविस्तर सांग बरें. मला वाटतें की [illegible] गोष्टी तुझ्या मला [illegible] झालेल्या मजा [illegible]

तर्‍याच वाटतील, कांकीं त्यानें ही त्या पाहिल्या नाहींत

रामा — होय, गुरुजी, सांगतों. आतां आंबराईंत जी पाणद जाती तींत काय नुसती वाळू आहे; तेथें झाडझाड. त्याकरितां मी इकडे तिकडे न पाहतां एकसारख्या झपझप आंबराईकडेच चाललों; परंतु मी पाणदींतून चाललों असतां कुंपणाच्या आंतल्या बाजूस आंब्याचें एक झाड माझ्या दृष्टीस पडलें, त्या झाडावर झुपकेदार एक दुसरें झाड होतें. त्या झाडाची पानें आंब्याच्या पानाहून अगदीं वेगळीं होतीं; ही पाहा त्या झाडाची एक फांदी मीं आणिली आहे. हें कोणतें झाड बरें?

गुरु — त्या झाडास बांडगूळ असें म्हणतात, हीं झाडें जमिनीवर कधींही उगवत नाहींत; नेहमीं दुसर्‍या झाडांवर उत्पन्न होतात; आणि आपल्या मुळांनीं त्या झाडांचा रस शोषून त्यावर उपजीवन पावतात, म्हणून त्या झाडास संस्कृत भाषेंत वृक्षादनी, म्हणजे झाड खाणारी लता, असें नाम प्राप्त झालें आहे.

रामा — मग आंबराईंत पोहोंचल्यावर पाहिलें, तों तेथें गार, मंजूळ वार्‍याची चांगली झुळुक चालली होती तेथें कांहीं तांबडी कांहीं पिंवळी, कांहीं पोंपटी, कांहीं

गुलाबी, अशीं नाना प्रकारचीं सुंदर फुलें त्या रानभर इतकीं दाट लागून गेलीं होतीं, कीं जसा काय त्या सर्व रानांत एक चित्रविचित्र वर्णांचा गालीचाच पसरला आहेसें वाटत होतें. त्या फुलांपैकीं बहुत फुलें मीं पूर्वीं कधींही पाहिलीं नव्हतीं. हीं पाहा, मीं कांहीं चमत्कारिक फुलें धोत्रांत आणिलीं आहेत. त्या रानांत एका बाजूस जेथें जमीन चिवड होती तेथें शेपन्नास टिटव्यांचा एक थवा बसला होता, तो पाहून मला फार मौज वाटली. मी जवळ आल्यावर त्यांपैकीं कांहीं टिटव्या माझ्या डोक्यावरतीं घिरट्या घालूं लागल्या, आणि टीं टीं ह्या वाळ असा स्पष्ट करीत होत्या कीं, जणूं काय त्या बोलतातच आहेत. एक टिटवी पंख मोडलासें करून जमिनीवर पडत पडत उडूं लागली. त्यावरून तिला धरण्याच्या हेतूनें मी तिच्या मागें गेलों, पण मी जसा जसा जवळ जाई तसतशी ती जेमतेम करून पुढें जाई.

गुरु.—(हांसून) आहा, रामा! तिनें तुला खूप फसविलें, खरें. तिनें तुला आपल्या घरट्यापासून ठकवून दूर नेण्याकरितां तें कसब लढविलें. हीं पांखरें मोकळ्या जागीं आपलीं घरटीं बांधतात. आणि तीं

जर असें मोठमोठ्यानें आरडून किंवा पख मोड-ल्याचें मिष करून मनुष्यांस फसवून दूर नेतां तर त्यांचीं घरटीं सहज त्यांचे हातीस पडतीं.

रामा — हें तिचें कपट जर मला पूर्वीच कळतें, तर बरें झालें असतें. पाहा, त्या दिवशीस धरण्याचे नादीं भरून त्या चिबड जागेंत पांच साहादां मीं आपला जोडा उगीच पाण्यांत भिजवून घेतला. परंतु तिच्या पाठीस लागण्याच्या योगानें मला पुढें एक म्हातारा बाबा व एक मुलगा अशीं दोन मनुष्यें भेटलीं. तीं त्या रानांत लांकडें तोडून मोळ्या बांधीत होतीं. तुमची एकेक मोळी शहरांत केवढ्याला जाती. व मोळ्यांचीं लांकडें तोडल्याबद्दल तुम्हांस रानवाल्यास कांहीं द्यावें लागतें कीं काय? अशा त्यांस म्यां बहुत गोष्टी विचारल्या; व त्यांनीं ही विचारल्यास मांचीं उत्तरें दिलीं. नंतर मी डोंगराकडे चालता झालों. आणि भोंवतालचा अफाट प्रदेश पाहावा ह्या इच्छेनें मी डोंगरावर चढलों. तेथून असमंतात् केवढा हा विस्तीर्ण प्रदेश दिसतो, आणि किती दूरवर तरी नजरेचा पल्ला पोहोंचतो! तेथून मला पैधरा देवळांचीं शिखरें दिसत होतीं; व भोंवतालच्या

बागांमील व आगरांमील झाडांच्या हिरव्या गार पालवींतून वर आलेले असे गृहस्थ लोकांचे बंगले मला पुष्कळ दिसत होते . तशी नदीही डोंगराच्या आड जाईतोंपर्यंत वळणावळणांनीं लवणांतून वाहत जातांना चांगली साफ दिसत होती . माझ्या मनांत एक गोष्ट करावयाची आली आहे , आज्ञा झाल्यास सांगेन ; ती अशी कीं , आपल्या शाळेंत आपल्या त्या प्रांताचा नकाशा आहे , तो जर आपण कृपा करून मजपाशीं प्रहरदीड प्रहर दिला, तर तो घेऊन आणखीं एकदां त्या डोंगरावर जावें, म्हणजे त्या नकाशावरून कोणत्या ठिकाणास काय म्हणतात हें बहुतेक सर्व चांगलें ओळखून काढतां येईल .

गुरु — रामा , फार उत्तम . तुला तो नकाशा मिळेल , व मीही आपली धाकटी दुर्बीण घेऊन तुझ्या संगतीं येईन .

रामा — मग मी डोंगरावरून खालच्या कुरणांतच थेट उतरलों , आणि आपल्या नदीस मिळणारा एक ओढा आहे त्याच्या बाजूनें पुढें चाललों . त्या ओढ्याच्या दुतर्फा बोरूचीं व कळकीचीं बेटें लागून गेलीं

होतीं. तशाच दोन्हीकडे कण्हेरी व इतर फुलझाडें फुललेलीं होतीं, व त्यांचीं प्रतिबिंबें पाण्यांत पडून जसें काय ओटाभर फुलें विखरली आहेत, अशी कांहीं चमत्कारिक शोभा दिसत होती. तेथें पाण्यावर बहुत मोठमोठ्या चित्रविचित्र रंगांच्या माशा उडत होत्या, त्या सर्वांत जी मला विशेष सुंदर वाटली ती ही, मीं हातांत धरून आणिली आहे, पाहा! तेथें पाण्यावर तळपतांना मीं एक पांखरूं पाहिलें. तें वर उडत असतां एकाएकी तुटून झांप घालून पाण्यांत बुडी मारी, हें पांखरूं धरण्याविषयीं मला फारच उत्कंठा होती. परंतु तें कसूचें सांपडतें? त्या पांखराचा रंग शानदार हिरवा निळा होता, व नारिंगी रंगही त्यांत कांहीं कांहीं लकेर भासत होता. हा पक्षी माळ्कीपेक्षा कांहींसा लहान होता, त्याचें डोकें व चोंच हीं मोठीं होतीं व शेपूट आखूड होतें.

गुरु — समजलें. त्या पक्ष्यास पाणबुड्या किंवा राण्या असें नांव आहे. त्या पक्ष्यांचें भक्ष्य मासे होत. त्यांस ते कसे धरितात हें त्वां पाहिलेंच आहे. हे दरडांस बिळें पोंखरून त्यांत राहतात. हे एकट

कोंडे आहेत . ज्या ओढ्याजवळ व ज्या नदीज वळ त्यांचीं घरटीं असतात, त्या ओढ्यापासून किंवा त्या नदीपासून दूर अंतरावर ते कधींही जात नाहींत .

रामा — हा पक्षी मला पुनः एक वेळ पाहिला पाहिजे. तो पाहून मला जितकी मौज वाटली तितकी दुसरा पक्षी पाहून वाटली नाहीं. असो; मग तो ओढा नदीस मिळेतोंपर्यंत मी तसाच त्याच्या कांठानें पुढें चालतों होतों . मग मी नदीच्या तीरानें जाऊं लागलों . तेथें चिमण्यांसारखीं कांहीं पाखरें नदींत खेळत होतीं तीं म्यां पाहिलीं . केव्हां केव्हां तीं धाडदिशीं नदींत उड्या घालीत . व केव्हां केव्हां तीं अशा झपाट्यानें एकमेकामागें धांवत ,कीं त्यां-वर नजर देखील ठरत नसे . असा त्यांचा खेळ पाहून मला फार मौज वाटली . मीं दुसरी एक गोष्ट पाहिली, ती अशी कीं , तेथें भिंतीसारखी एक उंच दरड होती तीस पुष्कळ भोंकें होतीं त्यांत ते कांहीं पक्षी शिरत व कांहीं त्यांतून बाहेर निघत .

गुरु — तीं पांखरें पाकोळ्यांचीच एक जात आहे.त्यां-च्या पाठीचा रंग काळा असतो , व पोटाचा रंग

पांढरा असतो, व तीं भोंकें त्यांचीं घरटीं होत; त्यांत तीं आपलीं पिलें ठेवितात. तीं भोंकें खोल असतात, व तीं कठीण जागीं असतात तेणें करून त्यांचीं पिलें कोणास चोरतां येत नाहींत

रामा — तेथून जवळच मी एक बाबा पाहिला. तो एका लहानशा होडींत बसून वांबा धरीत होता. त्याच्या हातांत एक लांब काठी होती, व तिच्या शेवटास एक लोखंडी फाळ होता. नदींत जेथें फार गाळ असे तेथें ती काठी घाली. आणि वांब लागली म्हणजे ती रगडून जोरानें टोंचून तिनें ती वांब बाहेर काढी.

गुरु — वांबा धरण्याचा तो प्रकार त्वां पाहिला आहे. पुढें?

रामा — मी त्या मनुष्याकडे पाहात होतों. तों इतक्यांत एक बगळा माझ्या डोक्यावरून उडत जाऊन पलीकडे जवळच नदी वळत होती तेथें जाऊन उतरला. मग मीही तो काय करतो हें पाहाण्यासाठीं तो ज्या दरडीजवळ बसला होता त्या दरडीमागें हळूच जाऊन उभा राहिलों. पोटास

पाणी लागे तोंपर्यंत तो पाण्यांत चालत जाऊन मग मान आंखडून घेऊन डोकें पाण्यावर लावून उभा राहिला. नंतर एक मासा जवळ आला, तो येतांक्षणींच डोळ्याचें पातें लवलें न लवलें इतक्यांत तो त्यानें चोंचीनें बाहेर काढून गिळून टाकिला. ह्याप्रमाणें त्यानें दोन तीन मासे खाल्ले; इतक्यांत माझ्या पावलांची चाहूल त्यास लागतांच तो भिऊन उडाला; आणि तेथून कांहीं अंतरावर एक वन होतें तेथें एका उंच झाडावर जाऊन बसला.

गुरु — मला वाटतें त्या बगळ्याचें घरटें त्या झाडावरच असेल; कांतर बगळे आपलीं घरटीं उंच उंच झाडांवर करीत असतात; व कधीं कधीं ते कावळ्यांसारिखे बहुत मिळून एकत्र रहात असतात.

रामा — मग मी कुरणांतून घराकडे वळलों. आपल्या घराजवळच उंचवट्यावरचें जें शेत आहे तेथें जेव्हां मी पोहोंचलों तेव्हां सूर्य अस्तास जात होता. आहाहा! त्यावेळेस काय मौज दिसली! सूर्याच्या किरणांनीं मेघ काय चमकत होते;

कांहीं तांबडे, कांहीं हिरवे, कांहीं जांभळे, असे नाना प्रकारचे अधिक उण्या कसाचे रंग त्यांत दिसत होते. सूर्य मावळतांना केवढा तरी मोठा दिसतो हो!

गुरु — होय, फारच मोठा दिसतो. तसा चंद्रही उगवतांना मोठा दिसतो, हें ही त्वां पाहिलेंच असेल. सूर्य चंद्र उदयास्तकाळीं असे मोठे दिसतात हा एक दृक्भ्रम आहे; व त्या भ्रमाचीं सर्व कारणें दर्शनानुशासन नामक शास्त्रांत सांगितलीं आहेत; परंतु त्या शास्त्रांत तुझा कांहीं प्रवेश झाल्यावांचून तीं तुझ्या ध्यानांत नीट येणार नाहींत. असो; कांहीं चिंता नाहीं. पण आज त्वां सहल केली तींत तुला किती बरें नव्या नव्या गोष्टी आढळल्या, व तेणें करून किती नव्या कल्पना तुझ्या मनांत भरल्या बरें! गोविंदा त्या इतक्या गोष्टींतून तुला कांहींच आढळलें नाहीं काय रे?

गोविंदा — त्यांपैकीं कांहीं गोष्टी म्यां पाहिल्या, परंतु त्यांकडे मीं विशेष लक्ष्य दिलें नाहीं. आणि त्या पाहाण्याची मला फारशी मौजही वाटली नाहीं. मी आपला नीट घरीं आलों.

**गुरु**— जर तूं एखादा निरोप घेऊन गेला असतास, तर तुझें करणें ठीक झालें असतें; परंतु तूं मौज पाहाण्याच्याच हेतूनें गेला होतास, म्हणून, कोठें कोठें काय काय मौज आहे, इकडे चित्त दिलें असतें तर हें शाहाणपण्याचें काम झालें असतें. असो; त्या प्रमाणें त्या प्रपंचांत कांहीं लोक डोळे उघडे असून फिरतात, व कांहीं डोळे झांकून फिरतात; म्हणजे कांहीं लोक असे असतात कीं, ते कोणे काचा कोणत्या एकांगेर चालीनें नाश झालेला पाहून आपण तत्काळ ती चाल आपल्या आंगीं असल्यास टाकून देतात; किंवा चांगल्या चालीनें कोणाचें कल्याण झालेसें पाहून ती आपणस्वीकारितात; परंतु कांहीं असे मूर्ख असतात कीं, ते हा भेद कांहींच पाहात नाहींत; तरी त्या भेदाकडे लक्ष्य दिल्यानेंच कांहीं लोकांस दुसऱ्यांपेक्षां विशेष ज्ञान प्राप्त होतें. भाडेकरी लोक व खलाशी लोक बहुत देश व बहुत मोठमोठीं विख्यात शहरें पाहातात; परंतु त्यांस तेथील कांहीं वाण्यांचीं व तांबोळ्यांचीं दुकानें, जेथें त्यांस सिधा व पान तंबाखू घ्यावयास जावें लागतें, तीं व त्याच जेवसाचा भाव, हीं खेरीज करून दुसरें कांहींच

माहीत नसतें. परंतु जो शोधक व शाहाणा आहे तो चार कोस मात्र जरी हिंडला, तरी तितक्यांतच लोकांस उपयुक्त अशा कांहीं तरी गोष्टींचा शोध करितोच करितो. सहस्त्रावधि अविचारी लोक देशांचे देश, व खंडांचीं खंडें फिरले आहेत, परंतु शोधक व ज्ञानी लोकांस एक सहस्रांश जितकी अक्कल व जितका आनंद होतो, तितका देखील त्यांस प्राप्त झाला नाहीं. असो; रामा, तूं आपल्या डोळ्यांचा असाच उपयोग करीत जा. गोविंदा, असें वेड्यासारखें पुनः करूं नको. कोणतीही गोष्ट पाहिली असतां तिकडे लक्ष्य देत जा, व मनांत पक्कें समजून की, ईश्वरानें तुला जे हे डोळे दिले आहेत, ते मिटायास दिले नाहींत, तर नीट उघडून पाहून त्यांचें सार्थक्य करण्यास दिले आहेत.

# पाठ ३०

## उद्योगानें काळाचा व्यय

एके दिवशीं मार्किस[1] स्पिनोली ह्यानें सरहार[2]सवीर ह्यांस विचारिलें, तुमचे बंधु कशानें मेले. हें कृपा करून सांगा. त्यानें उत्तर केलें, महाराज. तो अनुद्योगानें मेला. त्यावर स्पिनोली बोलला, हाय, हाय! तर कोणीका सेनापति असेना, त्याला मारायास तो रोग समर्थ आहे.

मोंटेस्क्यू म्हणून फ्रान्स देशांतला कोणी प्रख्यात ग्रंथकर्ता होता, त्यानें म्हणणें आहे कीं, स्वर्गलोकींच्या सुखामध्यें आपण प्रायः अनुद्योगाची गणना करितों, त्यापेक्षां नरकाच्या यातनांमध्यें त्याची गणना करावी हें बरें, असें आम्हांस वाटतें.

फ्रान्स देशांतील बास्तील नांवें जो कैदखाना त्यांत कोणी गृहस्थ सात वर्षेपर्यंत कोंडून ठेविला होता. तेव्हां तो कांहीं लहान टांचण्या आपल्या खोलींत विसरून,

---

१ मार्किस हा युरोपखंडांतला किताब आहे.

२ सरहाही एक किताब आहे.

पुनः त्या गोळा करून, एका मोठ्या खुर्चीच्या हातावर मांडून, त्यांनीं निरनिराळ्या आकृति करून, आपणास रमवीत असे. तेथून सुटल्यावर तो वारंवार आपल्या मित्रांस म्हणेकीं, हा उद्योग मला त्यावेळेस सुचला नसता, तर खचीत माझी शुद्धि गेली असती, अशी माझी खातरी आहे.

सरी नांवें इंग्लंडांत प्रांत आहे, तेथील कोणी एका गृहस्थापाशीं दरसाल दोन हजार रुपये उत्पन्नाची शेत जमीन होती, ती जमीन तो घरींच वहिवाटीत असे. पुढें दर वर्षीं त्यास तोटा बसून अर्धी जमीन विकणें, आणि अर्धी जमीन एकवीस वर्षांच्या कौलानें कोणी शेतकऱ्यास देणें, त्यास भाग पडलें. ही मुदत भरली नाहीं इतक्यांत तो शेतकरी जमिनीचा सारा घेऊन जाऊन त्या गृहस्थास म्हणाला, महाराज, आपली जमीन विकण्याची मर्जी आहे? गृहस्थानें उत्तर केलें, कां तुम्ही विकत घेतां काय? शेतकरी म्हणाला, होय, तुमची खुषी असली तर विकत घेईन, गृहस्थ म्हणाला, हें कसें? हें मोठें नवल वाटतें. तुमच्या जवळ जमीन आहे तिच्या दुप्पट माझे जवळ जमीन होती, आणि तिजबद्दल साराही मला

द्यावा लागत नव्हता, तरी तिच्यानें माझा निर्वाह होई ना. असें असतां जमिनीचा सारा फिटून जमीन, वि-कत घेण्यापुरता पैका तुम्हांस राहिला, हें कसें झालें? शेतकऱ्यानें उत्तर केलें, महाराज, दोन शब्दांनीं इतका फेर पडला. तुम्ही बोललां,जा, आणि मी बोलिलों, ये. त्याचा अर्थ काय? म्हणून गृहस्थानें विचारिलें; तेव्हां शे-तकरी म्हणाला, तुम्ही निजून राहिलां, किंवा तुम्हीं मनास मानवलें तसें केलें, आणि आपलें काम करावयास दुसरीं माणसें पाठविलीं. मी तर सकाळीं उठून आपल्या का-माची देखरेख स्वतां करीत गेलों.

जे राजे इंग्लंडच्या सिंहासनावर आजपर्यंत ब-सले, त्यांत आल्फ्रेद ह्या नांवाचा राजा मोठा शहाणा होऊन गेला. ज्यावेळचें त्यावेळेसच करावें, असें त्याच्या आयुष्याच्या हरएक तासास काम नेमलेलें असे. त्यानें अहोरात्राचे आठ आठ तासांचे तीन भाग केले; आणि त्याला मोठ्या वेदनेचें दुखणें असे तरी निद्रा, भोजन, आणि व्यायाम, ह्यांकडे आठच तास नेमले होते. बाकी सोळा तास राहिले त्यांतून आठ तास वाचन, लेखन, आणि भजन, ह्यांजकडे नेमलेले असत; आणि आठ तास सरकारी कामाकडे नेमलेले असत. त्यांतर वेळ

ह्मणजे क्षुल्लक गोष्ट आहे, हिचा व्यर्थ व्यय झाला तरी
ाय चिंता आहे, असें नाहीं; तर ही ईश्वरानें दिलेली
ोगी उंच देणगी आहे, आणि ही ज्यानें दिली त्याच्या
तवळच हिचा हिशोब दिला पाहिजे, अशी गोष्ट चोक
ाहे, असें त्या मोठ्या माणसाच्या अंतःकरणांत ठसलें
ोतें.

वेस्पेशन नामक रोमन चक्रवर्ती होता, त्याची
क लक्षांत राहावयाजोगी चाल होती, ती अशी कीं, रात्र
ाली ह्मणजे त्या दिवसांत आपण काय काम केलें त्या-
ा हिशोब तो आपणापासून घेई. कोणतेंही चांगलें
ृत्य केल्यावांचून दिवस गेला असें कधीं त्यास आढळे,
व्हां, माझा एक दिवस फुकट गेला, असें तो आपल्या
ेनचर्येच्या वहीवर लिहून ठेवी.

डाकूतर जानसन् नांवें प्रख्यात ग्रंथकर्ता त्याच्या
म्बुर नामक ग्रंथांत असा लेख आहे कीं, तरुण मुलीं
ी मंडळी शिवण्याच्या कामांत तत्पर झालेली कधीं
हज माझ्या दृष्टीस पडती, तेव्हां मी सदाचरणाच्या
ाळेंत आहें असें मला वाटतें; आणि जरी मला साध्या
ामांत, किंवा कशीद्याच्या कामांत, विशेष गम्य नाहीं,
री त्यांच्या नाइकिणीस त्यांचें काम पाहून जितका आनंद

होतो तितका मलाही होतो; कारण कीं कोणी एकटें रिकामें बसलें म्हणजे त्या रिकामपणामागें अनेक कुकल्पना भय, दुःख, वांछा, इत्यादि मनोवृत्ति धांवून येतात, आणि आत्म्याला पाशांत घालितात; तर ह्या शिवण काम शिकतात त्या शत्रूस घालवून देण्याचा चांगला उपाय करितात, असें मी मानतों.

---

## पाठ ३१

## दोन रुपयांची योग्यता

पिंपळगांवीं नारोपंत म्हणून एक गृहस्थ रहात असे; तो खाऊन पिऊन चांगला होता; व त्याला रामा म्हणून एक मुलगा होता. रामा तेरा वर्षांचा झाल्यावर नारोपंतानें आपला मुलगा मोठा विद्वान् व्हावा ह्या हेतूनें, त्याचा खाण्यापिण्याचा वगैरे सर्व नीट बंदोबस्त करून, त्यास पुणे शहरीं, एक्या मोठ्या शाळेंत चांगल्या भल्या विद्वान् पंतोजीच्या हाताखालीं विद्याभ्यास करावयास ठेविलें.

रामा हा गुणांनीं फार चांगला होता. त्याचा गुरु

त्यास जें जें सांगे तें तें तो जीव लावून शिके. त्यास खेळ ण्याचें किंवा दुसरें कांहीं दुर्व्यसन अगदीं नव्हतें. तरी रामा ज्या वर्गांत होता त्याच वर्गांत कांहीं मुलें होतीं त्यांस खाऊस, किंवा त्यांस पाहिजे तो खर्च करण्यास, घरून दोन दोन रुपये दरमाहां मिळत असत, तें पाहून त्यांसारखे आपणासही दरमाहां दोन रुपये असावे. असें रामास वाटून त्यानें आपल्या बापास एक पत्र लिहिलें. त्यांत मला दोन रुपये पाहिजेत म्हणून उघड तर लिहिलें नाहीं; परंतु माझ्या वर्गांतील सोबत्यांस खासगत खर्चास दरमाहां दोन दोन रुपये मिळतात, इतका मात्र मजकूर त्यानें आणिला होता.

नारोपंत फार चाणाक्ष होता, तें पत्र वाहातांच त्यां तील अभिप्राय त्यास समजला. तरी त्यानें असा विचार केला कीं, नाहीं असें साफ म्हणून मुलास खट्टू करणें, व त्याचें मन दुखविणें, हें नीट नव्हे; तर आतां पोरपणा मुळें दोन रुपये म्हणजे काय हें पुरें न समजून, अज्ञाना- नें तो ते मागत आहे; त्याकरितां दरमाहां दोन रुपयां- पासून खाऊ खाण्यापेक्षां दुसरे जे चांगले थोर थोर उप- योग बहुत घडतात, ते त्यास नीट समजावून, सांगावे, म्हणजे तो शाहाणा होऊन आपल्या आपणच दोन रु-

पये मागेनासा होईल. असा योग्य विचार करून नारोपंतानें रामास पुढील पत्र लिहिलें.

अनेक अशीर्वाद, विशेष, त्वां पाठविलेलें पत्र पाहून आम्हांस मोठा संतोष झाला. तुझ्या पत्राचा सर्व अभिप्राय समजून, हें उत्तर लिहिलें आहे, त्यास हें त्वां चांगलें लक्ष्य देऊन वाचावें, म्हणजे तुला आमचा सर्व मानस कळेल.

पाऊण शेर पीठ व पावशेर दूध असलें, म्हणजें तेवढ्यानें एका बाप्याचें पोट चांगलें भरून त्यास प्रकृति न बिघडतां दिवसभर धंदा करण्याची शक्ति असती; आणि तितक्या पिठास व तितक्या दुधास मिळून रोजचे दोन आणे लागतात, तर त्याप्रमाणें दोन रुपयांत एक मनुष्याचें पोट सोळा दिवस चांगलें भरेल.

आपल्या त्या देशांत मजूरदार गड्यास दोन आणे रोज मिळतात, व लावणी कापणीच्या वगैरे चणचणीच्या दिवसांत त्यांस कांहीं जास्ती मिळतें. तें सर्व एकत्र धरून वर्षाची सरासरी करून पाहतां त्यांस चार रुपये दरमाहा पडतात. त्यांची बायका मुलें कांहीं मोलमजूरी करून सुमारें एक रुपया दरमाहा काढितात, एकूण पांच रुपये झाले. तितक्यावर नवरा बायको

व तीन मुलें अशा पांच मनुष्यांस अन्न वस्त्र व राह-
ण्यास जागा इतक्या गोष्टींची यथास्थित सोय होती. आ-
णि त्याप्रमाणानें दोन रुपये दरमाहा असले, म्हणजे दोन
मनुष्यांचा चांगला निर्वाह होईल.

ज्यांच्या पदरीं लहान लहान मुलें लेंकरें फार,
व ज्यांच्या घरीं दारिद्र म्हटलें तर अठरा विश्वे, असे लो
क ह्या आपल्या गांवांत बहुत आहेत. आतां आपण
जर दोन रुपये खर्चून त्यांतून चौघांस दरमाहां आठ आ-
ठ आण्याचे दाणे घेऊन दिले, तर ते लोक आपला मोठा
उपकार मानतील; व तेवढ्या दाण्यांनीं त्यांच्या मुलांबा-
ळांस सकाळची भाकरी खायाला मिळेल. ह्याप्रमाणें आ-
पण दोन रुपये खर्चल्यामुळें चार कुटुंबांतील माणसें
रात्रंदिवस आपणास दुवा देत जातील.

ज्यांस राहावयास स्वत्तेचें घर नाहीं, व ज्यांच्या
कुटुंबांचीं माणसें पुष्कळ, असे गरीब लोक आपल्या शा
जारीं, बहुत आहेत त्यांस चार आण्याखालीं साधारण
देखील घर भाड्यानें राहावयास मिळत नाहीं. आणि
आपण जर दरमाहा दोन रुपये खर्चून तशीं सात आठ
घरें भाड्यानें घेऊन तीं जर तशा लोकांस फुकट राहावया
स दिलीं, तर ते लोक आपले केवढे उपकार मानतील, व

ईश्वरापाशीं आपलें किती कल्याण चिंततील बरें ?

खेडेगांवांत वाचणें वगैरे साधारण विद्या शिकवि-ण्याकरितां ज्या शाळा असतात, त्यांत महिना एकेका मुलास दोन दोन आण पडतात. आणि इकडे जर आपण दरमाहां दोन रुपये खर्चले तर ज्यांच्या आईबापांस दरमाहां दोन आणे खर्चण्याचें सामर्थ्य नाहीं, अशा सोळा मुलांचें चांगलें शिकणें होईल. आणि शहरांतल्या शाळांत ज्यांत वाचणें, लिहिणें, व हिशोब, वगैरे व्यापारास उपयोगीं पडणाऱ्या विद्या शिकवितात. तेथें तरी दरमाहां चारच आणे पडतात. त्याकरितां तिकडे जरी दरमाहां दोन रुपये खर्चले, तरी तितक्यांत आठ मुलांचें चांगलें शिकणें हो-ऊन त्यांस कोणताही धंदा करण्याचें ज्ञान येईल.

हे तुला प्रकार सांगितले इतक्या प्रकारांनीं दरमाहा दोन रुपये परोपकाराकडे लावितां येतात. आतां द-रमाहां दोन रुपये खर्चून स्वहित करून घेण्याचे एक दोन प्रकार तुला सांगतों. मला ठाऊक आहे कीं, तुला नकाशे व परदेशांतील पांखरांचीं व जनावरांचीं चित्रें ह्यांचा फार शोक आहे, आणि दरमाहां दोन रुपये ह्याप्रमाणें रुपये जमविले, तर वर्षाच्या कांठीं तुझे जवळ चोवीस रुपये जमून तुला ते नकाशे व तीं चित्रें पुष्कळ घ्यावयास

सांपडतील

तसाच तुला प्राचीन संस्कृत कविता वाचण्याचा भारी छंद आहे, व हल्लीं पुण्यांत पाठशाळेंतील छापखान्यांत तसलीं बहुत नाटकें व चंपू छापीत आहेत; तर दोन रुपये दरमाहाचे दरमाहां जर पुस्तकें घेण्याच्या कामास त्वां लाविले, तर किती पुस्तकें तुझ्या संग्रहास पडतील बरें? आणि तसेंच हीं चित्रें व पुस्तकें तुझ्या जिवांत जीव आहे तों पर्यंत तुझ्या, व तुला ईश्वरीकृपेनें जर पुढें मुलें बाळें झालीं, तर त्यांच्या, व तुझ्या मित्रांच्या, अशीं किती लोकांच्या उपयोगीं पडतील बरें? आणि दरमाहां त्वां जर दोन रुपयांना खाऊ खाल्ला, तर खाशील तेव्हां मात्र काय एक घटका, अर्धि घटका, त्या पदार्थांची गोडी तुझ्या गळ्यांत आहे तेथपर्यंत मात्र तुला सुख होईल; आणि ती गोडी गेली म्हणजे पुनः कांहीं नाहीं.

दोन रुपये दरमाहां खर्च करून स्वहित किंवा परहित होण्याचे असे आणखी बहुत रस्ते आहेत, ते सर्व सांगण्यास शंभर पत्रें देखील पुरणार नाहींत; असो, हे जे तुला दरमाहां रुपये खर्चण्याचे कांहीं मार्ग लिहिले आहेत त्यांचें नीट चांगलें मनन कर. आणि त्या गोष्टी जर तुला चांगल्या वाटल्या, तर तूं आपल्या मित्रांस त्या सांगून त्यांस ही

शाहाणें कर . तुला दरमाहां दोन रुपये देण्यास माझा असं तोष आहे असें तूं समजूं नको; परंतु त्यापासून असे चां- गले उपयोग घडत असतां व्यर्थ खेळ घेण्यास, व मेवामि ठाई खाण्यास, ते खर्चणें हें तुजसारख्या समजूतदारास व विचाऱ्यास योग्य आहे असें मला दिसत नाहीं . बहुत काय लिहिणें हे अशीर्वाद .

ज्यांतील अर्थ फार उघड आणि हृदयंगम, व जें त्यास थोरपणा देऊन त्याचें मनोहरण होईशा गोड गोड शब्दांनीं लिहिलेलें, असें हें पत्र पाहून रामास फार आनंद झाला, व आपणास दरमाहां दोन रुपये खाऊस असावे असें जें त्याच्या डोक्यांत वेड शिरलें होतें तें सर्व गेलें. मग त्या चांगल्या उपदेशाबद्दल त्यानें आपल्या बापाचे मो ठे उपकार मानून, हें पत्र दाखवून त्यानें आपले मित्र ही शाहाणे केले.

सारांश, कांहीं प्रसंगीं आईबापांनीं मुलांस रागें भरलें पाहिजे, व त्यांस दटावलें पाहिजे; परंतु सुगम उपायांनीं जर त्यांचें मन वळायाजोगें आहे, तर तेच उ पाय सुज्ञांनीं बहुशः प्रथमतः योजावे हें चांगलें.

---

# पाठ ३२

## आत्मसंयमन

घड्याळाचे नऊ ठोके वाजले, तों नऊ वाजल्या वर क्षणभरही जागूं नये. अशी आईची आज्ञा होती तिचें स्मरण हरिला झालें; मग त्यानें आपल्या सदाशिव नामक वडील भावास त्या आज्ञेचें स्मरण दिलें. सदाशिव म्हणाला, कांहीं चिंता नाहीं, एथें नामी आगटी पेटलेली आहे, मी एथें राहून हिचें सुख भोगीन. हरीनें उत्तर केलें, एथें चांगली आगटी आहे खरी; मलाही एथें राहून हिचें सुख भोगण्याची होस आहे; पण राहिलों तर आत्मसंयमन होणार नाहीं; होईल काय सदू? सदाशिव म्हणाला, झकमारतोस, मी एथून कांहीं हालणार नाहीं, हें तुला खचीत ठाऊक असूंदे; मग हरी बोलला, तर मी जातों; तूं खुशाल बैस.

त्या दोघां मुलांनीं नित्य साहा वाजतां उठावें असा क्रम त्यांच्या आईबापांनीं लावून दिला होता; त्याप्रमाणें दुसरे दिवशीं साहा वाजतां हरी दचकून उठला; तेव्हां थंडीचा कडका इतका पडला होता कीं, फिरून

निजावें असें त्याचें मन वळलें; परंतु त्याला फिरून अ सें वाटलें कीं, आत्मसंयमन करण्याचा हा प्रसंग चांग ला आला आहे, म्हणून आतां निजूं नये; असा विचार करून तो नानू केल्यावांचून झटकर धडपडून उठला. त्याचा भाऊ सदाशिव निजला होता; त्यास हाका मारू न म्हणाला, सदूरे, सदू, सहा वाजले; पहा हे तारे क से चमकतात ते. गुंगीच्या व त्रासाच्या शब्दानें सदू बोलला, मला असूंदे. हरीनें उत्तर केलें, बरें तर, खु शाल नीज. असें म्हणून, जसा कुकुडकुंभा पक्षी प्रातः काळीं उल्हासी होतो तसा उल्हासी होऊन, माडी उत- रून, खालीं धांवत गेला. संस्कृत भाषेचा पाठ संपल्या- वर न्याहारीच्या अगोदर करवाची रपेट करावयास त्या ला अवकाश सांपडला; ह्यावरून तो ताजा तवाना, व टवटवीत होऊन आला; आणि त्याला चांगली भू क लागली; इतकेंच केवळ नाहीं; आणखी त्याची आ- नंदवृत्तिही झाली. बिचारा सदाशिव हा तर देवभक्ती- च्या वेळेची घांट वाजली तों तुकताच आंथरुणावरू न धडपडत उठला होता. तो तोंड उतरल्यासारखा, व द्राष्ट, व थंडीनें कुडकुडलेला, व असंतोषी होऊन, खालीं आला. हरीच्या आंगीं कांहीं विनोदीपणा होता; तो सदू

केविलवाणें तोंड पाहून त्याची मस्करी करणार होता, इतक्यांत त्याला स्मरण झालें कीं, आत्मसंयमन केलें पाहिजे. त्यानें असा विचार केला कीं, सदूला थट्टा सोसवत नाहीं, व त्याचें मन खट्टू झालें असतां तर अगदींच सोसवत नाहीं; म्हणून त्यानें आपली थट्टा दाबली. थट्टा दाबणें हें बरेंच आत्मसंयमन केल्यावांचून होत नाहीं.

न्याहारीच्या वेळेस हरीच्या बापानें त्यास वचन दिलें कीं, पाऊस पडला नाहीं तर जेवणाचे पूर्वी करड्या तट्टूवर बसवून तुला बरोबर नेऊं. त्या गोष्टीचा हरीला फारच संतोष वाटला, आणि तो सकाळचें काम करीत असतां त्या गोष्टीची आठवण त्यास फार वेळां झाली. बैठकीच्या खोलीच्या खिडकींतून ऊन चांगलें पडलें, आणि सगळा दिवस तसाच चांगला जाईल, अशी उमेद आली; परंतु दुपारचे सुमारें कांहीं अभाळ आलें, आणि खालच्या अंगणांतील चिपांवर पावसाचे कांहीं मोठमोठे थेंब पडलेले पाहून हरी दचकला; तरी नेमलेल्या वेळेस त्यानें टोपी पांघरून बाहेर जाण्याची तयारी केली, आणि घोडे केव्हां येतील त्याची वाट पाहात आपल्या चाबुकाशीं खेळत माजघरांत उभा राहिला. त्याची आई

त्याजजवळून जातांना म्हणाली, आवडत्या मुला, आज कांहीं स्वारी व्हावयाची नाहीं, अशी मला शंका येती; विपा चिंब भिजल्या आहेत, हें तूं पाहातोस ना? हरी म्हणाला, आवडते आई गे, मला पावसाच्या थोडक्याशा थेंबांचें भय वाटतें, अशी कल्पना तुझ्या मनांत येती काय? हें काय? पाऊस आला तरी एकसर मात्र येईल.

इतक्यांत त्याचा बाप तेथें आला, त्यानें पहिल्यानें अभाळाकडे पाहिलें, मग वायुमापकयंत्राकडे पाहिलें, आणि मान हालविली. हरी म्हणाला, बाबा, तुझा जाण्याचा बेत आहेना? बापानें उत्तर केलें, मला काम आहे, मला गेलेंच पाहिजे; तरी, हरीबाळा, आज त्वां घरीं रहावें, हें तुला बरें आहे. हरी फिरून म्हणाला, मीं टोपी पांघरून बंदोबस्त चांगला केला आहे; त्या पावसाच्या शिंतोड्यांनें मला किंचित् तरी अपकार होईल असें तुम्हाला वाटतें काय? बाप म्हणाला, होय, हरीबाळा, त्या पावसाच्या शिंतोड्यानें देखील तुला अपकार होईल, असें मला वाटतें; कांकीं, तुझें दुखण्याचें आंग आहे; आणि पावसाचा शिंतोडाच येऊन राहील, असें नाहीं, त्याहून मोठा पाऊस येईल, असा संभव आहे. त्या प्रसंगीं त्या गोष्टीचा निर्णय तुजवरच ठेवूं. मला ठा-

ऊक आहे कीं, तुझ्या आंगीं आत्मसंयमनाचें कांहीं सामर्थ्य आहे; मी इतकेंच म्हणतों कीं, तूं आज जर बाहेर गेलास, तर तुझी आई अस्वस्थ होईल, आणि तुझ्या आईस व मलाही आज तुझें जाणें अनुचित दिसतें; आतां तूंच ह्या गोष्टीचा ठराव कर, जावें कीं न जावें.

— हरीनें फिरून अभाळाकडे, मग विपांकडे, मग स्वारीच्या जोडयाकडे, शेवटीं आपल्या कृपाळू आईकडे पाहिलें; तेव्हां त्याला आत्मसंयमनाची आठवण झाली. त्यानें आपल्या मनांत विचार केला कीं, आज आपणास आत्मसंयमन करण्याचा जो सर्वोत्कृष्ट प्रसंग तो हाच आहे. असा विचार करतांच, करडया तट्टूवर खोगीर ठेवण्याची गरज नाहीं, हें रामा मोतादरारास सांगावयास बाहेर धांवत गेला.

त्याच दिवशीं जेवणाचे वेळेस सदू एक पोळी चट्ट केल्यावर आईस म्हणाला, आणखी एक पोळी मला द्यावी. हरिला आई म्हणाली, हरीबाळा, तुला आणखी पाहिजे काय? पहिल्यानें हरीनें उत्तर केलें, कृपा करून आणखी पोळी द्यावी; मग आपलें पान गुंडाळून म्हणाला, नको आतां; कां तर इतक्यांत त्यानें विचार केला कीं, मीं खाल्ली तितकी पुरे; ती भूकेहून अधिक

झाली, आतां हा आत्मसंयमन करण्याचा प्रसंग आहे.

जेवण झाल्यावर त्याची धाकटी बहीण त्यास म्हणाली, हरीदादा, फार दिवस झाले तूं बोलला होतास कीं, तें सुंदर कोडें कसें करावें हें तुला दाखवीन; तर तें केव्हां दाखविशील? हरी म्हणाला, मी आतां कामांत आहें, माझे चांगले ताई, तूं आतां मला छळूं नको; असें ऐकतांच ती कांहीं बोलली नाहीं; तोंड हिरमुसलें करून आपल्या भावाजवळच उभी राहिली. मग एकाएकीं त्याला आठवण होऊन तो म्हणाला, बरें तर, तुझें कोडें मजकडे घेऊन ये; नंतर आपलें पुस्तक ठेवून, कोडें कसें करावें हें त्यानें आपल्या धाकट्या बहिणीस भलाईनें दाखविलें. रात्रीस दोन्ही मुलें निजायाला गेलीं तेव्हां आत्मसंयमन करण्याचे जे प्रसंग आले होते त्यांची आठवण होऊन हरीचें चित्त प्रसन्न झालें, आणि आपल्या भावास सांगावयासाठीं त्याच्या ओंठपर्यंत शब्द आले होते, तों त्यानें विचार केला कीं, सांगूं नये, हा दुसरा एक प्रसंग आत्मसंयमन करण्याचा आहे; मी एक शब्द बोलणार नाहीं; आणि हेंही आहे कीं वल्गना केली तर सगळ्याचा नाश होईल. ह्यावरून हरी मुकाट्यानें निजला, आणि हे शाहाणपणाचे विचार

केले, जरी मला एक मोठी निराशा झाली होती, आणि म्यां आपली मर्जी मोडून कितीएक गोष्टी केल्या, तरी हा दिवस मला सुखाचा गेला. आत्मसंयमन हें प्रथम क्षणभर दुःखकारक आहे, पण परिणामीं गोड आहे, असा मला अनुभव आला आहे. त्या बेतानें मी नित्य चाललों तर आयुष्य सुखानें घालवीन, असा संभव आहे.



# पाठ ३३

## भूतदया

इंग्लंड देशांत आलफ्रेड म्हणून एक मोठा विख्यात राजा होऊन गेला, त्याच्या फौजेचा मोड डेन्स लोकांनीं केल्यावर तो समरसेटशीरनामक प्रांतांतील आथेलनी नांवाच्या गांवांत जाऊन गुप्तपणें राहिला. तो तेथें असतां पुढें लिहिलेली गोष्ट घडून आली, जिजवरून त्या महा पुरुषास केवढीं मोठीं संकटें प्राप्त झालीं तीं ध्यानांत येतात; आणि धर्मबुद्धि व परोपकारबुद्धि त्याला मोठी होती त्याला ही गोष्ट प्रमाण होय. ती गोष्ट अशी आहे कीं, ज्या ल्हानशा वाड्यांत तो रहात असे तेथें एक भिकारी

येऊन भीक मागता झाला. राणीनें राजास सांगितलें कीं आपल्याजवळ एक लहानशी भाकर मात्र राहिली आहे, ती आपणांस आणि जे आपले सोबती अन्नाच्या शोधाकरितां बाहेर गेले आहेत, ज्यांस अन्न मिळेल असा भरंवसा देखील नाहीं, त्यांस पुरावयाजोगी नाहीं; तरी राजानें उत्तर केलें कीं, त्या गरीब ख्रिस्त्यनास अर्धी भाकर दे. ज्याच्यानें पांच भाकरी आणि दोन मासे इतक्यांनीं पांच हजार मनुष्यांस तृप्त करवलें. त्याला ही अर्धी भाकर आमच्या गरजेस पुरून उरेशी निःसंशय करवेल. हें ऐकून राणीनें त्या भिकाऱ्याला अर्धी भाकर दिली. आणि राजानें हें जें मोठें औदार्यानें धर्मकृत्यं केलें, त्याचें फळ त्याला तत्काळ झालें; तें असें कीं, त्याचीं जीं माणसें अन्नाच्या शोधास गेलीं होतीं, तीं ईश्वराच्या कृपेनें पुष्कळ अन्न घेऊन आलीं.

हालंड नामें देशांत जटफेन नामक गांवाजवळ इंग्लिश आणि डच्च यांची लढाई मागें झाली होती, तींत सरफिलिपूसिद्नी त्या नांवाचा नामांकित सरदार होता; त्यानें पराकाष्ठेचें शौर्य दाखविलें. त्या लढाईत त्याच्या मांडीखालीं दोन घोडे गोळ्या लागून मेले; आणि तिसऱ्या घोड्यावर तो चढत असतां मोर्च्यांच्या खंदकांतून

एक बंदुकेची गोळी लागून त्या सरदाराच्या मांडीचें हाड मोडलें. मग तसाच घोड्यावर बसून तो तेथून समारें पाऊण कोश लांब आपल्या डेऱ्यास परत गेला. शरीरांतून रक्त फार गेल्यामुळें कासावीस झाला, व उन्हामुळें तृषाक्रांत झाला, म्हणून त्यानें प्यावयास पाणी मागितलें; तेव्हां कोणेकानें लवकर भांडें भरून पाणी त्याजला आणून दिलें. तें भांडें तो आपल्या तोंडाकडे नेत आहे इतक्यांत कोणी लोक एका जखमी शिपायास तिकडून घेऊन जात होते; त्याशिपायानें त्या भांड्याकडे डोळे लावून टोंकावलें. तें पाहून तो शूर आणि उदार पुरुष पाण्याचा घोट घेणार इतक्यांत ओंठांपासून भांडें एकीकडे काढून, बाबा, मजपेक्षां तुला गरज मोठी आहे, असें बोलून तें पाण्याचें भांडें त्या शिपायास दिलें.

फ्रेदरिक नांवें जो प्रुशिया देशाचा राजा होऊन गेला, त्यानें एके दिवशीं चाकरास बोलावण्याची घांटवा जविली असतां कोणी चाकर जवळ आला नाहीं. मग त्यानें दार उघडून पाहिलें, तों आपला हुजऱ्या हाताच्या खुर्चीवर बसून गाढ झोंपीं गेला आहे, असें पाहिलें. राज त्याजवळ जाऊन त्यास जागें करणार इतक्यांत

त्याच्या खिशांतून कांहीं बाहेर निघालेलें पत्र त्यानें पाहिलें. त्या पत्रांत काय लिहिलें आहे तें पाहाण्याची इच्छा राजास होऊन, त्यानें तें पत्र काढून घेऊन वाचलें. तें पत्र त्या हुजऱ्याच्या आईकडून आलेलें होतें. त्यानें जें आपल्या वेतनांतून तिचें संकट निवारण्याकरितां द्रव्य पाठविलें होतें, त्याबद्दल त्याचा उपकार मानल्याचा मजकूर त्यांत लिहिलेला होता; आणि शेवटीं, तूं पुत्रधर्मास जपतोस, म्हणून ईश्वर तुझें कल्याण करील असा लेख होता.

पत्र वाचल्यावर राजा हळूच आपल्या खोलींत परत गेला; आणि होनांची पिशवी घेऊन ती पिशवी व तें पत्र हुजऱ्याच्या खिशांत हळूच घातलें; मग आपल्या खोलींत फिरून गेल्यावर त्यानें इतकी मोठ्यानें घांट वाजविली कीं, हुजऱ्या जागा होऊन राजाकडे तत्काळ गेला. राजा त्यास म्हणाला, अरे, तुला गाढ झोंप लागली होती! तेव्हां कोणता बहाणा सांगावा तें त्यास सुचेना. त्या गडबडींत सहज त्याचा हात दैवयोगानें खिशांत गेला, तों होनांची पिशवी त्याच्या हातास लागली. तेव्हां चपापून ती पिशवी त्यानें बाहेर काढली. मग पिशवीकडे पाहातांच त्याचें तोंड उतरलें, आणि

कांहीं बोलवेनासें होऊन त्यास रडें कोसळलें. राजा म्हणाला, अरे, काय झालें? तूं रडतोस कशासाठीं? तो मुलगा राजाच्या पायांपडून म्हणाला, महाराज, माझा घात कोणी करूं पाहतो; माझ्या खिशांत जें हें मला सांपडलें त्याची मला कांहीं माहिती नाहीं. राजानें उत्तर केलें, माझ्या मित्रा. आपण झोंपीं गेलों असतांही परमेश्वर आपलें कधीं कधी कल्याण करितो. आतां ही पिशवी आपल्या मातुश्रीकडे पाठवून, राजानें तुझें कुशळ विचारलें आहे, म्हणून सांग; आणि तुझें व तिचें मी प्रतिपालन करीन, असें माझें वचन तिला कळीव.



# पाठ ३४

## व्यवसायी विल्यमदेवी

## त्याची गोष्ट.

विल्यमदेवी म्हणून इंग्लंडदेशांत कोणी गृहस्थ होता; तो देवनशीर प्रांतांतील चद्ली नामक गांवच्या शिवारांत सन्न १७४२ त्यावर्षी जन्म पावला. त्या ठिकाणीं त्याचे बापाची घरची कांहीं शेतजमीन होती, तिजवर तो रहात असे. विल्यमदेवी हा अगदीं लहान होता तेव्हांच त्याच्या आंगीं शिल्पविद्येची बुद्धि आहे, असें दिसूं लागलें. तो आठ वर्षांचे वयांत असतां, त्याच्या शेजारीं कोणी पवनचक्की बांधीत होता, ती पाहून त्यानें चाकूनें लांकडाचे तुकडे तासून जोडून हुबेहूब त्या मासल्याची चक्की केली.

त्याच्या बापाच्या मनांत होतें कीं, त्याला पुढें पाद्री करावें, म्हणून त्या पदवीची जी विद्या पाहिजे ती त्याला यावी, ह्या हेतूनें बापानें त्यास एक्सटर नामें शहर येथील शाळेंत घातलें. त्या शाळेंत त्यानें लातिन व ग्रीक त्या भाषांचा चांगला अभ्यास करून प्रवीण विद्यार्थ्यांची

अब्रू मिळविली. तरी त्याची लहानपणापासून जी शिल्प विद्येकडे आसक्ति होती ती त्यानें सोडली नाहीं.

तो अठरा वर्षांचा झाला तेव्हां आक्सफोर्ड नामें शहर येथील पाठशाळेंत विद्याभ्यास करण्याकरितां प्रविष्ट झाला. तेथें चालीप्रमाणें बाचिलर आफ आर्टस ही पदवी त्यास यथाकाळीं मिळाली. त्यानें जो पुढें धर्मावर सर्व विषयक प्रख्यात ग्रंथ केला, तो करण्याविषयींची कल्पना त्या पाठशाळेंत असतां त्याचे मनांत प्रथम आली; आणि तेथें असतां ज्या ज्या नामांकित ग्रंथांत जीं जीं वाक्यें आपल्या ग्रंथास उपयोगीं अशीं त्यास आढळलीं, तीं तीं उतरून घेऊन एका चोपडींत लिहून ठेवण्यास त्यानें आरंभ केला.

पाठशाळेंतून निघाल्यावर एक्सटर येथील बिशपानें[+] धर्मोपदेशकाची दीक्षा देऊन आपल्या इलाख्यांतील मोर्टननामक गांवच्या असिश्टन पाद्रीच्या कामावर त्यास नेमिलें. मग कांहीं दिवसांनंतर त्याचे जवळ लसूटली म्हणून दुसरा एक गांव आहे तेथील असिश्टन पाद्रीचे कामावर सालीना चारशें रुपये वेतनाची

+ बिशप म्हणून ख्रिस्तियन धर्मांतील एक अधिकारी आहे.

नेमणूक होऊन त्याची बदली झाली.

आपण पुढें मोठा ग्रंथ करणार त्याच्या उपोद्घाता दाखल धर्मोपदेशाचीं साहा पुस्तकें त्यानें सन्१७८६ त्या वर्षी, आश्रय मिळवून, छापून प्रसिद्ध केलीं. त्या कामांत त्याला तोटा आला, कारण कीं, त्याला आश्रय देणा ज्यांपैकीं कितीएकांस आपण घेतलेल्या प्रतींचा पैसा भरून देण्याचा विसर पडला. त्यामुळें बुकें छापून देणाऱ्याचें देणें हजार रुपयांवर त्याचे आंगावर राहिलें.

त्यास असा तोटा झाला तरी त्याची हिंमत खचली नाहीं. त्यानें आपला शोध पुढें चालवून ग्रंथ समाप्तीस आणला. ग्रंथ लिहून तयार झाल्यावर त्यानें शोध करून पाहिलें, तों, ग्रंथ विस्तृत आहे म्हणून त्यास छापण्यास खर्च वीस हजार रुपये लागतील, असें त्यास समजलें. इतका खर्च आपल्या सामर्थ्याच्या बाहेर आहे, असें समजून त्यानें पुनः आश्रय मिळवून ग्रंथ छापण्याचा बेत धरला; आणि त्याप्रमाणें आश्रय मिळविण्याचे कागद लिहून जिकडे तिकडे पाठविले; परंतु त्याला आश्रयाचीं नांवें जीं मिळालीं तीं इतकीं थोडीं होतीं कीं, कोणी पुस्तक विकणाऱ्यास तें पुस्तक छापण्याची जोखीम आपल्या आंगावर घेण्याचें धैर्य

होईना.

त्यामुळें देवीसाहेबानें, आपणच स्वतां आपल्या हातीं ग्रंथ छापावा, असा निश्चय केला. मग आपणा जातीनें एक प्रेस तयार करून, आणि एक्सटर येथील कोणी एका छापखानेवाल्यापासून रद्द, टाकाऊ, असे कांहीं ठसे विकत घेऊन. छापण्याचें काम आरंभिलें. त्या कामास हात बोट लावणारी एक मोलकरीण बायको मात्र होती; म्हणून ठसे जोडणें व प्रेस दाबणें हीं कामें तो आळीपाळीनें आपणच करीत असे. तरी हा युक्तिवान् आणि व्यवसायी पुरुष त्यानें तीनशें पृष्ठांपर्यंत चाळीस प्रती छापण्याचा उद्योग चालविला.

त्याचा प्रेस लहान होता म्हणून एका दाबांत एकच पृष्ठ छापून निघत असे. आतां आपल्या कामास सर्व विद्वान् लोकांचा आश्रय निःसंशय मिळावयाजोगा बराच मोठा मासला तयार झाला आहे, अशी त्याची खातरी होऊन त्यानें आपलें काम तहकूब केलें. मग रायल्सोसयटी त्या नांवाची राजाच्या आश्रयानें विद्या कला कौशल्य वाढविणारी मंडळी, आक्सफोर्ड आणि केंब्रिज त्या नांवाचे विद्यालयगण, बिशपांपैकीं कितीएक बिशप, आणि नवीन पुस्तकांचे गुणदोष प्रद-

र्शक जे प्रसिद्ध ग्रंथ ह्यांचे रूनें त्यास ग्रंथास कांहीं प्रती पाठविल्या; आणि त्यांपैकीं कोणाकडून तरी आपणास हिमायत आणि आश्रय मिळेलच मिळेल. असा निश्चय धरून मोठ्या उत्कंठेनें त्याची वाट पाहात बसला.

तो वाट पाहतां पाहतां दमला; कोणाकडून ही आश्रय मिळाला नाहीं. त्याप्रमाणें दुसऱ्यानेंही निराश झाला. तरी तो आपला बेत सोडीना. पहिली जी त्याची हिंमत होती ती तशीच शाबूत असून त्यानें सोडलेलें काम पुनः हातीं धरलें. एका गोष्टीविषयीं मात्र त्यानें आपला बेत फिरविण्याचा निश्चय केला; तो असा कीं, विद्वान् लोकांस वगैरे जे नमुने पाठविले त्यांत त्या ग्रंथाच्या सत्तावीस प्रती गेल्या; त्या प्रतींचा उपकार कोणीं मानला नाहीं; त्यास्तव त्या प्रती संपविण्याविषयीं आपण कांहीं मेहनत घेऊं नये; परंतु आपण ज्या चवदा प्रती ठेविल्या आहेत, त्यांचा मात्र पुढला ग्रंथ छापावा; त्यांत आपली मेहनत व कागद दोन्ही वांचतील.

मग तेरा वर्षें एकसारखा श्रम करून आपला विलक्षण उद्योग शेवटास नेऊन तो संतोष पावला. ग्रंथ तयार झाला तेव्हां एका पुस्तकांत अष्टपत्री सांच्याचीं पांचपांचशें पृष्ठें अशीं त्याचीं सत्तावीस पुस्तकें झालीं.

हे ऐकून वाचणाऱ्यांस केवढें आश्चर्य वाटलें असेल!
तसेंच दुसऱ्याच्या मदतीची गरज न ठेवितां त्यानें च-
वदा प्रतींचीं सर्व पुस्तकें आपल्या हातानें बांधिलीं, आ-
णि जातीनें लंडनशहरास जाऊन तेथील जे साधा-
रण पुस्तकसंग्रह होते त्यांत एक एक प्रत ठेविली.

असें विल्यमदेवीसाहेबानें थोड्या फायद्याच्या
कामांत आपलें आयुष्य घालविलें. हें पाहून आपणास
हसूं येतें खरें, तरी त्यानें मोठा विलक्षण व्यवसाय के-
ला, हें आपण कबूल केलें पाहिजे. ह्या व्यवसायाचा
प्रयोग त्यानें शाहाणपण्याच्या कामाकडे केला असता,
तर बरें होतें, आणि ज्यापासून अगदीं थोडा उपयोग
अशा कामास जें धैर्य, युक्ति, आणि श्रम, ह्यांचा खर्च
त्यानें केला; तो ज्यापासून आपणास आणि लोकांस
उपयोग व्हावा अशा कामाकडे केला असता, तर बरें
होतें, ही गोष्ट खरी आहे. तरी मोठ्याच्या आश्रया
वांचून कोणतेंही काम शेवटास जाणार नाहीं, अ-
शी लोकांची समजूत असतांना आपणास तसा
आश्रय नाहीं म्हणून त्यानें धैर्य सोडलें नाहीं, परंतु
मोठ्या व्यवसायानें आपला उद्योग चालवून शेवटास

नेला . त्याविषयीं त्याची तारीफ करणें योग्य आहे.



# पाठ ३५

## बंधुप्रीति

सार्जंटग्लानूविल् त्या नांवाचा एक प्रख्यात वकील होता. त्याच्या बापापाशीं मालमत्ता पुष्कळ होती, ती वडील मुलास द्यावी असा त्याचा बेत होता; परंतु तो मुलगा दुर्गुणी निघाला, व फिरून तो वाटेवर येईल अशी आशाही राहिली नव्हती; म्हणून म्हातान्यानें मरतेसमयीं ती सर्व मालमत्ता धाकटा मुलगा जो सार्जंटग्लानूविल् त्याला दिली. बाप जिवंत असतां वडील मुलास तो म्हणत असे कीं, मी तुला दौलत देणार नाहीं, धाकट्यास देईन; तें त्यास असें वाटत असे कीं, म्हातारा रागावून जें बोलतो हें उगीच धाक दाखविण्याकरितां आहे, परंतु बाप मेल्यावर तें सारें खरेंच, असें त्याच्या अनुभवास आलें; म्हणून तो फार

---

+ सार्जंट म्हणून इंग्लंडांत वकिलांची एक पदवी आहे.

खिन्न झाला, आणि दुर्व्यसन सोडून चांगल्या रीतीनें वागूं लागला.

हें त्याच्या धाकट्या भावानें पाहून एके दिवशीं आपल्या मित्रांस मेजवानीस बोलाविलें; त्यांजबरोबर आपल्या वडील बंधूसही भोजनास बोलाविलें; मग पक्वान्नांनीं वाढलेलीं ताटें सर्वांपुढें ठेविल्यानंतर, एक झांकलेलें ताट होतें तें वडील भावापुढें ठेवून हें ताट आपण उघडावें; असें भावास सांगितलें. त्यानें ताट उघडून पाहिलें तों तें कागदपत्रांनीं भरलेलें असें त्याच्या दृष्टीस पडलें. तेव्हां त्या वडील भावास किती आश्चर्य वाटलें असेल!

सार्जेंट ग्लानविल् आपल्या भावास म्हणाला, बापानें जी दौलत ठेविली तिचे हे कागदपत्र आहेत. अलीकडे तुझी वर्तणूक चांगली झाली आहे, हें आम्ही सारे पाहात आहों. अशीच तुझी वर्तणूक बाप जिवंत असतां जर त्याच्या दृष्टीस पडती, तर जी काय व्यवस्था तो करता म्हणून मला ठाऊक आहे, ती व्यवस्था आज मी करणार. यास्तव बापानें दिलेली सर्व मालमत्ता मी आपल्या खुशीनें तुझ्या स्वाधीन करतों; असें म्हणून सर्वांदेखत सारी मालमत्ता त्यानें वडील भावास

दिली.

गोंवें हें हिंदुस्थानांत पोर्तुगीस लोकांचें मोठ्या भरभराचें स्थान होतें. त्या गोंव्यास जाण्याकरितां सन्न १५८५ त्या वर्षी पोर्तुगीस लोकांनीं लिसबन नांवाच्या शहरापासून गलबतें हांकारलीं; त्यांपैकीं एका गलबतावर खलाशी नोर देऊन जाणारे, पाद्री, आणि का- बासी पाद्री, असे सर्व मिळून बाराशें मनुष्यांत कमीन व्हतीं. गलबत निघून चालतें झाल्यावर तें प्रथम क- रळीन चाललें होतें; परंतु फार दिवस गेल्यावर त्या गलबतावरच्या कारण्याच्या हेंकडपणामुळें तें गलब त खडकावर लागलें; तेव्हां तत्क्षणींच त्यांवर मृत्यूनें डोळे वटारले, म्हणजे एका क्षणांत आपणांस मरण येतें असें मंडळीस वाटलें. असें होतें, तों इतक्यांत ज- हाजावरील कपतानानें, समुद्रांत होडी टाका, म्हणून हुकूम देऊन होडी टाकविली, आणि तींत कांहीं अन्न टाकून एकोणीस मनुष्यांनिशीं आपण होडींत उडी घातली. न जाणों होडी बुडेल, त्या भयानें त्या मनुष्यां नीं हातांत तरवारी घेऊन होडींत दुसऱ्या येणाऱ्यांचा प्रतिबंध केला.

त्याप्रमाणें त्यांचा सरंजाम थोडा असून, मार्ग

शोधून काढावयास साधन होकायंत्र जवळ नाहीं, दैव वशात् जो पाऊस पडणार त्याखेरीज गोडें पाणी हो-डींत नाहीं, असें असतां ही त्यांनीं हिंदूमहासागरांत ती होडी हांकारली, चार पांच दिवस झाले तों कपूतान अजारी पडून मृत्यु पावला; तेव्हां अव्यवस्था नव्हावी, आणि कोणी एक नियंता असावा, म्हणून त्या मनुष्यांस आपणांपैकीं कोणी एक मुख्य नेमणें जरूर पडलें. मग त्या नेमलेल्या अधिकाऱ्यानें पाहिलें तों बहुतेक अन्न सम्पलें, आतां फार तर तीन दिवस निभावतील इतकें उरलें आहे, असें पाहून त्यानें ही युक्ति काढली कीं, चि-ठ्या टाकून दर चवथ्या चिठ्ठीस ज्याचें नांव निघेल त्या-ला होडीवरून खालीं पाण्यांत लोटावें. हें त्याचें म्ह-णणें सर्वांनीं मान्य केलें. तेव्हां एक कपतान, एक उपा ध्या, आणि एक सुतार, त्या तिघांस सर्वांच्या अनुमतानें माफी मिळाली होती, म्हणून दुःखित मंडळींतून चार जणांस मरणें भाग पडलें.

चिठ्या निघाल्यावर तीस मनुष्यांनीं आपलें पा-तक कबूल करून पाद्रीपासून+ पापाची निर्मुक्ति करून घेऊन, दुर्दैवानें जें काय प्राप्त झालें तें त्यांनीं भोगलें, म्हणजे पाण्यांत मृत्यु पावले. चवथा पाळी, पार्तुगाल

+ रोमन क्याथोलिक धर्माचा हा एक संस्कार आहे.

देशाचा एक गृहस्थ त्यांत होता त्याजवर आली, तेव्हां त्याला होडींतून ढकलणार इतक्यांत त्याचा धाकटा भाऊ त्याच होडींत होता त्यानें मोठ्या कळवळ्यानें आपल्या भावाच्या गळ्यास मिठी घातली, आणि डो ळ्यांत आंसवें आणून त्याला विनंती केली कीं, तुझ्या बद्दल मला मरण्याची आज्ञा दे.

त्याविषयीं त्यानें बहुत कारणें दाखविलीं कीं, तुझें लग्न झालें आहे, आणि गांव्यास तुझीं बायको मुलें वाट पाहात असतील; त्याखेरीज आपल्याती न बहिणी आहेत त्यांचा सर्व भार तुजवरच आहे; त्यांचा सांभाळ तुलाच केला पाहिजे. मी काय एकटा फटिंग आहें, बायकोनापोर. मी मेलों तरी कांहीं चिंता नाहीं, आणखी तुझ्या वांचून त्यां जगावें त्यापेक्षां मरावें हें बरें. असें बोलून, तुझ्या मरणाबद्दल मला मरणाची परवानगी दे, म्हणून भावाला त्यानें शप थ घातली.

असें त्यानें औदार्य व धैर्य पाहून वडील भाऊ थक्क झाला, आणि गहिंवर येऊन म्हणाला, ई- श्वरेच्छेनें हें मला मरण प्राप्त झालें आहे; तर मा झ्या मरणांबद्दल दुसऱ्यानें मरावें हें अनुचित आणि

फार वाईट आहे; तशांत तूं माझा भाऊ, तुझे मजवर फार उपकार आहेत, तेव्हां माझ्या बद्दल तुला मरण्यास मी कसें अनुमोदन देईन? इतकें सांगितलें तरी तो धाकटा भाऊ ऐकेना. त्यानें वडिलाच्या पायांस इतकी बळकट मिठी मारली कीं, त्या सर्व मंडळीच्यानें ही सोडवेना.

त्याप्रमाणें कांहीं वेळ संभाषण झाल्यावर वडील भावानें धाकट्यास समजावून सांगितलें कीं, आतां माझ्या मुलांचा तूंच बाप हो, आणि माझी बायको व बहिणी त्यांचा सांभाळ तूंच कर, असें त्यानें सांगितलें, तरी तो धाकटा भाऊ आग्रह सोडीना. शेवटीं वडील भावानें आपल्या धाकट्या भावाचा बंधुधर्म पाहून आपला आग्रह सोडला, आणि आपल्या बद्दल शूर व तरुण अशा आपल्या भावास मरावयास आज्ञा दिली. तदनंतर धाकट्या भावास होडीवरून खालीं पाण्यांत लोटून दिलें आतां ही गोष्ट सांगणें योग्य आहे कीं, हा बंधुधर्म तत्पर मनुष्य पाण्यांत लोटला असतां मरण पावला नाहीं; त्यास कारण असें झालें कीं, त्यास पाण्यांत लोटल्यावर लागलीच जमीन दुरून दृष्टीस पडली. इतक्यांत मंडळीनें त्याला होडीवर घेण्याविषयीं यत्न करून

वर घेतलें; नंतर थोड्यास वेळानें मोजांबीक खा-
डीच्या तीरास ते सारे सुरक्षित येऊन पोंचले.

---

# पाठ २६.

## सेंटबर्नर्ड एथील मठवासी

## त्यांचे स्पान्यल जातीचे कुतरे.

ग्रेटसेंटबर्नर्ड ह्या नांवाचा जो मठ आहे, तो स्वित्सर्लंड आणि सावाय ह्या दोन देशांच्या मधील जे आंल्पसनामक पर्वत त्यांवर जे मोठे भयाचे आणि बिकट घाट आहेत त्यांपैकीं एका घाटाजवळ, त्याच मठाच्या नांवाचा एक डोंगर आहे, त्याच्या माथ्याजवळ आहे. ह्या प्रांतांमध्यें अभ्रांवांचून कितीएक दिवस जरी गेले, आणि बर्फावर सूर्यकिरण पडून तें चकचकत असलें, आणि रादोद्रेंद्रान नामक झाडांचीं तांबूस रंगाचीं फुलें वारा पाऊस लागून कधीं मळीन होणार नाहींत असें दिसत असलें, तरी मोठ्या झपाट्यानें वारा आणि पाऊस एकाएकीं उत्पन्न होऊन वाटसरांस

गांठितात, असें वारंवार होत असतें.

असा प्रसंग आल्यावर बर्फाचे लोट वाऱ्यासरसे वाहून जाऊन रस्ते बंद होतात; आवलांश, म्हणजे बर्फाच्या किंवा थिजलेल्या पाण्याच्या मोठमोठ्या धोंडी, सुटून वाऱ्यानें खोऱ्यांत वाहून जातात, आणि आपल्या झपाट्या बरोबर झाडें व डोंगराचे खडपे मोडून नेतात.

त्या मठांतील भंक, म्हणजे जोगी, हे आतिथ्यतत्पर असतात. त्यांस उत्पन्न थोडेंच आहे, तरी जो कोणी वाटसरू येतो त्याचें आगतस्वागत सत्कारानें करतात. कोणी थंडीनें कांकडला, किंवा कोणी चालतांना थकला, किंवा कोणाला संध्याकाळ झाला, म्हणजे पुरे; इतक्यावरच जोगी त्यास चांगली जागा देतात, उत्तम भोजन घालतात, आणि प्रियकर संभाषण करितात.

ते दुःखितांचा एवढा समाचारच घेऊन राहतात, असें नाहीं. ज्या दुर्दैव वाटसरांस वाऱ्या पावसानें घेरून घेतलें, आणि ज्यांस आपण धर्मबुद्धीचें साहाय्य न केलें, तर ते मरणार, अशांचा शोध करण्याच्या भयंकर कामास देखील ते झटतात. त्या धर्मकृत्यामध्यें त्यांस विलक्षण मदत मिळते. त्यांच्या जवळ उमद्या कुत्र्यांची

एक जाति आहे, ज्या कुतऱ्यांच्या विलक्षण चातुर्याच्या योगानें मरणाच्या पाळींत सांपडलेल्या वाटसरांचा उद्धार त्यांस करतां येतो.

थंडीनें कांकडलेला, चुकलेल्या वाटेचा शोध करतां करतां थकलेला, आणि हिमानें ज्याचीं इंद्रियें बधिर होत चाललीं आहेत, असा बिचारा वाटसरू भुईवर पडतो, आणि बर्फाचा लोंढा येऊन त्यास मनुष्याच्या दृष्टीचे आड करतो. अशा प्रसंगीं त्या नामी कुतऱ्यांची हुंगण्याची शक्ति आणि त्यांचा हुकमीपणा हीं उपयोगीं पडतात. मरणोन्मुख झालेला वाटसरू बर्फाखालीं दाहा फूट, किंबहुना वीस फूट, जरी गढलेला असला, तरी त्याला हुंगण्यानें शोधून काढण्याची त्यांची शक्ति इतकी तीव्र आहे कीं, तेणेंकरून त्या मनुष्याच्या वांचण्याचा संभव होतो.

ते कुतरे आपल्या पायांनीं बर्फ उकरून काढतात, आणि घोगऱ्या व गंभीर शब्दानें भोंकण्याचा दाहो मांडतात; तो ऐकून मठांतील जोगी व त्यांचीं चाकरमाणसें त्यांस मदत करावयास धांवून येतात. एखादे वेळेस मनुष्यांच्या मदतीवांचून दुर्दैव वाटसरास कुतऱ्यांनीं उकरून काढलें असतां, त्यास वांचण्याचें सा-

धन मिळावें म्हणून ते जोगी एका कुतऱ्याच्या गळ्यास दारूची कुपी बांधतात, अशासाठीं कीं, त्या कासावीस झालेल्या माणसानें तींतून थोडीशी दारू जिवांतजीव येण्याकरितां प्यावी, आणि एका कुतऱ्याचे पाठीवर डगलें बांधितात, अशाकरितां कीं, थंडावलेल्या माणसानें तें आपल्या आंगावर घ्यावें, अशी तरतूद कुतरे पाठवितांना तेकरतात.

हे चमत्कारिक उद्योग बहुतकरून सफळ होतात, आणि जरी बर्फांतून काढलेल्या माणसाचा जीव फिरून आणण्याचा उपाय नाहीं चालला, तरी त्या कुतऱ्यांनीं उकरून काढलेलें प्रेत कोणी त्याच्या मित्रांनीं येऊन ओळखावें म्हणून तें ठेवितां येतें. तेथें थंडीचा इतका गुण आहे कीं, तें प्रेत दोन वर्षेपर्यंत जरी ठेवलें, तरी त्याचा तोंडवळा नासल्या बिघडल्यावांचून जसाचा तसाच राहतो.

त्या नामी कुतऱ्यांपैकीं एक कुतरा होता, त्यानें बेवीस माणसांचे जीव वांचविले, त्या गोष्टीचें चिन्ह असावें म्हणून त्याच्या गळ्यांत एक पदक बांधलेलें होतें. हीं मनुष्यें त्या कुतऱ्यानें चातुर्यें करून वांचविलीं नसतीं, तर तीं मेलीं असतीं. सेंटबर्नर्डघांटावरून गे-

लेल्या बहुत वाटसरांनीं तो कुतरा पाहिला आहे, आणि मठाजवळच्या आगटीभोंवतालीं बसून शेकतांना मठवाल्यांच्या तोंडानें त्याचें विलक्षण चरित्र ऐकिलें आहे.

स्मारें संन १८१६ त्या वर्षी तो कुतरा एका गरीब वाटसरास त्याच्या चिंताग्रस्त कुटुंबाकडे पोहोंचविण्याच्या कामगारींत मेला. ती गोष्ट अशी; पीएदमोंट नांवें देशाचा कोणी एक जासूद त्या डोंगराखालच्या खोऱ्यांत सेंटपीएरनामें एक खेडें होतें, ज्यांत त्याचीं बायकोमुलें राहत होतीं, त्यांकडे मोठ्या कष्टानें चालला असतां, त्या सेंट बर्नर्डनामक मठापर्यंत येऊन पोहोंचला. ते दिवस मोठ्या वाऱ्यापावसातुफानाचे होते. मठांतील जोगी त्यांनीं त्याला पुढें कुटुंबाकडे न जाण्याविषयीं फार फार सांगितलें, परंतु तें व्यर्थ झालें; तो ऐकेना तेव्हां मठवाल्यांनीं त्याबरोबर दोन चाटाडे आणि दोन कुतरे दिले. त्या कुतऱ्यांत ज्यानें बेचीस माणसें वांचविलीं तो कुतरा होता. मग ते डोंगरावरून खालीं उतरत असतां, एकाएकीं बर्फाची धोंड वरून पडून ते सारे दडपून मेले; आणि त्या बिचाऱ्या गरिबीचीं मुलें माणसें त्याची बातमी काढण्याकरि

तां मोठ्या श्रमानें वर चढून येत होतीं, तींही त्या अन-र्थांत सांपडून मेलीं, असा सर्वांचा नाश झाला.



# पाठ ३७

## मातापितरांची भक्ति.

तुमच्या मातापितरांच्या आज्ञा ईश्वराच्या आज्ञांशीं विरुद्ध नसल्यास, त्या कानीं पडतांच, अलंघ्य अशा समजून, अनन्यभावानें तुम्हीं मानाव्या. जे आईबाप तुम्हांपेक्षां फार केलेले पाहिलेले आहेत, त्यांहून आपण शहाणे असा अभिमान बाळगूं नका. आणि जरकरतां ईश्वरकृपेनें तुम्हांस त्यांच्यापेक्षां विद्या अधिक झाली, किंवा संपत्ति अधिक मिळाली, तर तुम्हीं त्यांची हेळणा करूं नका. त्यांशीं तुमची वागवागणूक नेहमीं मर्यादेची असावी; तुमचे शब्द त्यांजजवळ नेहमीं प्रीतीचे असावे; आणि विशेषेंकरून उलट जाब नजाण्याविषयीं, व दुर्मुख न होण्याविषयीं, तुम्हीं फार जपत जावें. जर कधीं ते तुमच्या छंदास आड आले, तर तुम्हांवर जी त्यांची प्रीति आहे ति त्य-

वांचून दुसरें कांहीं कारण नाहीं. असें समजावें. त्यांनीं जे जे श्रम तुम्हांसाठीं केले आहेत, व जीं जीं दुःखें तुम्हांसाठीं भोगिलीं आहेत, त्यांचें स्मरण ठेवून तुम्हीं त्यांच्या आज्ञाभंगापासून दूर राहावें; आणि तुम्हांकरितां ज्यांनीं पूर्वीं दुःख सोशिलें, अशा त्यांच्या मायाळू अंतःकरणास फिरून तुम्हीं दुःख न द्यावें. मुलांनीं आईबापांवर ममता केली, त्याचीं उदाहरणें पुढें लिहिलीं आहेत. तीं पाहून त्या मुलांनीं चांगलें केलें असें मानून त्यांचा कित्ता घ्यावा.

पोलंददेशाचा जो चौथा बोलसूलास नांवाच राजा, तो आपल्या बापाची तसबीर सोन्याच्यां घरां‍त बसवून सर्वदां आपल्या गळ्यांत घालून बाळग‍त असे. तो कधीं एखादी मोठी गोष्ट करणार, किंव बोलणार असे, तेव्हां त्यानें आपला आवडता उपदेश क, म्हणजे ती तसबीर, तीस हातीं घ्यावें, आणि तिच मुका घेऊन म्हणावें कीं, माझ्या आवडत्या बाबा तुझ्या नांवास अयोग्य अशी गोष्ट मजपासून घड नये.

एतना म्हणून एक ज्वलत्पर्वत आहे, त्यापास न एके वेळ मोठें धूर, ज्वाला, दगड, आणि वितुळलेल

पदार्थांचा रस निघूं लागला, त्यासमयीं आसपासच्या देशांतील लोकांस आपला बचाव करण्याकरितां आपलीं घरें दारें सोडून दूर जाणें प्राप्त झालें. त्यावेळेस ज्याला ज्याला जो जो पदार्थ फार योग्यतेचा वाटला, तो तो पदार्थ ते घेऊन जाऊं लागले; अशा गर्दीत व धांदलींत दोन पुरुष भाऊ भाऊ आपल्या धनाच्या व मालमत्तेच्या संरक्षणाच्या काळजींत असतां, त्यांच्या आईबापांची आठवण त्यांस झाली, कीं. तीं उभयतां फार म्हातारीं, स्वतः पळून जाऊन आपलें संरक्षण करण्यास समर्थ नाहींत. मातापितरांच्या भक्तीपुढें दुसरी कोणतीच कल्पना त्यांच्या मनांत राहिली नाहीं. ते उदार तरुण म्हणाले, ज्यांनीं आम्हांस जन्म दिलें, त्यांपेक्षां अधिक योग्यतेचा निधि आम्हांला कोठें सांपडणार आहे? असें म्हणून एकानें बापास आणि एकानें आईस खांद्यावर घेतलें आणि चोहींकडे धूर व ज्वाला पसरल्या असतां त्यांतून वाट काढून ते पार निघून गेले. हें कृत्य ज्यानीं पाहिलें त्यांस आनंद आणि आश्चर्य वाटलें. त्या आनंदकारक गोष्टीची आठवण राहावी, म्हणून ज्या मार्गानें ते आईबापांस घेऊन गेले, त्या मार्गास त्या दिवसापासून

साधूंचें क्षेत्र, असें नांव दिलें आहे.

आक्‌शम्‌ येथें जी मोठी मख्यात लढाई झाली, जिच्या योगानें आकूटेव्यस त्यास जगाचें प्रभुत्व प्राप्त झालें, ती लढाई झाल्यानंतर आकूटेव्यस हा सामोस येथें असतां आंतोनी, जो त्याचा शत्रु, त्याच्या पक्षाचीं जीं मनुष्यें पाडाव झालीं होतीं त्यांची चोकशी करण्या करितां त्यानें सभा केली. त्यासमयीं दुखण्यानें व दुर्दैवानें फार गांजलेला, मेटेलस नांवाचा एक म्हातारा मनुष्य, इतर बंदिवानांबरोबर सभेमध्यें बादशाहापुढें शिपायांनीं आणिला. त्या सभेमध्यें त्या म्हाताऱ्याचा पुत्र न्यायाधीशमंडळींतला एक होता. पहिल्यानें पुत्रानें बापास ओळखिलें नाहीं; शेवटीं त्यास त्याच्या तोंडवळ्याची आठवण होऊन उदार तरुणानें, हा माझा बाप होय, असा अंगीकार करण्याविषयीं किमपि लाज न धरितां त्या म्हाताऱ्यास आलिंगन करण्या साठीं धांवून जाऊन रडण्याचा अनर्थ मांडला. मग धर्मासनाकडे परत येऊन तो आकूटेव्यस त्यास म्हणाला, हे महाराज, माझ्या बापानें आपलें वैर केलें आहे, आणि मीं आपल्या हाताखालीं कामगारी केली आहे, तो शिक्षेस योग्य आहे, व मी बक्षिसास योग्य

आहें; तर आपणापाशीं मी हेंच मागणें मागतों कीं, माझ्या करितां आपण त्याचा जीव राखावा; नाहीं तर त्याजबरोबर माझाही जीव घेण्याचा हुकूम करावा. त्या हृदयभेदक गोष्टीनें सर्वांस दया याची, तसेंच झालें. सर्व न्यायाधीशांचीं हृदयें दयार्द्र झालीं, आणि आक्टेव्यस त्यासही कळवळा येऊन त्यानें त्या म्हाताऱ्यास जीवदान देऊन सोडून दिलें.

देसिमस त्या नांवाचा चक्रवर्ती राजा होता, त्यानें आपला पुत्र जो देस्यम त्यास राज्याभिषेक करावा, अशी इच्छा धरून त्या गोष्टीविषयीं बेत केला; परंतु राजकुमारानें तें मला नको म्हणून, मोठ्या आग्रहानें नाकारलें. तो म्हणाला, मला भय वाटतें, न जाणों, मी चक्रवर्ती झालों तर मग मी पुत्र आहें त्याचा विसर कदाचित् मला पडेल. चक्रवर्ती असून आज्ञाभंजक पुत्र असावें, त्यापेक्षां चक्रवर्ती नसून आज्ञापालक पुत्र असावें, हें मला बरें वाटतें. तर माझ्या बापानेंच चक्रवर्तीपणा भोगावा, आणि तो जी जी आज्ञा मला करील ती ती म्यां शिरसा मानावी, हेंच माझें राज्य असावें. त्यावरून तो समारंभ राहून राजपुत्रास राज्याभिषेक झाला नाहीं. जर कोणी कल्पना करील कीं, त्याचें जें वि-

लक्षण पुत्रधर्माचें कृत्य केलें हाच त्यानें त्या मुकुटापेक्षां मोठा मुकुट मिळविला, तर ही गोष्ट नीटच आहे; असें नसेल तर राज्याभिषेक झाला नाहीं असें म्हणावें.

---

## पाठ ३८

## उंट

लंडन शहर आणि इंग्लंडांतील दुसरीं मोठमोठीं शहरें ह्यांच्या रस्त्यांतून उंटवाले शहरच्या लोकांस दाखविण्याकरितां उंट कधीं कधीं फिरवितात, तेव्हां हा पशु तेथल्या राहणाऱ्यांच्या दृष्टीस पडतो; तरी इंग्लंडांतील खरबरीत व चिखलानें भरलेल्या फरसबंदीवरून चालतांना हा प्राणी स्वदेशांतल्यापेक्षां दुःखानें दिवस काढतो. इंग्लंडदेशाची हवा न मानल्यामुळें हा प्राणी तेथें अशक्त असतो; कष्टेंकरून रडक्या चालीनें रेंगत रेंगत जातो; आणि मंद दुबळा, व निकामीसा दिसतो; परंतु जेथें उष्ण आणि वाळवेचीं मेदानें आहेत, असा जो त्याचा मुळचा जन्मदेश

आहे, त्या देशाची सोय पाहून हा प्राणी ईश्वरानें उत्पन्न केला आहे.

त्या देशांत फार दुःख नहोतां ताहान, भूक, व श्रम सोसण्याजोगी त्याची प्रकृति व देहरचना ईश्वरानें केली आहे. रुखी आणि रेतीची जी जमीन तिजवर हलकें पाऊल पडावें असे त्याचे पाय ईश्वरानें केले आहेत. वावटळीनें उडून चाललेली रेती त्याच्या नाकांत भरूं नये म्हणून त्याच्या नाकपुड्यांस मिटण्याची सोय ईश्वरानें करून दिली आहे. अन्नाच्या कोठ्यांत पाणी सांठवून ठेवण्याचें एक विशेष प्रकारचें साधन ईश्वरानें त्यास करून दिलें आहे, त्याच्या योगानें एका विहिरीपासून दुसऱ्या विहिरीपर्यंत शेंकडों कोस लांब, फारसें दुःख नहोतां, त्यास चालून जातां येतें.

त्याप्रमाणें आलेप नामक शहरापासून बसरा शहरापर्यंत सुमारें आठशें मैल लांबीचा पट्टा आहे, त्यांत विश्रांतीस झाड किंवा प्यावयास पाणी मिळावयाजोगें नाहीं, एकसारखें रेतीचें मैदान आहे. त्यांतून व्यापारी लोकांची मंडळी चालली असतां त्यांचा ओझेली उंट सुमारें साहाशें सातशें पौंडांचें ओझें घेऊन

रोजरोज वीस मैलांप्रमाणें करवानें मजला मारतो. आणि मउया स्वाराचाउंट एकपुरुष आणि थोडेसें ओझें घेऊन त्याच्या दुपटीचे चालीनें दुप्पट मजला करतो.

हें जनावर आपलें काम करतांना मोठें सोसक असतें. सारवान हुकूम करतो तेव्हां तें गुडघे टेंकून बसतें, आणि आपलें ओझें घेऊन आनंदानें उठतें. कंटाळवाणी एकसारखा जो त्याचा चालून जाण्याचा पल्ला तो चालतांना त्याला हांकायास चाबूक नलगे, व आर नलगे. इतर कितीएक जनावरांप्रमाणें हें जनावर फार नादप्रिय आहे; म्हणून चालतांना जेव्हां तें दमतें तेव्हां सारवान आरबीगाण्यांतील एक उत्साह आणण्याचा तुटका गाऊं लागतो, त्याच्या नादाच्या आनंदाखालीं त्याला हुशारी येऊन, तें पहिल्यापेक्षां झटपटीनें चालूं लागून, विसांव्याची वेळ येईपर्यंत चालतें; मग आपल्या पाठीवरचें ओझें सारवानानें कांहीं वेळपर्यंत उतरावें म्हणून फिरून गुडघे टेंकून बसतें.

डोईवर सूर्य मोठा प्रखर, पायाखालची जमीन रखरखीत, नित्य चालण्याचा मोठा श्रम, चार चार दिवस उपास पडतात, आणि झंकडों मैलांपर्यंत तहान भोंडायास एक वेळच पाणी मिळालें तर मिळतें,

इतकें जरी दुःख आहे तरी तें सर्व सुखानें सोसून हें जनावर आनंदवृत्ति दिसतें.

बहुत करून उंट मोठ्या व्यापर्गेन वांचतो, अणि त्याला दुखणें कचित् लागतें, त्याचें कारण पाहिलें तर ईश्वरानें जो त्याला स्वभाव दिला आहे त्याच्या अनुसारानें त्याची वागणूक असती. इंग्लंडामध्यें त्याच्या स्वभावावर जुलूम होतो, आणि ईश्वरानें त्याला ज्या हेतूस्तव उत्पन्न केलें तो हेतु तेथें सिद्धीस जातनाहीं.

एशियाखंडाच्या ज्या देशामध्यें मनुष्यें प्रथमच विद्याचाराच्या पंथास लागूं लागलीं, त्या देशांत मनुष्याच्या सुधारणुकीच्या कामांत उंट बहुप्रकारांनीं फार उपयोगीं पडला आहे.

एशियाखंडांत मध्यें मध्यें मोठमोठीं रखरखीत मैदानें आहेत, अशा देशांत जर हें जनावर नसतें, तर कोठें कोठें जी सुपीक स्थळें आहेत, तेथें मात्र मनुष्याचें परस्पर दळणवळण झालें असतें; आणि त्या अफाट खंडांतल्या एका प्रांतांतील जिन्नस दुसऱ्या प्रांतांत नेऊन त्याच्या बदला त्या प्रांतांतील जिन्नस त्या प्रांतांत आणणें हें कधीं घडलें नसतें. उदीम म्हणजे काय, हें तर कोणास ठाऊक झालें नसतें.

विद्या तर कांहीं प्रांतांतच कोंडून राहिल्यामुळें तिची वाढ खुंटून अगदीं जर्जरीत झाली असती. जसें काय एखादें एतद्देशीय अप्रयोजक रानझाड असतें, त्यावर दुसऱ्या देशांतील झाडाचें कलम आणून पेवंदी करी तोंपर्यंत त्याचीं फळें कांहीं कामाचीं नसतात, तशी विद्येची गति झाली असती.

उंट जर नसता तर मिसर देशांतील विद्या आज देशोदेशीं पसरली आहे, ती पसरली नसती; आणि एशियाखंडांतील जिन्नस पश्चिमेकडील देशांत जाऊन मुख्यत्वेंकरून ज्या विषयसुखाची रुचि युरोपखंडांतील लोकांस लागली आहे, ती लागली नसती. आणि जसे दक्षिण अमेरिकाखंडांतील लोक रानटी आहेत, तसे बहुत लोक आजवर अडाणी राहिले असते. दक्षिण अमेरिका खंडांतील लोक अगम्य पर्वत व मोठालीं रेतीचीं मैदानें त्यामुळें ज्यांचें दुसऱ्या देशांशीं दळणवळण होत नाहीं म्हणून जसे रानटी राहिले, तसे ज्याची सुधारणा लवकर झाली असे बहुत लोक आजपर्यंत रानटी राहिले असते. तस्मात् उंट म्हणून मनुष्यांचें कल्याण करणारा प्राणी आहे, आणि धैर्य धरून दुःख सोसण्याचा कित्ता घालणारा आहे, असें

असें त्याला मानलें पाहिजे. आणि सर्व प्रकारानें उपयोगीं, व सर्व प्रकारानें चांगला असा हा प्राणी ईश्वरानें उत्पन्न केला आहे, त्यांत त्याचें चातुर्य व कृपालूपणा केवढा आहे, याचा विचार करून त्या ईश्वराचा उपकार मानला पाहिजे.

---

## पाठ ३९

## झोंप.

झोंप ही ईश्वराची मोठ्या कृपेची देणगी आहे. बहुत वेळां झोंप घेऊन तुम्हांस विश्रांति झाली आहे, तरी त्या अवस्थेविषयीं विचार करण्यास तुम्हांला कदाचित् ही पहिलीच वेळ असेल. कोण जाणे, त्यांत कांहीं विशेष नाहीं, असें तुम्हांस वाटत असेल; परंतु ईश्वराच्या कृपेच्या ज्या करामती आहेत त्यांतील झोंप-ही एक करामत आहे; आणि तिचें मनन करण्यांत हासील आहे.

आपणांस नकळतां आपणांस झोंप लागती,

हें ईश्वराच्या शहाणपणाचें प्रमाण होय. झोंपला गण्याच्या प्रकाराचा शोध जर आपण करावयास लागलों, तर त्यानेंच झोंपेंचे निवारण होते. आपण विचार करण्याचें काम सारें बंद केल्यावांचून आपणास झोंप लागावयाची नाहीं. झोंप न बोलावतां येते; ह्या अवस्थेंत विचाराचा कांहीं संबंध नसतो. झोंप आणण्याविषयीं आपला जितका जितका प्रयत्न अधिक, तितकी तितकी झोंप आपणापासून दूर होते. झोंप मनुष्यास आवश्यक असून सुखकारक अशी ईश्वरानें करून ठेविली आहे; आणि ही झोंप मनुष्याच्या ज्ञानशक्तीच्या व इच्छेच्या पलीकडे आहे.

हा विचार असाच पुढें चालवून, झोंप लागल्यावर आपली किती चमत्कारिक अवस्था होते ती पहा. आपण जिवंत असून, जिवंत आहें हें आपणास समजत नाहीं; हृदयाचें उडणें, रक्ताचें वाहणें; भक्षिल्याचें पचणें, निरनिराळ्या रसांचें उत्पन्न होणें, एकून शरीरांतील सर्व कामें खळ न पडतां, व अव्यवस्था न होतां, यथास्थित चालतात. आपला जीवात्मा झोंपेंत अगदीं स्तब्ध, म्हणजे व्यापारशून्य, होतो;

आणि जागृत्यवस्थेमध्यें जे विषय मनांत भिन्न भिन्न रूपानें भासत असतात, ते विषय जशी जशी झोंप लागत जाते तसे तसे एकमेकांत मिसळत जातात. इंद्रियें मंद होत होत आपला व्यापार सोडतात. स्नायूंची गति मंद होतां होतां शेवटीं शरीराचा सर्व ऐच्छिक व्यापार बंद राहतो. एकून झोपीं गेलेल्या मनुष्याची अवस्था हरतऱ्हेनें चमत्कारिक आहे. तितकी चमत्कारिक दुसरी अवस्था मनुष्यास मिळावयाजोगी बहुत करून एकच राहिली आहे. जो कोणी ह्या झोंपेचा विचार करील त्याला त्या दुसऱ्या अवस्थेची आठवण होईलच होईल. ही दुसरी अवस्था कोणती म्हणाल तर मृत्यु होय. तुम्हांला न कळतां आतां जशी झोंप येते, तसें तुम्हांला पुढें न कळतां मरण येईल. त्याच्या येण्याचे पूर्वी तुम्ही तयार असा. राहिलेल्या वेळाचें सार्थक्य करा, आणि तुमचीं चित्तें ज्ञानमार्गाकडे वळतील असा तुम्ही आपल्या आयुष्याच्या दिवसांचा शुमार पाहा.

# पाठ ४०

## विद्यामंदिराची यात्रा एका विद्यार्थ्यानें केली तिच्या पहिल्या मजलांचें वर्णन

विद्यामंदिराची यात्रा करण्याकरिनां प्रस्थान करण्यास मला प्रथम बोलावणें आलें. तेव्हां जी माझी सुखाची व आनंदाची स्थिति होती ती पराकाष्ठेची होती, म्हणून कांहीं असंगळ आसवें माझ्या नेत्रांतून गळाल्यावांचून माझें पहिलें पाऊल पुढें पडलें नाहीं. माझ्या वयाचे कितीएक सोबती मजबरोबर निघाले, आणि आम्ही सर्व मिळून स्नेहभावानें बराच मार्ग चाललों.

आम्ही मार्गास लागलों, इतक्यांत तीन ठेंगणीं अनोळखी मनुष्यें त्यांनीं आम्हांस हटकलें; तेव्हां शत्रु सैन्यगोल बांधून आम्हांवर येत आहे, असें जें आम्हीं पाहिलें, त्याच्या आघाडीचीं हीं माणसें आहेत,

असें आम्हांस लागलेंच समजलें. त्या सैन्यांतील मनुष्यांचीं स्वरूपें पाहूं लागलों तों फारच वेडींविद्रीं दृष्टीस पडलीं. कितीएक वाटेवर ढेंगा पसरून उभीं होतीं; दुसरीं कितीएक कोंपर बाहेर काढून कमरेवर हात ठेवून उभीं होतीं; कोणी माना खालीं करून होतीं; कोणी तरतरीत उभीं होतीं; कोणी एका पायावर उभीं होतीं; कोणी दोन पायांवर उभीं होतीं; आणि एकाची गोष्ट तर फारच चमत्कारिक आहे कीं, तें तीन पायांवर उभें होतें; दुसऱ्या एकाचे हात आडवे एकावर एक असे उरावर ठेवले होते; एक तर तीन ठिकाणीं वांकडें होतें; कोणी फार कृशांगीं होतीं; आणि कितीएकांची उंची व रुंदी सारखीच होती. असे त्यांचे आकार भिन्न भिन्न होते; तरी जेव्हां युद्ध करण्याच्या फऱ्यांमध्यें त्यांची रचना झाली, तेव्हां त्यांचा मेळ आणि थाट चांगला दिसला.

शत्रु पुष्कळ आहेत असें पाहून आम्ही प्रथम घाबरलों, आणि तत्क्षणीं मागें हटण्याच्या खुणेची तुतारी वाजविण्याचा बेत धरिला. परंतु आमच्या नायकानें पुढें जाण्याविषयीं आम्हांस फार नेट लावल्यामुळें अघाडीच्या तीन मनुष्यांस आम्ही लवकर जिंकलें.

त्यावरून मोठे सैन्याशीं युद्ध करण्याची हिंमत येऊ-
न रणभूमि सोडण्याचे पूर्वी झाडून साऱ्यांस आम्हीं
जिंकून टाकलें . असा हा जय मिळवून आम्ही नुक-
तासा दम खात आहों , इतक्यांत शत्रूंच्या कुमकेस
आलेला मोठा जमाव समोरच्या बाजूवर येऊन उभा
ठाकला , तो पाहून आम्हांस मोठी दहशत पडली.
त्या जमावांतील माणसांची संख्या आणि पहिल्यासै
न्यांतील माणसांची संख्या केवळ बराबर होती ; प-
रंतु त्याची उंची आणि स्थूळपणा फारच अधिक हो
ता ; त्यांची आणि पहिल्यांची जात तर एकच होती,
परंतु हीं महाकाय वंशांतलीं होतीं ; आणि हल्ला कर-
ण्याच्या कामांत हीं अग्रेसर होतीं . त्यांस पाहून आम
चें धैर्य पहिल्यानें फार खचलें , परंतु त्यांच्या शरी
राप्रमाणें त्यांच्या आंगीं बळ नाहीं , असें आम्हांस ला-
गलेंच समजलें , आणि मागल्या लढाईनें धैर्य आणि
कसरत आम्हांस प्राप्त झाली होती , म्हणून त्यांस जिं-
कण्याचा आम्हीं जो उद्योग केला तो लवकर सफळ
झाला ; आणि आम्ही जयजयकार करीत रणांगणां-
तून चाललों .

त्यानंतर शत्रूंच्या लहान लहान टोळ्या आम्हां पुढें येत, त्यांशीं आम्ही घडी घडी लढाई करूं. शत्रु युद्धाचा फरा धरून तर पुढें येत नसत, परंतु दोन दोन, तीन तीन, चार चार, असे जुटीजुटीनें येऊन उभे राहात. त्यांशीं लढतांना बरीक आम्हांस कठीण पडलें. आणि कधीं कधीं त्यांच्या पुढें आमचें चालेनासें ही झालें. त्याप्रमाणें कांहीं वेळपर्यंत शत्रूंनीं आम्हांस त्रास दिल्यावर, साहा किंवा आठ माणसांचा एक फरा, असे फरे एकामागें एक पुष्कळ, अशी आपली रचना ते करूं लागले; परंतु त्यावेळेस आम्हांला इतकी दक्षता आली होती, कीं हे शत्रु जिंकायास आम्हांस फार आयास पडले नाहींत.

हा मार्ग आम्हीं बराच लांब चालल्यावर, देशाचें स्वरूप एकाएकीं बदलून बर्फानें भरलेलीं मेदानें एकापुढें एक अशीं पुष्कळ लागलीं. त्या देशांतच ज्याची वहिवाट असें हलकें शस्त्र आम्हां एकेकास एथें मिळालें. हें शस्त्र आम्हीं कांहीं वेळ वारंवार परजून त्यानें कांहीं हलके व कांहीं जबर प्रहार केले. त्या मैदानांतील पाणी काळें व खारें होतें, त्याच्या योगानें मैदानांतील बर्फाच्या सपाटीवर जागो-

जाग बहुतडाग पडले; त्यावरून हा देश काळ्या समुद्राच्या कांठचा असावा, असें वाटतें. अनेक वेळ आरपार खेपा घालीत पुष्कळ दिवसपर्यंत आम्ही हीं मैदानें फिरलों.

हा प्रांत आम्हीं सोडल्यावर जो देश पुढें लागला तो मागल्यापेक्षां फार भयंकर होता; त्याची जमीन फारच विलक्षण कठीण आणि चिपाळ होती, म्हणून देश अगदीं रुक्ष आणि नापीक वाटला. एथें पुष्कळ चमत्कारिक स्वरूपें आमच्या दृष्टीस पडलीं; परंतु त्या रानांत राहाणारे ह्यांचे ठायीं माणुसकीच्या नांवानें शून्य आहे, असें आम्ही लवकर समजलों. कधीं मधीं त्यांचा मोठा जमाव होऊन ते दिसत, मग ते एकाएकीं नाहींसे होत.

त्यानंतर आमचा पुढें जाण्याचा रस्ता खाबरखुबरं आणि डोंगराळ अशा देशांतून वळणावळणानें गेला. त्या देशाचे मुख्य नऊ प्रांत. म्हणजे भाग, होते. एकेका प्रांतास निरनिराळा एकेक सुभेदार होता. त्या मुख्य प्रांताच्या पोटचे विभाग असंख्य होते. त्या प्रांतांपैकीं कितीएक प्रांत आम्हांस सोडावे लागले. त्या प्रांतांतील मोठे रस्ते त्यांचे फुटलेले आडरस्ते

एकांत एक गुंतलेले पाहून आमचा घोंटाळा होत असे. तेथील राहाणाऱ्यांच्या भाषेच्या पोटीं कितीएक देशभाषा होत्या, येणेंकरून वारंवार त्यांशीं आमचें बोलणें चालणें मोठे पंचाइतीचें पडे; तरी ही गोष्ट खरी कीं, ह्या देशांत आमचें पाऊल जसें जसें पुढें पडे तसा तसा आम्हांस श्रम कमी कमी, आणि आनंद अधिक अधिक, वाटत असे. पहिल्यानें आमची वाट केवळ डोंगरांवर चालली, परंतु आम्ही कांहींसे वर चढून गेल्यावर पलिकडचा देश वृक्ष जलाशय इत्यादिकांनीं चित्रविचित्र असा उघडपणें आमच्या दृष्टीखालीं आला.

तो देश किंवा ज्या ज्या मुकामांनीं आम्ही त्यांतून चालत आहों ते मुकाम त्यांचें वर्णन करण्याचा हल्लीं आमचा बेत नाहीं. इतकेंच मात्र सांगतों कीं, वाटेनें चालतांना पहिल्यापासून श्रम पडले खरे, तरी तो मार्ग आम्हांस मजल दरमजल अधिक करावा होत चालला आहे. आणि पुष्कळ वर्षें मेहेनत घेऊन आम्ही एथवर चालून आलों असतां, विद्यामंदिर आम्हां पासून अझून लांबच लांब आहे; तरी ज्या मित्रांनीं आम्हांस पहिल्यानें ह्या मार्गास लाविलें त्यांच्या कृपेचा

आभार आम्हीं मानावा. आणि धैर्य धरून आनंदपूर्वक शेवट येईपर्यंत आम्हीं पुढें चालावें. त्या गोष्टीला पुरून उरायाजोगा लाभ आम्हांला वाटेवर प्राप्त झाला आहे.



# पाठ ४१

## वाफेची शक्ति आणि वाफेपासून लाभ

पुस्तकें छापण्याची युक्ति निघाल्यापासून ज्ञानाचा प्रसार करण्याविषयीं मनुष्यांची शक्ति अतिशयित वाढली आहे; आणि ह्या गेल्या तीस वर्षांच्यांआंत तर ह्या शक्तीचा मोठाच उत्कर्ष झाला आहे. तैम्स ह्या नांवाचें लंडन शहरांतील वर्तमानपत्र ज्या वाफेच्या यंत्रानें सांप्रत छापतात, त्या यंत्रानें एका प्रहरांत त्या पत्राचे चार हजार ताव छापून तयार होतात, म्हणजे अडीच विपळांत एका तावापेक्षां

अधिक छापण्याचें काम होतें.

त्याचा हिशेब करूं लागल्यास वाफेच्या यंत्रानें तैम्स वर्तमानपत्राच्या प्रती एका दिवसांत जितक्या निघतात, तितक्या हातानें लिहूं लागल्यास पंधरा लक्ष लेखक लागतील, असें स्पष्ट दिसून येईल, तरी इतक्या प्रती चोवीस माणसें सहज छापून तयार करितात. युक्तीनें मेहनत वांटून घेतल्याचा गुण असा आहे कीं, हौस आफ कामन्स त्या नांवाच्या सभेमध्यें आठ दाहा अवरांपर्यंत झालेला जो वादप्रतिवाद, तो लिहून छापून असा त्वरित प्रसिद्ध होतो कीं, वादाची समाप्ति होऊन तीन चार अवरें झालीं नाहींत तों लंडनशहरांतील सर्व लोकांस वाचण्याकरितां मिळतो.

जमीनीवर वाफेच्या योगानें मोठे चमत्कार होतात, तसे समुद्रावरही होतात. वाफेचीं गलबतें चालू झाल्यापासून देशांतरास जाण्यायेण्याची वहिवाट फार वाढली. ती वहिवाट केवळ ब्रिटिशबेटांतील प्रांतांस परस्पर जाण्यायेण्याविषयींच वाढली, असें नाहीं; तर अमेरिकाखंडांतील युनेटेड्स्टेट्स आणि युरोपखंडांतील देश त्यांस ही परस्पर जाण्यायेण्याविषयीं वाढली आहे. वाफेच्या गलबतांच्या द्वारानें लि-

वरपूल शहरापासून डब्लिन शहरास एकाच रात्रींत अनायासानें नेमलेल्या वेळेस माणसें जाऊन पोंचतात. हीं वाफेचीं गलबतें पूल बांधल्याप्रमाणें इंग्लंड आणि त्याच्या जवळचें ऐर्लंड बेट त्यांचा जणू संयोगच करितात.

वारा जरी पडला, तरी लांटांमध्यें त्या गलबतांची गति कमी होत नाहीं. पाण्याचा प्रवाह आणि वायु हे जर प्रतिकूळ झाले तर त्या गलबतांच्या गतीचा कांहींसा अवरोध होतो खरा, तरी त्यांच्यानें सर्वथा गति कुंठित करवत नाहीं. स्वशक्तिप्रेरित हीं गलबतें पाण्यावर प्राण्यासारखीं चालतात. शंभर वर्षांमागें लंडनापासून स्काट्लंडास जाण्याचा जो श्रम पडत असे, त्यापेक्षां फार अधिक श्रम न पडतां फार वर्षें गेलीं नाहींत तों इंग्लंडाहून इंडियादेशास वाफेच्या गलबताच्या द्वारें येणें होईल, असा संभव आहे.

# पाठ ४२

## शहरामध्यें पाण्याचा पुरावा आणि त्याची वांटणी

मोठ्या शहरामध्यें पाण्याचा पुरावा कसा होतो, आणि त्याची वांटणी कशी होती, ह्या गोष्टी मनुष्यानें लक्षांत आणावयाजोग्या आहेत. प्रथम एक मोठा खजीना असतो; त्याजपासून शहरांतील महल्लामहल्ल्यास कांहींसे मोठे नळ जातात; मग त्या नळांपासून बिदीबिदीस पाणी जायाजोगे फांटे फुटतात; फिरून बिदींच्या फांट्यांपासून आळोआळीस आणि गल्लोगल्लीस लहान फांटे जातात; शेवटीं घरोघरीं शिशाची एकेक लहान नळी जाती, आणि पाहिजे असल्यास ती नळी आपलें सुंदर भरवण, म्हणजे पाणी, दर खोलींत नेती.

पाणी आणण्याकरितां जशी नळ, नळफांटे, आणि नळ्या, ह्यांची व्यवस्था केलेली असती, तशीच राबाचें, पाणी जाण्याकरितां मोऱ्या, पन्हळ, नाले,

त्यांची व्यवस्था केलेली असती, त्यांच्या योगानें तें पाणी समुद्राचा जो मोठा पाण्याचा कारखाना त्यांत शुद्ध होण्याकरितां जातें.

शहरांमध्यें पाणी नेण्याकरितां प्राचीन काळचे लोक आक्वेदक्त ह्मा नांवाचे मोठे मोठे पूल लवणांमध्यें बांधीत असत. पृथ्वीवरील कितीएक ठिकाणीं अशा इमारती अझून आहेत; विशेषेंकरून ह्या इमारती चीनदेशांत सांपडतात. परंतु पाणी नळानें नेलें असतां, मध्यें खोल लवण जरी आडवें आलें तरी तें उगमाचे उंचीइतकें चढतें, असा पाण्याचा स्वभाव लोकांस कळून आल्यापासून, उगमापासून शहरांतील मुख्य खजिन्यापर्यंत पाणी नेण्यासाठीं एक मोठा नळ केला म्हणजे पुरे, असें झालें आहे.

इंग्लंडांतील शहरांतले लोक त्यांस चांगल्या स्वच्छ पाण्याच्या पुराव्याचें स्मरण इतकें परिपाठांत पडलें आहे, कीं नित्य नेमानें दिवस उगवतो, व उन्हाळ्यांत ऊष्ण होतें, ह्या गोष्टींचें जसें त्यांस आश्चर्य वाटत नाहीं, तसें त्याचेंही आश्चर्य वाटत नाहीं. परंतु मागल्या काळाचा विचार केला असतां, वाटत वाटत आली जी कलाकौशल्याची विद्या हिचे आपण किती

उपकारी आहों, त्याचा आपणास बोध होतो.

पाण्याचे कमताईमुळें, आणि हें दर सांचल्यामुळें, रोगांच्या सांती किती वेळ आल्या आहेत! आणि पाण्याचा पुरावा बक्कशीर झाला असता तर जीं वांचलीं असती, अशीं किती शहरें आगीनें जळून खाक झालीं आहेत!

सांप्रतकाळीं ज्या पाण्याच्या पुरपुराटाच्या सुखाचा उपभोग आपण मनांत किंमत आणल्यावांचून घेतों, त्या सुखाची योग्यता केवढी, हें तोच मात्र जाणतो, जो एशियाखंडांतील अथवा आफ्रिकाखंडांतील वाळवंट, जेथें सोन्याच्या खाणीपेक्षां विहिरीची योग्यता अधिक आहे, तेथें फिरला आहे, अथवा गलबतावर, जेथें भपक्यानें काढिलेल्या पेयांपैकीं जें फारच मोलाचें पेय त्याहून अधिक योग्यतेचें समजून गोडें पाणी जपून खर्च करितात, तेथें जो कांहीं महिने राहिला आहे

# पाठ ४३

## पांखरांच्या शरीरांची रचना.

परमेश्वर प्राणिमात्रास उत्पन्न करतो तेव्हां पुढें जशी जशी त्यांची वृत्तिस्थिति व्हावयाची, तिच्या अनुरोधानें त्यांच्या शरीरादिकांची यथायोग्य योजना तो आस्थापूर्वक करतो, ह्याचें एक ढळढळीत उदाहरण पक्ष्यांच्या शरीरांची रचना म्हणून आहे. आकाशांत पक्ष्यांस सहज तरतां येई इतकीं हलकीं त्यांचीं शरीरें असतात. त्यांचीं मोठीं जीं हाडें आहेत तीं पोकळ असतात, ह्यामुळें फार वजन नसून त्यांस पाहिजे तितकी बळकटी होती. हाडांस बळकटी येण्यासाठीं पक्ष्याच्या आकारमानाप्रमाणें कांहीं जाडपणा पाहिजे, परंतु पोकळ हाड आणि तेवढ्याच आकाराचें भरीव हाड दोन्ही टिकण्याविषयीं सारखींच असतात, असें पाहाण्यांत आलें आहे; म्हणून हाडांचा पोकळपणा त्यांस कमजोर न करितां भरीव हाडांपेक्षां त्यांस हलकेपणा आणितो. आणखी पांखरांचीं आंतडीं अशीं केलेलीं असतात कीं त्यांत मधून

मधून पोकळी ठेविलेली असती, अशीकीं पिशवीप्र-
माणें तीस फुंकर घालून फुगवितां येईल. त्या पोक-
ळीच्या उपयोगाविषयीं अशी कल्पना आहे कीं तिणें
करून पांखरांस तरतेपणा अधिक येतो, आणि त्यांच्या
उडण्याचा जेव्हां झपाटा असतो तेव्हां त्यांस दमरा
खण्याची चांगली सोय तिजपासून होती.

पक्ष्यांची आकृति ही त्यांच्या स्थितिस्थितीस फार
सुंदर रीतीनें जमते. त्यांचें मस्तक लहान व वाटोळें
असून त्याच्या अग्रास अणकुचीदार चोंच असती;
गळा खांद्यापर्यंत जाड जाड होत जातो; उरास स-
माराचा फुगवटा असतो; धड लांब असून शेपटाकडे
निमुळतें होत जातें; अशी जी पांखरांची आकृति
असती ती त्यांस आकाश भेदून जाण्याचे फार उ-
पयोगीं आहे. पांखरूं उडूं लागलें म्हणजे त्याच्या अ-
वयवांचा जो मांड होतो, म्हणजे त्याच्या देहाचा अग्र
भाग अणकुचीदार असून आकाशाला भेदणारा, त्या-
चे पाय पाठीमागें लांबविलेले किंवा पोटाखालीं आंख
डून धरलेले, शेंपूट आणि पंख आकाशावर तरत
असे पसरलेले. आणि वाऱ्यानें सारें धड हलकें व त
रायाजोगें, ह्याहून लवकर उडत चालण्यास अधिक

चांगला मांड व्हावयाचा नाहीं.

पांखरांच्या पंखांची रचना अशी आहे कीं, हलकेपणा आणि बळकटी हे दोन्ही गुण त्यांजमध्यें असतात. मुळांचे ठिकाणीं जेथें बळकटी अधिक पाहिजे तेथें पिसें जाड असतात, तरी चिवट, पोकळ, आणि हलक्या अशा नळ्यांचीं असतात. तीं पिसें मुळांपासून शेंड्यांकडे बारीक बारीक होत जातात, आणि दुसऱ्या शेवटांस जेथें बळकटी नलगे तेथें तर अगदींच सूच्यग्र होतात; ह्यारीतीनें जीहींकरून पांखरांस उगीच वजन मात्र व्हावें, आणि उपयोग कांहीं नाहीं, अशा सर्व गोष्टींचें निवारण झालें आहे. पांखरांस पंख झपाट्यानें व जोरानें वापरतां यावे, म्हणून उराचे दोहीं बाजूंस फार बळकट स्नायू केलेले आहेत. त्या एवढ्या लहानशा जिवास इतके बळकट स्नायू दिलेले आहेत, कीं राजहंसानें आपल्या पंखाच्या तडाख्यानें माणसाचा पाय मोडला असें देखील झालें आहे. त्या स्नायूंच्या बळकटीवरून पंख जरी सतत हालत असले, तरी थकल्यावांचून पुष्कळ वेळपर्यंत पांखरे आकाशांत उडत असतात.

पांखरांचीं पिसें पावसांत चोळवटून नासून जा ण्यासारखीं आहेत, परंतु तसें न व्हावें म्हणून ईश्वरा नें एक चमत्कारिक युक्ति केली आहे, ती अशी कीं, बहुतेक पांखरांस त्यांचे शेपटाजवळ पिसांच्या एका जुडग्याखालीं तेलाची एक पिशवी करून ठेविलेली असती. ती पिशवी आपल्या चोंचीनें दाबून त्यांतलें तेल पांखरूं काढितें, आणि त्या तेलानें आपलीं पिसें निटावून चापचोप करितें. त्या तेलानें तीं पिसें सदा चांगलीं राहतात, आणि त्यांजवर जें काय पाणी पडतें तें झाडून टाकायासारखीं असतात. पांखरांकडे पाहिलें असतां तीं आपल्या चोंची आपल्या पंखांतून वारंवार फिरवीत असतात, असें दिसतें; असें जेव्हां तीं करितात, तेव्हां ईश्वरानें जें तेल त्याच कामासाठीं त्यांस दिलें आहे त्यानें तीं आपलीं पिसें निटावून सरेख करीत असतात, असें समजावें. कोंबडीं वगैरे ज्या पांखरांस आश्रा सहज मिळतो. आणि ज्यांस उडावयाचें क्वचित् कारण पडतें, त्यांस हें तेल नसतें, असलें तरी थोडेंच असतें; म्हणून तीं पावसाच्या सरींत सांपडलीं तर अगदीं चिंब होऊन उदासवाणीं दिसतात.

ज्या त्या अवयवरचनेच्या सोई वर सांगितल्या आहेत त्या बहुतकरून सर्व पांखरांस सामान्य असतात; त्यांशिवाय तिच्या तिच्या स्थितीस योग्य असा हरएक जातीला कांहीं विशेष असतो. त्यास उदाहरणें; बदकांस आणि दुसऱ्या जातीच्या पाणकोंबडयांस उरावर आणि पोटावर दाट लव असती, त्यासाठीं कीं, नेहमीं पाण्यामध्यें असल्यानें त्या अवयवांस उपद्रव होऊंनये. त्यांस पाण्यांत पोंहण्याची सोय चांगली व्हावी म्हणून त्यांच्या पायांच्या बोटांच्या मध्यें मध्यें कातडें सांधलेलें असतें. बगळा इत्यादिक दुसरीं पांखरें त्यांस तळ्यांत व पाणथर जमिनींत चालण्याकरितां लांब लांब पाय असतात, आणि आपलें भक्ष्य वेंचण्याकरितां तितक्या लांबीच्या माना असतात; राजहंस वगैरे कितीएक पांखरें असतात त्यांस पाण्यावर सहज पोंहतां यावें म्हणून त्यांचे पाय आंखूड, आणि पायाचीं बोटें कातड्यानें सांधलेलीं असतात. तरी पाण्यांतून आपलें भक्ष्य वेंचण्याकरितां त्यांस लांब लांब माना असतात. सुतार म्हणून झाडांच्या कुजलेल्या लांकडांतील किडे खाणारे पक्षी आहेत, त्यांस झाडांवर चा

लतां यावें, व झाडाचें खोड धरून राहतां यावें, म्हणून त्यांचे पाय आंखूड आणि बळकट केलेले असतात, व प्रत्येक पायास दोन पुढल्या आंगीं व दोन मागल्या आंगीं अशीं चार चार बोटें केलेलीं असतात. लांकडास टोंचण्याकरितां त्यास तिखट अणीची चोंच असती, आणि त्यांचें भक्ष्य जे किडे त्यांस टोंचून धरण्याकरितां त्यांना जीभ लांबच लांब बाहेर काढतां येती. त्या जिभेचें शेवट हाडासारखें कठीण असून अणीदार असतें, व त्यास गळाच्या आंकड्यासारखा एक आंकडा असतो. स्वाल्लो म्हणून जीं पांखरें आहेत त्यांच्या शरीराची अशी घडण आहे कीं, त्यांस आकाशांत फार त्वरेनें उडून जातां येतें, व उडत असतां वळण घेऊन दिशाचा पालट झटपट करतां येतो, येणेंकरून आणि तोंडाच्या रुंदपणामुळें त्यांचें मुख्य भक्ष्य जे आकाशांत उडणारे किडे ते त्यांस सहज धरतां येतात. पाणकोळी म्हणून मांस खाणारा पक्षी आहे त्यास चोंचीचे खालच्या भागास एक मोठी पिशवी किंवा जाळें असतें; त्याच्या योगानें आपला चरितार्थ यथास्थित होई इतकें मांस

त्याला धरतां येतात.

प्राणिमात्रास स्वसंरक्षणाचीं साधनें व उदर निर्वाहाचीं साधनें परमेश्वर मोठ्या तत्परतेनें करून देतो, त्या गोष्टीला हीं कांहीं उदाहरणें आहेत. हा जो मोठा विश्वंभर पांखरांस उदारपणें सांभाळितो त्याचा आश्रय आपणांस ही आहे, असा विचार केल्यानें कितो आनंद होतो!



# पाठ ४४

## विद्येपेक्षां धर्मशीलता मोठी.

विद्येची आवड खरोखरी स्तुत्य आहे, परंतु ती पुरविण्याची कांहीं मर्यादा आहे; त्या मर्यादेच्या आंत राखली पाहिजे. आपली शरीरप्रकृति बिघडेल, किंवा आपल्या सदाचरणास विघ्न होईल, तशी पुरवितां कामास नये. धर्मशीलता, शांतता, आहार विहारांचा नेमस्तपणा, आणि दानदयालुता हे गुण जर आपण संपादिले नाहींत, तर मोठमोठ्या विद्या शिकून मोठी कीर्ति मिळविली तिचा काय उपयोग?.

आपलीं आईबापें सधन असून आपणास विद्या प्राप्त करून देण्याचा खर्च त्यांच्यानें भागवत असला तर, आपण आळस करून, किंवा दुराचरण करून, त्यांची निराशा करावी, ही आपणास मोठी लाजिरवाणी गोष्ट आहे. तशी विद्येची स्तुति आपण लोकांच्या तोंडानें ऐकतों, तिजवर जाऊन, विद्येपेक्षा कोणताही गुण श्रेष्ठ नाहीं. अशी कल्पना आपल्या मनांत आपण आणूं नये. कारण देवभक्ति विद्येपेक्षां

श्रेष्ठ आहे; तशीच परोपकारबुद्धि श्रेष्ठ आहे, तसाच आहारविहारांचा नेमस्तपणा श्रेष्ठ आहे; तसेच जे जे गुण सन्मार्गवर्ती पुरुषास शोभतात ते ते सर्व विद्येपेक्षां श्रेष्ठ आहेत.

इहलोकांचें आपलें आयुष्य संपलें म्हणजे आपला शेवट झाला, पुढें कांहीं उरलें नाहीं, असें जर असतें, तर सदाचरण किंवा दुराचरण ह्यांतून कोणतेंही घ्यावयाची आपणास कांहीं स्वतंत्रता असती; आणि आपण ईश्वरभय, प्रमाणिकपणा, आहारविहारांचा नेमस्तपणा, हे सद्गुण टाकून, देवनिंदा, अप्रामाणिकपणा, व आहारविहारांचा यथेच्छ भोग, ह्या दुर्गुणांचा स्वीकार केला, तर आपण हा वेडेपणा केला खरा, असें होईल; तरी ह्या दुरस्वीकाराचा दुष्परिणाम इहलोकींच होणार, म्हणून त्याविषयीं कांहीं सबब सांगण्यास जागा झाली असती.

पण आपली गोष्ट अशी नाहीं. इहलोकींचें आपलें आयुष्य संपलें कीं परलोकींच्या अनंत आयुष्याचा प्रारंभ झाला. आपल्या खुशी असो किंवा नसो, परलोकीं अनंत आयुष्य घालवावें लागेल. परलोकींच्या आयुष्याची मर्यादा कोठवर आहे, त्याचा

आपण गंभीरपणें कधीं विचार केला आहे काय? आपण म्हणूं कीं, त्याचा विचार केला; त्या आयुष्याची मर्यादा अनंत काळाची आहे. आपण उत्तर ठाक केलें; परंतु अनंत त्या शब्दाचें वजन आपण कधीं तोलून पाहिलें काय? अनंत काळ हा शब्द लहान दिसतो आहे, आणि तो ओंठाबाहेर झटकर गेला, परंतु ज्याची बुद्धि सर्वांहून मोठी आहे त्याला ही त्याचा अर्थ पुरता समजावयाचा नाहीं. हजार वर्षे धरलीं, दाहा हजार वर्षे धरलीं. किंबहुना कोट्यवधि वर्षे धरलीं, आणि त्या शब्दाच्या अर्थाशीं लावून पाहिलीं, तरी त्याचा अर्थ इतका मोठा आहे कीं, सर्वांहून जी मोठी संख्या आपल्यानें मनांत आणवती, ती त्या अनंतकाळ शब्दाच्या अर्थापुढें कांहींच नाहीं. रेतीचा एक कण पृथ्वीचा कांहीं अंश आहे; तसाच पाण्याचा थेंब समुद्राचा कांहीं अंश आहे, तरी सर्वांहून जी वर्षांची मोठी संख्या ती अनंत काळाचा कांहींच अंश नाहीं. साधारण ही एवढीच गोष्ट पाहिली असतां, आपणास चमत्कार वाटतो, मग आपल्या रुहांच्या आयुष्याची मर्यादा अनंतकाळच होय, असें जेव्हां आपणास समजलें, तेव्हां ती गोष्ट आपणास किती विस्मयकारक होती बरें!

आतां हें अनंतकाळचें आयुष्य कसें घालवावें सें आपणास वाटतें बरें? सुखानें घालवावें हें आपलें उत्तर होईलच होईल. आपणावर देवाची फार कृपा आहे. कशी तर, परलोकीं भोगण्याच्या सुखाचीं साधनें त्यानें करून ठेविलीं आहेत; जें सुख परलोकीं गेल्याशिवाय समजावयाचें नाहीं. तरी तें सुख आपण परीक्षेस उतरल्यावांचून आपणास मिळणार नाहीं. आपण परीक्षेस न उतरलों तर आपला परिणाम सुख होणार नाहीं; दुःखच होईल तें दुःख किती मोठें होईल, व किती काळपर्यंत राहील, हें सांगतां येत नाहीं; तें अपरिमेय, आणि अनंत आहे.



# पाठ ४५

## पापाविषयीं

कितीएक गोष्टींविषयीं पापाचा दुष्टपणा आपण पाहूं या! ईश्वराविषयीं पाप कसें आहे हें पाहा. ईश्वराशीं, व त्याच्या गुणांशीं, व त्याच्या सत्तेशीं, पाप केवळ विरुद्ध आहे. ईश्वरानें जो जो आपला अभिप्राय प्रगट केला त्याला त्याला पाप आडवें येत गेलें, व ईश्वरानें जी जी आज्ञा दिली आहे ती ती पाप मोडीत गेलें; म्हणून पापासारखा ईश्वरास कंटाळा आणणारा दुसरा पदार्थ नाहीं. त्यावरून ईश्वराचें द्वेषपात्र असें नांव पापास पडलें आहे.

मनुष्याविषयीं पाप कसें आहे हें पाहा! मनुष्यावर पापानें किती अनर्थ आणले आहेत! मनुष्य प्रथम उत्पन्न झालें तेव्हां जसें होतें त्याहून आता फारच भिन्न आहे. हा फेर पापानेंच केला. पापानें मनुष्याचें तेज हिरून घेतलें, आणि त्याच्या मस्तकावरील मुगूट काढून घेतला.

मनुष्याच्या आत्म्याची दशा पाहा! पापानें त्यास अपवित्र करून त्याला नीचपणा आणला आहे. त्याला पूर्वी ईश्वराचें सादृश्य होतें, तें पापानेंच नाहींसें केलें; आणि पूर्वी त्यास ईश्वराचा साक्षात्कार होत असे, तो पापानें होईनासा केला. कामक्रोधादि दुर्गुण खवळून मनुष्यास अस्वस्थ करितात, व चिंता त्याला व्यथा करिती, व वाईट कर्म केल्यानें पुढील भय त्याच्या मनाला खातें, आणि त्याच्या मनाचा भंग होतो, हें सारें पापानेंच केलें आहे.

मनुष्याच्या शरीराची दशा पाहा! प्रथम हें अव्यंग, निरामय, व अमर, असें होतें; परंतु पापानें ह्या जगांत मृत्यूस आणिलें आणि तो सर्व भयांचा राजा होऊन बसला. आतां जें जें मनुष्य जन्मास येतें त्याचें त्याचें आयुष्य थोडें, व त्यास संकटें फार, असें होतें. ह्या लोकीं मनुष्यास ज्या त्या सुखांत कांहीं तरी न्यून असती. आणि जें जें सुखाचें साधन असतें तें तें दुःखाचेंही साधन होतें. आहा! ह्या वेळेस जीं दुःखें रोगी मनुष्यें भोगतात तीं, व लढाया, सांता, दुष्काळ ह्यापासून जे अनर्थ झाले आहेत ते, जर आपल्यानें सर्व एकदम पाहावले,

तर त्या शत्रूच्यानें हें दुष्ट काम होतें त्याविषयीं आपणास काय वाटतें बरें ?

पापाचीं जीं हीं फळें सांगितलीं तीं इहलोकींचीं होत; परंतु जसा इहलोक तसा परलोकही आहे. जो इहलोक नष्ट झाल्यावर सतत चालणारा आहे. तर सर्वांहून घोर जे पापाचे परिणाम ते तेथे दृष्टीस पडणार. जो नरक तो पापानेंच बांधला आहे; जो पापी लोकांस खाणारा तेथील किडा कधीं मरणयाचा नाहीं तो पापानेंच उत्पन्न केला आहे; तेथील जो अग्नि कधीं शांत व्हावयाचा नाहीं तो पापानेंच पेटविला आहे.

आतां आम्ही एक अनुमान करतों. जें अनुमान लहान मुलास देखील समजावयाजोगें आहे. ते असें, त्या सर्व दुःखाचा धाक पाळणें जर ईश्वरास न्याय्य आहे, तर हें सर्व दुःख देणें हें ही त्यास न्याय्य आहे, मग हें सर्व दुःख देणें जर ईश्वरास न्याय्य आहे, तर हें दुःख पापी मनुष्यानें भोगावें असा गुण पापाचे ठायीं आहेच आहे आणि पापाचा गुण असा आहे तर आम्ही किती जरी त्याचा दुष्टपणा मनांत आणिला तरी त्याहून देखील त्याचा दुष्टपणा अधिक आहे



# पाठ ५६

## पांखरांचीं घरटीं

गोल्दफिंच ह्या नांवाच्या पांखराचें घरटें, किंवा चाफिंच ह्या नांवाच्या पांखराचें घरटें, ह्याच्या रचनेचा किती चमत्कार आहे! ह्या घरट्याची आंतली बाजू सूत व रेशीम ह्यांच्या बारीक धाग्यांनी मढिवलेली असती; त्याची बाहेरली बाजू कितीएक प्रकारच्या बारीक शेवाळीनें केलेली असती; त्याला दुसरा कांहीं पदार्थ नाहीं, तरी तिची जी मौज वाटती ती किती वाटली तरी पुरेशी नाहीं. ज्या झाडावर घरटें बांधावयाचें, त्या झाडाचा जसा रंग असतो तशा रंगाचीच शेवाळ ती पांखरें आणितात; ह्यावरून सिद्ध होतें कीं, आपलें घरटें कोणास ओळखतां येऊं नये, असा त्या पांखरांच्या मनांत बेत असतो.

कितीएक घरट्यांमध्यें केस, मेंढरांची लोंकर, व लवाळा ह्यांची विणकर चमत्कारिक रीतीनें तीं करितात. कितीएक घरटीं तागाचा, किंवा लोंकरीचा, किंवा केसाचा, किंवा बहुतकरून कोळ्याच्या जाळ्याचा

धागा करून, त्या धाग्यानें दोहींकडून तीं पाखरें बांधून टाकितात.

ब्लाकबर्ड आणि लापूविंग हीं आणि दुसरीं कितीएक पांखरें त्यांची अशी चाल आहे कीं घरटें केल्यावर तें पक्कें होऊन राहण्याकरितां आंतून गिलाव्यानें लिंपतात; मग जी ऊब पाहिजे ती येण्याकरितां घरटें ओलें आहे तों गिलाव्यावर मेंढरांची लोकर, किंवा शेवाळ चिकटविंतात.

स्वालो म्हणून पांखरूं आहे त्याच्या घरट्याची रचना ह्या दुसऱ्या पांखरांच्या घरट्यांच्या रचनेहून भिन्न आहे; त्या पांखराला कांकूड नलगे, गवत नलगे, आणि दोरी नलगे; तें पांखरूं एका प्रकारचा गिलावा तयार करून फक्त त्यानेंच आपल्यासाठीं व आपल्या कुटुंबासाठीं सुंदर व मजबूत, आणि निर्भय असें घर करितें. घर बांधण्यास गिलावा करण्याकरितां तें आपला ऊर पाण्यांत बुडवून ती भिजलेलीं पिसें धुळीवर झटकावतें. परंतु सर्वांहून मौज वाटाया जोगीं हिंदुस्थानांतील कांहीं पांखरांचीं घरटीं आहेत; जीं पांखरें त्यांस दुसऱ्या जनावरांचा किंवा किड्यांचा उपद्रव नव्हावा, म्हणून झाडांच्या फांदीला मोठ्या चतुराईनें तीं

टांगतात.

बहुतकरून पांखरांच्या हरएक जातीच्या घरट्याची बनावट निरनिराळी असती. सर्वांविषयीं ही गोष्ट खरी आहे कीं, ज्या रीतीनें आपल्या अंड्यांचें निवारण उत्तम प्रकारें होईल, आणि संतति चालून ती सुखी राहील, त्या रीतीनें सर्व पांखरें आपापलीं घरटीं बांधितात.

आपापल्या घरट्यांची रचना करण्याविषयीं त्याप्रमाणें ईश्वरानें पांखरांस आश्चर्यकारक आंगचें ज्ञान दिलें आहे. काय त्यांचा कुशलपणा! काय त्यांची चतुराई! काय उद्योगीपणा! काय धिमाई! आणि पांखरें आपलीं जीं सर्व कामें करितात, तीं उगीच करीत नसतात; कांहीं तरी उद्देश धरून कामें करितात. पहा! पांखरें आपलीं घरटीं करितात तीं पोकळ आणि बहुतकरून वाटोळीं करितात; अशासाठीं कीं घरट्यांत ऊब चांगली आणि फार दिवस राहावी. आणि घरट्याच्या आंत मऊ पदार्थ लावितात, अशासाठीं कीं पिलांस मऊ आणि उबेची जागा असावी.

पाऊस न लागावा, आणि दुसऱ्या प्राण्यापासून

उपद्रव न व्हावा, अशा निरस जागीं आपलें घरटें करावें, हें ज्ञान पांखरांस कोठून आलें? आंडीं घातलीं पाहिजेत, आणि तीं आंडीं भुईवर न पडावीं, व त्यांस थंडी न लागावी, म्हणून घरटीं केलीं पाहिजेत, हें त्यांस कोणीं शिकविलें? घरटें फार मोठें केलें तर आंड्यांच्या सभोंवतीं जी ऊब पाहिजे ती आंत राहणार नाहीं; आणि लहान केलें तर आंड्यांस जी जागा व्हावी ती होणार नाहीं, म्हणून बेतानें घरटें केलें पाहिजे, हें त्यांस कसें समजलें? घरटें करण्याचे वेळेस पिलें नसतात, व आंडीं देखील नसतात; तरी जितकीं आंडीं व्हावयाचीं आहेत तितक्यांच्या बेतानें तीं आपलीं घरटीं करितात. तर त्यानें प्रमाण पांख कशानें समजतें? घरटीं तयार नाहींत आणि पांखरांनीं आंडीं घातलीं, अशी गोष्ट कधींही पडत नाहीं; तर घरटें केव्हां तयार पाहिजे, हा वारीक हिशाब त्यांस कोण शिकवितें? ह्या सर्व गोष्टींमध्यें देवाचा पराक्रम, चातुर्य, आणि कृपा पाहून त्याचा स्मरण आपण करावा

# पाठ ४७

## प्रामाणिकपणा आणि राजनिष्ठा.

फार वर्षांमागें इंग्लंड देशाच्या कांहीं लोकांनी उत्तरअमेरिकाखंडांत जाऊन तेथील कांहीं प्रांत वसविले. पुढें कांहीं वर्षें गेल्यावर त्या लोकांचे व इंग्लंडच्या राजाचे युद्धप्रसंग होऊन त्या लोकांनीं राजाचा अमल आपणावरचा काढून टाकून आपला स्वतंत्रपणा स्थापला. तें युद्धप्रकरण प्रथम होऊं लागलें तेव्हां स्लेद्रमन त्या नांवाचा शेतकरी न्यूइंग्लंडनामक प्रांतांत होता; तो राजाचा पक्ष धरून आपल्या पक्षाच्या बहुत लोकांबरोबर प्राणास मुकला. त्यानें जे प्रामाणिकपणा व जी राजनिष्ठा दाखविली त्यांपेक्षां त्या गुणांचें अधिक ढळढळीत चित्तवेधक उदाहरण सांपडणें कठीण आहे.

त्याच्या चौकशीच्या वेळेस जो त्याच्या तर्फेचा वकील होता त्यानें ही खालीं लिहिलेली त्याची गोष्ट सांगितली.

ज्या तुरुंगांत तो घातला होता तो तुरुंग मासा

ब्यूसेल्स नामक प्रांतांतील पश्चिमभागीं होता, आणि तो मोडकळीस आला होता. एके दिवशीं रात्रीं तो शेतकरी झोंपेंत असतां त्याच्या कोठडींतील कितीएक माणसांनीं त्याला जागें केलें, ते म्हणाले, आतां तुला सुटका मिळण्याचा प्रसंग आहे. आम्हीं तुरुंगाच्या भिंतीस भोंक पाडलें आहे, त्यांतून तुला निघून जातां येईल.

स्तेद्मनानें उत्तर केलें कीं, मी तुरुंगाला सोडून जाणार नाहीं. हें त्याचें बोलणें ऐकून त्या लोकांस मोठें आश्चर्य वाटून ते त्याचे कान उघडण्याकरितां त्याशीं भांडले. तूं निघून जाशील तरच तुझा प्राण वांचेल; राहिलास तर प्राणास मुकशील; असें त्यांनीं त्यास साफ समजावून सांगितलें, तरी त्यांचा सारा श्रम फुकट गेला.

स्तेद्मनानें उत्तर केलें, मी खरा प्रामाणिक मनुष्य आहें; आणि इंग्लंडदेशाच्या जार्जनामक राजाचा सेवक आहें. मी आपला प्राण वांचविण्यासाठीं रात्रीं भोंकांतून निघून मुठींत नाक धरून चोरट्यांसारखा पळून जाणार नाहीं.

नंतर बंदीवानांची चौकशी करण्याची वेळ आली. ज्या कोडतांत त्याची चौकशी व्हावयाची तें कोडत तेथून साठ मैलांवर दूर होतें. त्याला नेण्यास नाझर आला, त्यास तो म्हणाला, मला पायीं एकटा जाण्याची परवानगी दिल्यास तुमचा कांहीं खर्च वांचेल.

नाझर म्हणाला, अबरूपेक्षां जर कटून जाणें तुला आवडलें, आणि राजाकडच्या लश्करांत तुझा शोध करायाला त्वां मला लावलें, तर मग काय करावें?

शेतकरी रागानें लाल होऊन म्हणाला, मला ओळखतो अशाशीं मी बोलतों आहें, असें मला वाटलें होतें. नाझर म्हणाला, मी तुला ओळखतों, मी उगेंच थट्टेनें असें बोललों; तुझ्या मनास येईल तसें कर. तूं म्हणतोस तसाच जा; मी तिसरे दिवशीं तुझी वाट पाहीन. मग शेतकरी एकटा तेथून निघाला, आणि नेमलेल्या वेळीं नाझरास भेटून त्याच्या स्वाधीन झाला.

त्याची चौकशी चालूं लागली तेव्हां मी त्याच्या तर्फेचा वकील झालों. स्नेहमनानें आपली इत्थंभूत

सारी हकीकत सांगण्याविषयीं कोडतापुढें आग्रह धरिला; आणि जेव्हां मी वकिलीच्या पकडीचीं बोलणीं बोलूं लागलों, तेव्हां त्यानें मला मोठ्या धमकीनें कडाडून म्हटलें, उगीच पर्याय सांगण्याकरितां तुला वकील केलें नाहीं; जो मजकूर खरा आहे तो सांगण्यास मदत करण्याकरितां तुला वकील केलें आहे

प्रामाणिकपणाचा असा सरळ भाव म्यां कधीं कोणाचा पाहिला नव्हता. त्याची चौकशी करण्यास जे न्यायाधीश बसले होते त्यांच्याही डोळ्यांतून वारंवार पाणी निघालेलें म्यां पाहिलें. मला तर त्याच्या पूर्वीं व त्याच्या नंतर कधीं कोणत्या कुळाची इतकी कळकळ लागली नाहीं. आपले प्राण वांचविण्यासाठीं जसें बोलावें तसें त्याचे प्राण वांचविण्यासाठीं मी बोललों.

न्यायाधीशांच्या डोळ्यांस म्यां पाणी आणलें, तरी तीं माणसें निष्ठुर व आपलें कर्तव्य कर्म संभाळण्याविषयीं तत्पर, अतएव दयेस वश होणारीं नव्हत; त्यामुळें त्यांच्या अंतःकरणावर माझ्या बोलण्याचा भार पडला नाहीं. शेवटीं त्यांनीं, लेद्रमन त्यांजवर

गुन्हा शाबूत झाला असें ठरवून, प्राणांत शिक्षा ने-मली.

मी त्याला बोललों कीं, जर तूं क्षमा मागशील तर कोणजाणे मिळाली तर मिळेल. क्षमा मिळवि-ण्याची अर्जी म्यां त्याच्या नांवानें लिहिली, आणि तूं त्या अर्जीवर सही कर. असें त्यास म्हटलें, तरी तो सही करीना.

तो म्हणाला, माझा करायाचा धर्म म्हणून जें मला वाटलें तें म्यां केलें. मी माझ्या परमेश्व-रापाशीं क्षमा मागेन, आणि आपल्या राजापाशीं मागेन; परंतु केलेल्या कामाचा मला पश्चात्ताप ना-हीं; तसा प्रसंग आला असतां मी फिरून तें काम करीन; तर त्या कामाची क्षमा आतां ह्या लोकांपा शीं मागणें हें स्पष्ट ढोंगच होय. सही करा, असें मला तुम्ही म्हणूं नका; मी करणार नाहीं. माझ्या न्या याधीशांस जाऊन सांगा कीं, तुम्हांपासून मी कांहीं भीत नाहीं. व तुम्हांपासून मला कांहीं आशाही ना हीं. आम्हीं त्याला फार आग्रह केला; परंतु व्यर्थ. म ग मी निराश होऊन. तेथून निघालों.

# पाठ ४८

## बारामटर म्हणजे वायुगुरुत्वमापक यंत्र

वायुगुरुत्वमापक म्हणून एक यंत्र आहे, ज्यास हवेचें यंत्र ही लोक म्हणतात. त्या यंत्रानें वास्तविक म्हटलें तर वायूचें गुरुत्व मात्र समजतें; तरी वायूचे ठायीं जी आर्द्रता आहे तिजवर बहुतकरून वायूचें गुरुत्व असतें, आणि वायूचे ठायीं जशी जशी आर्द्रता अधिक उणी असती, तशी तशी बहुतकरून हवा होती; म्हणून हें हवेचें यंत्र असें म्हणणें योग्य आहे.

वायूचें गुरुत्व जसें जसें अधिक होत जातें, तसा तसा यंत्राच्या नळींतील पारा वर चढत जातो; आणि आकाशांत अभ्राळ धुकें वगैरे कांहीं नसतें तेव्हां वायूचें गुरुत्व असतें, म्हणून त्या यंत्राच्या पट्टीवर जितके अंश पारा वर जातो तितका पर्जन्याच्या अभावाचा संभव होतो.

शेतकऱ्यांचीं कामें बहुतकरून पाऊस व उघाडी ह्यांवर असतात, म्हणून त्या यंत्राचा व्यवहारीक उपयोग त्यांस फार आहे, हें उघडच आहे. त्या यंत्राचा आणखी एक उपयोग शेतकऱ्यांस असा आहे कीं, पुढें पाऊस पडेल किंवा उघाडी पडेल त्याविषयीं ते दुसऱ्या गोष्टींवरून जे तर्क करितात, ते तर्क त्या यंत्रानें तपासतां येतात, व त्या तर्कांस बळकटी येती.

वाटसरांसही हें यंत्र तसेंच उपयोगीं पडतें. त्यांला तर त्याच्या सूचनेप्रमाणें चालावें लागतें. तरी त्या पाऊस उघाडी जाणण्याच्या यंत्राचा सर्वोत्कृष्ट उपयोग म्हटला तर दर्यावर्दी लोकांस आहे; जे हे लोक अनोळखी अभाळाखालीं, व अनोळखी हवेंतून, महासागरावर फिरत असतात. सांप्रतकाळचे नाकवे जे सावध असतात, ते त्या यंत्राच्या सूचनेप्रमाणें वागतात, त्यांस तुफान येणार हें त्यावरून समजून तुफान येण्याचे पूर्वी अवजार आटोपून तयारी करतां येती, तसेंच प्राचीन काळच्या नाकव्यांस तुफान येण्याची सूचना पूर्वी कांहींच नसून तयारी नसतां अकस्मात् त्यांवर तुफान येऊन

पडून मोठा अनर्थ होत असे.

डाक्टर आर्नट म्हणून कोणी गृहस्थ होता. त्याला ह्या गोष्टीचा मोठा चमत्कारिक दाखला आला होता, त्याचें वर्णन तो येणें प्रमाणें करतो.

आम्ही गलबतांत बसून पृथ्वीच्या दक्षिणगोलार्धाच्या समुद्रांत फिरत होतों. एके दिवशीं दुपारपासून आकाशांत अभ्रवगैरे कांहीं नव्हतें, व सूर्य शांत मुद्रेनें अस्तास गेला होता, आणि नित्याप्रमाणें सांजच्या प्रहरांत खलाश्यांची ख्यालीखुशाली चालली होती, इतक्यामध्यें, तुफान येतें, मोठे जलदीनें तयारी करावी, असा नाकव्याचा हुकूम आला.

वायुगुरुत्वमापकयंत्रांतील पारा इतक्या जलदीनें उतरूं लागला होता कीं, पाहून भय वाटावें. म्हातारे जे दर्यावर्दी होते त्यांस तर भयाचें चिन्ह कांहींच उमगलें नव्हतें; आणि तयारी फार व मोठ्या जलदीनें होत आहे, हें पाहून त्यांस आश्चर्य वाटलें; तरी ज्या तयारीच्या, तजविजा व्हावयाच्या त्या सर्व झाल्या नाहींत तोंच त्यांतील जे लोक फार वापरलेले त्यांस देखील कधीं झालें नव्हतें असें भयंकर तुफान त्यांवर येऊन पडलें.

त्या तुफानापुढें कांहीं एक टिकलें नाहीं, अवजा रें काठीस गुंडाळून घट्ट बांधलीं होतीं, त्यांच्या फाटून चिंध्या झाल्या; व काम्या, परवाणें, बहुनकरून निरुपयोगी झालीं; व दोरखंडें तर कोसळून बोर्डावरून खालीं पडावीं असा एकवेळ प्रसंग आला होता. वरती तुफान, भोंवतालीं लाटा, आणि वारंवार मेघांचा गडगडाट, यांचा जो एकच कल्लोळ झाला, त्यामध्यें कोणाचा शब्द कोणास ऐकू येईना; आणि सर्वांची तिरपीट झाली होती. तोंन कर्ण्यांचा देखील शब्द कोणास ऐकू येईना

त्या पाण्याच्या लहानशा नळीनें जर पूर्वी सूचना दिली नसती, तर त्या नामी भव्य गलबताच्या विलक्षण जोरानें किंवा नाकव्यांच्या परम कौशल्यानें व प्रयत्नानें, त्यांतून कोणीही त्या भयंकर रात्री हें वर्तमान सांगावयास वांचतेंना. दुसऱ्या दिवशीं सकाळीं वारा शांत झाला होता, तरी लाटा उचंबळतच होत्या, त्यांवर तें गलबत मोडकें अस्ताव्यस्त होऊन तरत होतें



# पाठ ४९

## स्नायूंची शक्ति

लंडनशहरांतील जे मोठे नाठर ओझेकरी असतात ते सुमारें दोनशें पौंड ओझें वाहतात, असा अजमास केला आहे. तुर्कदेशांत तर असे ओझेकरी आहेत म्हणून ऐकतों कीं, ते लहानपणापासून ओझें वाहण्याचा अभ्यास करितात, त्यामुळें त्यांस सातशें पौंडांपासून नऊशें पौंडांपर्यंत ओझें वाहतां येतें. सर्वांहून जो निर्बळ त्याला सवाशें पौंड वजनाचें ओझें हातानें भुइसांड करतां येतें. आणि बळकट आहे त्याला तर चारशें पौंडांचें ओझें भुइसांड करतां येतें.

ताफम नामें एक सुमार इंग्लंडांत होता त्याला आठशें पौंड वजनाचें ओझें भुइसांड करतां येत असे. एक वेळ त्यानें छप्पन पौंडांचें वजन साहा फूट लांबीच्या एका चौरंगाच्या शेवटास लावून तो चौरंग आपल्या दांतांनीं आणि गुडघ्यांनीं उचलला होता. एकदां त्यानें तीन तसू घेराची लोखंडी पाहार आपल्या डाव्या मनगटावर मारून गुण्यासारखी वांकविली;

आणि तशीच एक दुसरी पाहार मांडीवर दाबून वळविली, आणि पुनः ती सरळ केली. आणि दोन तसूंच्या घेऱ्याचा तागाचा दोर त्यानें तटातट तोडला.

आक्सफर्ड नांवाच्या शहरांत कांहीं वर्षांमागें एक मनुष्य राहात असे, तो करांगुळीस छप्पन पौंडांचें ओझें अडकवून अर्ध मिनिट म्हणजे सवापळपर्यंत हात लांब करून धरीत असे. तसेंच, कोणी एका मनुष्याची गोष्ट अशी ऐकिली आहे कीं, तो ओणवा होऊन शरीराची कमान करून दोन तीन हजार पौंड वजनाची तोफ पाठीवर संभाळून धरीत असे.

थोडीं वर्षें झालीं, बेलजोनी ह्या नांवाचा प्रख्यात पुरुष होता. तो पहिल्यानें लंडन शहरांतील नाटकशाळांमध्यें तमाशा दाखवूं लागला, तेव्हां त्याचें आंग बळ इतकें होतें, कीं दाहा बारा मनुष्यांचा मनोरा करून त्याजवर आणखी दोन तीन मुलें ठेवून तेवढा तो मनोरा उचलून रंगभूमीच्या अग्रभागाकडे खेपा करीत असे. त्या सर्वांचें वजन दोन हजार पौंडांहून फार कमी नसे.

मनुष्यांच्या स्नायूंच्या शक्तीनें जीं हीं विलक्षण कृत्यें झालीं आहेत, त्याचा विचार आपण केला असता

दुसऱ्या प्राण्यांच्या स्नायूंच्या मोठ्या शक्तीनें जीं कृत्यें होतात तीं पाहून आपणांस फारसें आश्चर्य वाटणार नाहीं.

हत्तीची शक्ति इतकी आहे कीं, तीन हजार किंवा चार हजार पौंडांचें ओझें तो सहज नेतो. त्याच्या सोंडेमध्यें तीस हजार स्नायू निरनिराळे असतात, अशी कोणीं गणना केली आहे. त्या विलक्षण सोंडेनें तो मोठमोठाल्यां वृक्षांच्या फार बळकट ग्याद्या पटकन मोडून टाकतो, आणि आपल्या दांतांनीं ते वृक्ष देखील उपटून टाकतो.

सिंहाच्या स्नायूंचे ठायीं शक्तीचा केवढा सञ्चय असतो! तो आपल्या पायाच्या एकाच तडाख्यानें घोड्याच्या पाठीचा कणा मोडून टाकतो; आणि आपल्या जाभाड्यांत म्हसरूं धरून भरधांव पळत सुटतो. तो आपल्या दांतांच्यामध्यें त्याचीं हाडें चुरडतो, आणि तीं आपल्या आहारांतलीं आहेत म्हणून गिळून टाकतो.

स्नायूंस नेहमीं हाडांचा नेटावा पाहिजे असा अर्थ नाहीं. व्हेल नांवाच्या प्राण्याचें शेपूट केवळ स्नायूंचेंच असतें, तरी व्हेलाचें मुख्य आणि मोठें जब-

रदस्त शस्त्र म्हटलें तर तें शेपूटच आहे. हें शस्त्र त्याजपाशीं असतां त्याला कोणाचें भय नाहीं. कोण एक प्राचीन काळचा यथार्थ वर्णनकर्त्ता ग्रंथकार लिहितो कीं, व्हेलमाशाला मोठी ही नाव कसपटाप्रमाणें आहे; कांतर शेपटाच्या एका तडाख्यानें तिचे तुकडे तुकडे करून टाकावयाजोगें त्याच्या आंगीं सामर्थ्य आहे. शार्क, म्हणजे तंतु, त्या नांवाचा जो मासा, त्याचा सांगाडा केवळ मऊ मऊ हाडांचा असतो, त्याला वास्तविक हाड एक देखील नसतें; तर समुद्रांतील सर्व प्राण्यांपेक्षां तो क्रूरकर्मा होय. जें कांहीं त्याला सांपडतें तें तो आपल्या मऊ मऊ हाडांच्या जाभाड्यानें धरून गटकर गिळून टाकतो. त्या माशाची एक जात पांढरा शार्क म्हणून आहे, त्याची लांबी बहुतकरून तीस फूट असती, आणि तो चार हजार पौंड वजन असतो; त्या माशानें एका ग्रासानें मनुष्य गिळून टाकिलें अशी गोष्ट पाहाण्यांत आली आहे.



# पाठ ५०

# रेनदीर

रेनदीर म्हणून हरिणाची एक जाति आहे. हीं जनावरें उत्तरध्रुवाजवळच्या देशांत उत्पन्न होतात. ईश्वरानें आपण जी मनुष्यजाति उत्पन्न केली, तिच्या निर्वाहाची तरतूद तो फार कृपाळूपणानें करतो, आणि मनुष्यजातीच्या गरजा व जनावरें त्यांचा परस्पर नित्य संबंध ठेवून जनावरांच्या द्वारानें त्या गरजांची पुरवणूक व्हावी म्हणून त्यानें जनावरें उत्पन्न केलीं, त्या गोष्टीविषयीं पुष्कळ सबळ प्रमाणें आहेत, त्यांतील रेनदीर हें एक प्रमाण आहे.

लापलांड देशांतील लोक रेनदीरास फार प्राचीन काळापासून बाळगीत आले आहेत; ज्या त्या भयाण देशामध्यें रेनदीरांवांचून मनुष्यांनी राहाण्याची सोय होतीना. उत्तरकडच्या त्या अगदीं शेवटल्या देशांतील राहाणाऱ्या मनुष्यांची ऋधागणा, म्हणजे त्यांच्या विद्या कला त्यांची वृद्धि, केवळ रेन-

दीरांवरच आहे. स्वीदनदेशाहून किंवा नार्वे देशाहून वाटसरू चालला असतां, उत्तरध्रुववृत्तापली कडे देखील त्यास सुखानें व निर्भयपणानें जातां येतें; परंतु तो फिन्‌मार्क नामक देशांत एकदां शिरला, म्हणजे रेनदीरावांचून त्याची पुढें गति होतच नाहीं. ह्या राज्याच्या दोहोंकडांवरचे राहाणारे लोक त्यांचें परस्पर दळणवळण रेनदीरांच्या योगानें मात्र होतें; आणि बारा महिन्यांतून आठ दाहा महिन्यांपर्यंत ज्यांतील लोकांच्या दुसऱ्या लोकांशीं दळणवळणाची अगदीं सोय नाहीं, अशा देशांवर रेनदीरांच्या योगानें विद्या कला कौशल्य त्यांचा प्रसार होतो.

अरबलोकांचें मुख्य धन म्हणजे उंट, तसें लापलांड देशांतील मनुष्यांचें धन रेनदीर होय. एका कळपांत ३०० पासून ५०० पर्यंत रेनदीर असतात; असा कळप ज्याच्या जवळ असतो तो मनुष्य सुखी, व त्याचा बराच चांगला निर्वाह चालतो. उन्हाळ्यांत वर्षाच्या बेगमीचे चक्के खवे त्यांच्या दुधाचे करतां येतात; आणि हिंवाळ्यांत दोन चार दिवसांआड आपणास व कुटुंबास मांस खावयास

मिळे इतके रेनदीर, कळप कमी केल्यावांचून, मा गवयास सांपडतात. ज्यापाशीं दोनशेंच रेनदीर असतात, त्याचें कुटुंब लहान असलें तर त्यास कशी तरी गरज चालवितां येईल. ज्यापाशीं शंभरच रे नदीर असतात, त्याच्या निर्वाहाची मोठी पंचाईत पडती; कारण कीं उपजीविकेसाठीं केवळ त्यांज वरच आपला भरंवसा ठेवितां येत नाहीं. आणि ज्याजवळ पन्नास मात्र रेनदीर असतात, तो कां- हीं स्वतंत्र नसतो, व निराळा संसार त्याच्यानें क- रवत नाहीं.

हिंवाळा जवळ येऊं लागला, म्हणजे रेनदी रांच्या आंगावरील केश फार चमत्कारिक रीतीनें दा ट होऊं लागतात, आणि उत्तरध्रुवाजवळच्या देशां तील चतुष्पादांचा जो विशेष रंग, म्हणजे पांढुर कारंग, तो त्यांस प्राप्त होतो. उन्हाळ्यामध्यें रेन दीर हिरवा चारा, व चालतांना वाटेवर ज्या वन स्पति सांपडतात, त्या खाऊन निर्वाह करितात. हिंवाळ्यांत तर बर्फाखालीं जें शेवाळ असतें, त्या चें ठिकाण आंगच्या बुद्धीनें त्यास काढतां येतें, तें मात्र त्याला खावयास मिळतें.

रेनदीर बिनचाकी गाडीला जोडला असतां, समारें ३०० पोंड ओझें त्याच्यानें नेववतें; तरी लापलांडचे लोक २४० पोंडांहून अधिक ओझें बहुत करून गाडींत लादीत नसतात. रेनदीर दर अवरास दाहा मैल चालतात, आणि त्यांचें धैर्य इतकें आहे कीं, १९ अवरांत १५० मैलांची वाट थकल्या वांचून ते चालतात. ही गोष्ट विरळ नाहीं, वारंवार घडते. स्वीदन देशांतील एका राजवाड्यांत एका रेनदीराचें चित्र आहे, ज्यानें निकडीचा प्रसंग पडला होता तेव्हां कोणी कामगार जरूरीचे कागद घेऊन जाणारा, त्याला ४८ अवरांमध्यें ८०० मैल गाडींत ओढून नेलें. ही गोष्ट खरी मानावयास कठीण, तरी घडली असें लोक म्हणतात.

शुक्राचा तारा सूर्यबिंबावरून कसा जातो, हें पाहाण्यासाठीं पिकूटेट् म्हणून फ्रान्स देशांतील ज्योतिषी सन्न १७६९ वे वर्षी लापलांडच्या उत्तरेकडील भागांत गेला होता; त्यानें रेनदीराच्या गतीचा वेग पाहाण्याकरितां तीन हलक्या गाड्यांस तीन रेनदीर जोडून एका मैदानावर पिटविले. तो टप्पा लहान होता, व गतीचा वेग समजावा म्हणून त्यानें तो टप्पा

मोजला होता. पहिला रेनदीर दोन मिनिटांत ३०८९ फूट गेला; त्या मानानें एका तासांत सुमारें एकोणीस इंग्लिश मैल पडले. दुसऱ्या रेनदीरास तितका टप्पा आटोपायास तीन मिनिटें लागलीं. तिसऱ्या रेनदीरास तीन मिनिटें व सव्वीस सेकंड लागले. रेनदीर पिटविण्याकरितां जें मैदान पाहिलें होतें तें बहुतकरून सपाट होतें, उंचसखल नव्हतें.

गाडी ओढण्याविषयीं रेनदीरास अगोदर बरें च शिकविलें पाहिजे; आणि तो तयार झाल्यावर ही गाडी हांकणारा चांगला वाकबगार पाहिजे. कधीं कधीं रेनदीरास तालिम चांगली दिली नसली, आणि हांकणारा अडाणी असला, तर रेनदीर मस्ती करून उलटून हांकणाऱ्याच्या आंगावर मोठ्या आवेशानें पडपडून गाडीपासून आपणांस सोडवून घेतो; पण अशी गोष्ट क्वचित् घडती. तो बहुत करून इतका गरीब असतो कीं त्यास लगामानें फारशी इशारत द्यावी लागत नाहीं; आणि त्याचें धैर्य इतकें आहे कीं, पळतां पळतां वर्फांचा घांस मागें तोडून खातो त्याशिवाय दुसरा चारा चवीना

कांहींच नखातां, अबरांचे अबर एकसारखा श्रम करून पुढें धांवत चालतो.

---

## पाठ ५१

## समुद्रांतील प्रवालकीटक म्हणजे पोंवळीं करणारे किडे.

हे पोंवळेकिडे मुख्यत्वें करून दोहों अयनवृत्तांच्यामध्यें जो प्रदेश आहे त्यांत फार आहेत. हे आकारानें लहान मोठे असतात; जे फार लहान ते टांचणीच्या डोक्याएवढे असतात, आणि जे फार मोठे ते वाटाण्याहून कांहींसे मोठे असतात. हे जीव इतके क्षुल्लक आहेत, तरी ते लक्षोपलक्ष एकत्र जमून, युगानुयुग आपला उद्योग सतत चालवून, प्रवालभूमिका म्हणून जे समुद्रामध्यें पोंवळ्यांचे खडप आढळतात, ते हेच किडे रचितात.

त्या किड्यांनीं केलेला न्यू हालंडाचा जो मोठा खडप तो एकटा हजार मैल लांब भरतो; आणि त्याची उंची तर एक हजार फुटांपासून दोन हजार फुटांपर्यंत भरती. हा खडप डोंगरांची एक ओळ आहे; ती लांबीला इंग्लंड देशाच्या त्या टोकापासून त्या टोकापर्यंत जी लांबी तिच्या तिप्पट आहे; आणि उंचीला तर इंगलबरो म्हणून एक डोंगर आहे तितका, किंवा स्काट्लंडांतील जे साधारण डोंगर आहेत तितका आहे, आणि हें काम घरांतील माशांपेक्षांही लहान किड्यांनीं केलेलें आहे!

हें तर कांहींच नाहीं पासिफिक् नामक जो महासागर तो त्याच प्रकारच्या रचनेच्या, व त्याच क्षुल्लक शिल्प्यांनीं केलेल्या बेटांनीं सारा व्यापलेला आहे. प्राण आहे नाहीं अशा प्रकारचे हे प्राणी त्याच्या लहानशा घरांत कोंडून ठेवलेले, व दोन दिवसांच्या आयुष्याचे असून, मनुष्यें, जनावरें, वनस्पति, ह्यांच्या राहाण्याच्या जागा दिवसानदिवस व तासानतास उत्पन्न करीत आहेत! हे नवीन द्वीपं करीत आहेत; हे नवीन जग रचीत आहेत! परमेश्वराच्या परम समर्थ हाताच्या करणीच्या का-

तुकांतील हें एक कौतुक आहे. लोकांचें कल्याण म्हणून जो आशय त्यानें दयाबुद्धीनें धरिला, तो सिद्धीस नेण्याकरितां जीं साधनें त्यानें योजिलीं आहेत त्यांतील हें एक साधन आहे.

हे किडे नवे महाद्वीप उत्पन्न करीत आहेत, असें जें आम्हीं म्हटलें, ही अयुक्ति नव्हे. यथार्थच बोलणें आहे. नावाडी लोकांस आतां समजलें आहे, कीं, दक्षिणमहासागर त्या अशा बेटांनीं संकीर्ण होऊन पाण्याखालीं त्याच जातीचे खडपही पुष्कळ झाले आहेत. ते पाण्याच्या पृष्ठभागाकडे लवकर वाढत चालले आहेत. ते पुढें पाण्याच्या वरतीं येऊन, त्यांजवर मनुष्यांची वस्ती होऊन, त्यांनीं आपलें राज्य वाढवावें, अशी ईश्वराची योजना आहे. हे खडप वाढतां वाढतां एकमेकांस जडून त्यांचीं मंडळें व रांगा होतात; पुढें आणखी वाढतां वाढतां त्यांचे मोठे विस्ताराचे माळ होऊन जातात. हा कार्यक्रम तां बडा समुद्र, म्हणजे आरबी समुद्र, त्यातही दिसण्यांत येतो. त्यांत पोंवळेकिड्यांनीं केलेले खडप फार वाढल्यामुळें दिवसानदिवस जहाजें जाण्यायेण्यास फार अडचणी होत चालल्या आहेत; आणि न जाणों

कदाचित् पुढें असा समय येईल, कीं मिसरदेश आणि अरबस्थान, हीं त्या समुद्राच्या कांठावर समोरासमोर आहेत, त्यांस जोडणारें असें एक मैदान मध्यें उत्पन्न होईल.

त्या किड्यांनीं जें काम आरंभिलें तें पूर्ण करण्यासाठीं जी तजवीज परमेश्वरानें खोल जमिनींत करून ठेविली आहे, ती आपण त्या प्रसंगीं पाहावी, आणि आपणास चमत्कार व संतोष वाटावा. ती तजवीज कोणती म्हटली तर, जमिनीच्या पोटांत ज्वालामुखी व भूमिकंप त्यांचें बीज ठेविलें आहे; त्याच्या योगानें प्रसंगानुसार ज्वालामुखी व भूमिकंप होऊन तद्द्वारा डोंगर व खोरीं उत्पन्न होतात, आणि समशीतोष्ण कटिबंधांतील हवा विषुववृत्ताच्या जवळील प्रदेशांत येती. त्या रीतीनें त्या किड्यांनीं आरंभलेलें काम शेवटास जातें; आणि जेणेंकरून पृथ्वीला सुपीक करावयाकरितां मेघ जमावयाचे, व झरे फुटावयाचे, व नद्या वाहावयाच्या, व मोठें जलयंत्र त्याच द्वारानें उत्पन्न होतें. हें सर्व काम लहानशा एका तासांत होऊन जातें. पोंवळेकिडे हे परमेश्वरानें निरर्थक केले नाहींत, तसेंच ज्वालामुखी व भूमिकंपहीं ही लो-

कांच्या नाशाकरितां केलीं नाहींत; तर हीं साधनें जरी विपरीत दिसतात तरी त्यांपासून एकच कार्य निष्पन्न होतें, तें कार्य कोणतें म्हणाल तर मनुष्यांचें कल्याण.

---

## पाठ ५२
## ब्रिटनदेशाचा सर्वोत्कृष्ट पराक्रम आणि वैभव

ज्याचें सैन्यादिबळ मोठें त्याचेंच आधिपत्य आहे, असें नाहीं, तर ज्याचें वजन चोहोंकडे पडतें त्याचें आधिपत्य खरें, असा न्याय जर स्वीकारला, तर इंग्लंडदेश विस्तारानें जरी लहान आहे, तरी सांप्रत सर्व पृथ्वीचा वास्तविक अधिपति आहे. देशादेशांची स्पर्धा लागून त्यांचा तंटा पडला असतां, ते देश आश्रय मागण्याकरितां इंग्लंडाकडे शरण येतात. कोणा देशास त्याच्या शत्रूनें लढाईची दहशत घातली असतां, तो देश प्रथम इंग्लंडाचें पाठबळ संपादावयास प्रयत्न करतो

पृथ्वीच्या कडेशेवटचे देश सांप्रतकाळीं कोणाला संपत्ति असावी, व सुख असावें, म्हणून खपत असतात, बरें? पोलंड देशाचा शेतकरी कोणाकरितां, बरें, जमीन नांगरीत असतो? अमेरिकाखंडातील राहाणारा कोणासाठीं, बरें, पारध करून पशु धरतो, व कोणासाठीं कापसाचीं झाडें लावतो? चीन देशाचा राहाणारा कोणासाठीं, बरें, आपल्या चहाचा पाला खुडून सांठवितो? आणि ब्रेजिल देशाचा राहणारा कोणासाठीं, बरें, सोनें आणि रत्नें त्यांचा संग्रह करतो? तर त्या सर्वांचें लक्ष्य एका इंग्लंडाकडे असतें.

पृथ्वीवरील दूर दूरच्या कोंपऱ्यांतील हरएक उद्म्याची दृष्टि कोणत्या पेंठेकडे, बरें, असती? अमेरिकेपासून इंदियेपर्यंत हरएक सरकार मोठ्या एकाग्रतेनें कोणत्या सरकाराकडे, बरें, लक्ष्य लावतें? त्याचें उत्तर तेव्हांच मनांत येतें जसा काय सर्व राष्ट्रांचा राजा असा इंग्लंड देश होऊन बसला आहे. कधीं कोणत्या वेळीं ब्रिटन देशाची तोफ सुटली, म्हणजे सर्व युरोपखंडांतील देशांस युद्धास लागण्याची इशारत झाली, असें समजावें.

मोठ्या आधिपत्यास योग्य अशा ब्रिटन देशाची प्रजासंख्याही मोठा आहे, ती बहुतकरून दोन कोटी असावी, आणि त्या मोठ्या संख्येस क्षणांत परस्पर वर्तमान कळविण्याच्या, व एकत्र जमविण्याच्या इतक्या सोई आहेत, कीं दुसऱ्या देशाचे तीन कोटी लोक आणि त्या देशांतील दोन कोटी लोक बरोबर आहेत, असें म्हटलें असतां योग्य आहे.

त्या देशांतील जाण्यायेण्याची अशी विलक्षण सोय आहे, कीं कोणत्याही कामाकरितां कोणत्याही ठिकाणीं, व कोणत्याही वेळीं, जमावाचें बळ पाहिजे असें असलें, तर त्या ठिकाणीं त्यावेळेस जमाव पोहोंचवितां येतो. परचक्र येण्याची दहशत जर इंग्लंडास पडली, तर पाहिजे त्या बंदरकिनाऱ्याचें संरक्षण करण्यास चोवीस तासांत आनएक लक्ष मनुष्यें तेथें पोहोंचवितां येतील.

हे जाणें येणें विलक्षण सोपें, आणि वारंवार घडतें असें, त्याचा चमत्कारिक असून सोपा हिशेब कोणी केला आहे, त्यावरून दिसतें, इंग्लंड देशांतील टपालाच्या गाड्या चोहोंकडे धावतात, त्याचा हिशोब केला असतां, एका रात्रींत सर्व गा-

ड्यांचा मिळून बारा हजार मैल टप्पा भरतो. ह्या लां
बी पृथ्वीच्या सर्व परिघाच्या अर्धा इतकी आहे.
वर्तमानपत्र लंडनांत सकाळीं छापलें तें एकशेंवीस
मैल दूर राहाणारे लोक त्याच दिवशीं संध्याकाळीं
वाचतात.

. लंडनशहराच्या आंत त्याआंतील टपालाचा
वसूल सगळ्या फ्रान्स देशाच्या टपालाच्या वसूला
बरोबर आहे. असें कोणी म्हणतात. लंडनाहून
कोणी वाटसरू रात्रीस निघाला तर दुसऱ्या दिवशीं
रात्रीस चारशें मैलांवर पोहोंचून निद्रा घेतो. लं-
डन शहराच्या शेजारीं जे कालवे आहेत, त्यांची
लांबी एकत्र केली असतां, फ्रान्स देशांतील सर्व का
लव्यांच्या लांबीबरोबर भरती, अशी गणना कोणीं
केली आहे.

ब्रिटनदेशाच्या महत्वास मोठी लोकसंख्याही
जशी एक कारण आहे, तसे त्यांतील लोकांत ना-
नाप्रकारचे उद्योग चालत आहेत, हेंही एक कारण
आहे. इंग्लंडदेश म्हणजे केवळ एक गोदी आहे, किं
वा केवळ एक शिल्याचा कारखाना आहे, किंवा के-
वळ एक शिपायांची दराक आहे, किंवा केवळ एक

नांगरलेलें शेतच आहे, असें नाहीं. ही आमचीरा ष्ट्ररूप नौका एकाच अवजारानें चालते असें नाहीं. हिला बहुत अवजारें आहेत.

शिल्पकर्माचा उद्योग चालविणारे लोक तीस लक्ष असून, वैद्य, वकील, वगैरे रोजगारी लोक, पुष्कळ आहेत; व नावाडी लोक पुष्कळ आहेत; आणि त्या खेरीज मोठे प्रबळ, निरोगी व मोठ्या जमाती चे, असे शेतकरी लोक त्यांची संख्या मोठी आहे. दुसऱ्या मंडळींतील लोक जर कमी झाले तर त्या शेतकऱ्यांच्या मंडळींतून त्यांची पुरवणी होती.

नामांकित व्यापारी लोकांचीं लोकसत्ताक राज्यें जिकडे तिकडे होऊन गेलीं, त्यांमध्यें शेतकरी लोक अगदीं नसत, म्हणून तीं राज्यें बुडालीं.

इसवी सन्न १०६६ त्या वर्षी विल्यमविजयी इंग्लंडदेशावर स्वारी करून तेथील तक्तावर बसला, तेव्हांपासून इंग्लंडदेशाचें राज्य स्वतंत्र आणि सत्ताधारी आहे. ही जी मुदत सांगितली ती, जूल्यससीजरापासून रोमन लोकांचें राज्य समाप्तीस गेलें तोंपर्यंत जी मुदत, तिजपेक्षां हालीं अधिक झाली आहे; आणि त्यापूर्वी ज्या वेळेस कानसल नामें रोमन लो-

कांचे अधिकारी ह्यांची नेमणूक होऊन रोमी लोकां च्या राज्याचा उदय झाला, त्यावेळेपासून त्यांच्या राज्याच्या समाप्तीपर्यंत जी मुदत, तिच्या बरोबर झाली आहे.



## पाठ ५२

## विश्व

जे जे गोल अंतरिक्षांत चोंहींकडे आपल्या पाहाण्यांत येतात, त्या सर्वांमध्यें पृथ्वी फार विस्ताराची आहे, असें पृथ्वीच्या पाठीवर राहणारे जे आपण त्या आपणांस वाटतें, परंतु ग्रहांपैकीं एखाद्या ग्रहावरील पाहाणाऱ्यासही पृथ्वी केवळ बिंदूएवढी दिसेल; आणि त्याहूनही दूरच्या अंतरावर जे राहणारे त्यांस तर ही पृथ्वी दिसणार देखील नाहीं.

रात्रीची स्वारी चालली असतां जो तारा आपल्या कक्षास्थळपरत्वें कधीं कधीं सर्वांच्या पुढें जातो, आणि कधीं कधीं सर्वांच्या मागें राहून अरुणोदय होणार अशी सूचना करितो, ज्या ताऱ्यास त्या

कारणावरून संध्याकाळचा तारा आणि प्रातःकाळचा तारा असें कोठें कोठें ह्मणतात, तो तारा ग्रहरूप एक लोक आहे. हा ग्रह आणि आपापल्या कक्षांत चालणारे त्याचे सोबती दुसरे ग्रह हे जातीनें निस्तेज आहेत, आणि सूर्यकिरणांच्या प्रतिबिंबित तेजानें मात्र प्रकाशतात. त्या सर्वांस जमीन, समुद्र, व अभाळ हीं ज्यांचीं त्यांचीं वेगळालीं आहेत; त्या सर्वांवर प्राण्यांची राहण्याची सर्व प्रकारची सोय आहे; आणि त्यांवर चिच्छक्तिसंपन्न प्राणी राहतात असा तर्क लोक करितात.

जिजवर आपण राहतों ह्या पृथ्वीसुद्धां सारे ग्रह सूर्याच्या आश्रयानें आहेत; त्याच्या किरणांपासून त्यांस उजेड प्राप्त होतो, आणि त्यांस जें कांहीं सुख प्राप्त होतें तें सूर्याच्या कृपेच्या योगानें होतें. सूर्य हा आपणांस नित्य आकाशांतून चालतोसा दिसतो; परंतु तो चालत नाहीं; तो एका ठिकाणींच स्थिर आहे. ज्या मोठ्या आंसाच्या भोंवतालीं ही आपली पृथ्वी आणि हिजपेक्षांही मोठाले ग्रह ईश्वरानें नेमलेल्या आपापल्या कक्षांतून चक्राकार फिरतात, तो आंस सूर्य आहे.

ज्या शंकुयंत्रास सूर्य प्रकाशित करतो त्या शंकु यंत्रापेक्षांही तो सूर्य लहान दिसतो; तरी जिजवर मोठमोठे उंच पर्वत आहेत व जिजवर मोठाले समुद्र वाहात आहेत, त्या पृथ्वीपेक्षांही तो अतिशयित मोठा आहे. त्या तेजस्वी सूर्यगोलांतून जर आरपार रेषा नेली तर ती आठ लक्ष मैलांपेक्षांही अधिक लांब भरेल. त्याच्या परिघावर जर सूत्र वेष्टिलें तर त्याची लांबी अनेक प्रयुतें मैल भरेल.

विद्वान् लोकांपासून ह्या गोष्टी ऐकून आपण थक्क होतों का? ज्यानें एवढा प्रचंड अग्नि पेटविला, आणि ज्यानें एवढी अफाट ज्वाळा युगांचीं युगें राख ली, तो केवढा मोठा सामर्थ्यवान् आहे, असें बोलावयास आपण सिद्ध आहों का? तर जे विद्वान् आपणांस विद्येचा मार्ग दाखवितात त्यांकडे आपण आणखी लक्ष दिलें असतां ह्यांहून मोठ्या व अधिक चित्तवेधक अशा गोष्टी आपणांस कळून येतील

हा आपला सूर्य त्याचे परिचारक ग्रहांसह पाहिला असतां तो विश्वाचा अतिशयित लहान असा एक अंश मात्र आहे. हरएक तारा कोणेकाच्या बो

टांतील अंगठीवर चमकणारा जो हिरा तेवढा जरी दिसतो, तरी वास्तविक म्हटलें तर मोठेपणानें व तेजानें आपल्या सूर्यासारखा तो एक एक मोठा गोलच आहे. हा आपला जो देदीप्यमान दिनकर त्याहून ते तेजानें व विस्तारानें कांहीं कमी नाहींत; म्हणून हरएक तारा एकटा नुसता लोकच आहे असें नाहीं, तर तो आपापल्या ग्रहमाळेंतील सूर्यच आहे.

एका एका ताऱ्यामागें त्याच्या त्याच्या किरणांनीं प्रकाशित अशी ग्रहमाळा आहे, जी ग्रहमाळा त्याच्या त्याच्या आकर्षणशक्तीनें त्याच्या त्याच्या भोंवतीं फिरती. हें सगळें आपणांस दृष्यगोचर आहे. हे तारे लहान लहान बिंदूएवढे आपणांस दिसतात, हें त्यांच्या अचिंत्य व अतिशयित दूरत्वामुळें होतें; ते तारे अचिंत्य व अतिशयित अंतरावर आहेत खरे. कांतर तोफेंतून सुटलेला गोळा वेग कमी न करितां तसाच पहिल्या धडाक्यानें जर चालला, तर त्यास त्या ताऱ्यांमध्यें जो तारा आपणांस जवळ आहे तेथपर्यंत पोहोंचायाला सुमारें सात लक्ष वर्षें लागतील.

हा अवाढव्य विश्वविस्तार पाहून माझ्या स्वतांचा पराकाष्ठेचा तुच्छपणा माझ्या मनांत येतो. तसाच ह्या भूगोलावरील सर्व विषयांचा तुच्छपणा माझ्या मनांत यावा. ही पृथ्वी, तिजवरील मोठमोठे पर्वत, मोठमोठे सागर, व मोठमोठी वनें, ह्यांसुद्धां धरून ह्या आकाशांत जी ग्रहनक्षत्रादिकांची मोठी विस्मयावह व थाटमांडाची रचना केलेली आहे तिशीं लावून पाहिली असतां काय आहे? तर विश्वाचा मोठा नकाशा केला असतां त्यांत ही पृथ्वी मोठ्या कष्टानें कळे नकळेसा एक अगदीं सूक्ष्म बिंदूमात्र होईल.

कोणी एक विवेकी ग्रंथकर्त्यानें म्हटलें आहे कीं, विश्वाच्या ह्या भागाला उजेड देतो असा जो सूर्य दीप तो विझाला असतां, आणि त्याजभोंवतीं फिरणारी जी ग्रहमाळा ती नाहींशी झाली असतां, सर्व विश्वाचा घेर एकदम ज्याच्या दृष्टींत भरतो, त्याला ती रिती जागा, जसा समुद्राचे वाळवंटांतील एक कण काढला असतां त्याची जागा समजण्यांत येत नाहीं, तशी समजण्यांत येणार नाहीं

त्या सूर्यादिकांचें आकारमान, आणि जो प्रदेश ते आक्रमून असतात तो देश, ही सर्व विश्वाशीं लावून पाहिलीं असतां जर ते नेथून गेले, तर गेले असें मोठ्या कष्टेंकरून मात्र समजेल. ही पृथ्वी असो, पण हा सूर्य आणि त्याजभोंवतालचीं ग्रहमाळा त्यास ज्यापक्षीं इतका लहानपणा येतो त्यापक्षीं पृथ्वीवरील एका राष्ट्राची किंवा एका देशाची काय कथा? जाहागीरदारांच्या जाहागिरी, आणि ज्यांस आपण श्रीमंत लेखतों त्यांचीं वतनें, ज्यांला लोक फार वाखाणतात, त्यांची काय कथा? जेव्हां मी आपल्या क्षुद्र धनाशीं त्यांस लावून पाहातों तेव्हां तीं फुगून मोठीं नामी दिसतात; परंतु जेव्हां विश्वाशीं तोलून पाहातों तेव्हां त्यांस इतका हलकेपणा येतो कीं, त्यांचा डामडोल जरी मोठा तरी तीं कांहींच नाहींतशीं होऊन जातात

# पाठ ५४

## एकचर माशांचीं घरें

संघचर ज्या मधमाशा आणि डांस ह्यांच्या मोहोळांची थोडी बहुत माहीतगारी बहुतकरून सर्वांस असती; तरी त्यांतील एकचर जातीच्या माशा जीं घरें करितात तीं तशींच पाहावयाजोगीं असतात, आणि त्यांच्या रचनेमध्यें माशांनी तितकी युक्ति व कौशल्य दाखविलेलें असतें.

जसा एखादा चांगल्या बंदोबस्ताचा कारखाना असतो, त्यांत कामाच्या अनेक वांटण्या होऊन तें स्वच्छीन चालतें, हें पाहून पाहणाऱ्यास आनंद वाटतो, तसा सर्व संघचर माशा एकच उद्देश धरून जुटीनें आपलें काम करतांना पाहून आनंद वाटतो. जसें सुताच्या कारखान्यांत कोणी कापूस पिंजण्याकडे लागतात, कोणी त्याचा धागा काढण्याकडे लागतात, कोणी ते धागे रहाटावर गुंडाळण्याकडे लागतात, कोणी त्या धाग्यांचे दोरे बळण्याकडे लागतात; तसें एका मोहळाच्या माशा

आपलें समाईक काम साधण्याकरितां त्यांतील प्र-त्येक माशा, आपणांस काय केलें पाहिजे हें समजून, आपआपले वांट्याचें काम आपल्याकडे घेऊन, दुसऱ्यांच्या कामामध्यें पडून कोणी कोणास अडथळा नकरितां, क्रमाक्रमानें तें आपलें समाईक सुंदर काम शेवटास नेतात, हें पाहून आपण आश्चर्य व आनंद पावतों

संघचर माशांचा जितका चमत्कार वाटतो, तितकाच एकचर माशांचा चमत्कार वाटायाजोगा आहे. कोणी एक युक्तिमान् कारागीर केवळ आपल्या हाताच्या श्रमानें कांहीं वस्तु भूषणार्थ किंवा नित्याच्या वहिवाटीसाठीं करतो, हा कारागीर चीन देशांतील दमाचा कोरणारा असो, जो हस्तिदंताचा ठोकळा घेऊन त्याच्या नकशीदार डब्या करतो, अथवा युरोपखंडचा कांतणारा असो, जो फारच साध्या साधनांनीं बुद्धीचा खर्च करून हरतऱ्हेचे ढबदार दागिने करतो, त्याचें काम पाहून जसा आपणांस आनंद होतो, तसा एकचर मधमाशी अथवा डांस, जो आपण एकटाच आपणास करावयाचें जें काम तें आरंभापासून शेवटापर्यंत करतो,

त्यास पाहून आपणांस आनंद व्हावा.

ग्रेटब्रिटन बेटामध्यें एकत्वर मधमाशा आणि डांस त्यांच्या अनेक जाति असतात. ह्या प्राण्यांचें काम पाहून तुम्हांस जी मौज वाटावया लागी आहे, तिचा नमूना तुम्हांस व्हावा म्हणून एकेठिकाणीं एका डांसानें जें घर केलें त्याचें वर्णन आम्ही तुम्हांस करून दाखवितों.

रेनीनामें कोणी साहेब त्यानें असें म्हटलें आहे कीं, सन्न १८२८च्या सप्तंबर महिन्यामध्यें केंट नांवें इंग्लंडांतील प्रांत एथील ली नांवें गांव आहे तेथील एका घराच्या पूर्वेकडील भिंतीस भुईपासून समारें पांच फूट उंचीवर एक वीट होती. त्या विटेला भोंक पाडावयाच्या कामास झटलेली अशी एक कुंभारीण आम्हीं पाहिली. ती कुंभारीण वीट पोंखरूं लागल्याचे पूर्वीं त्या विटेस यदृच्छेकरून झालेलें यत्किंचित् छिद्र होतें किंवा नव्हतें हें माहीत नाहीं; ती वीट तर पिंवळ्या जातीची फारच कठीण होती.

वीट पोंखरतां पोखरतां जे कण निघत ते फार जपून ती दूर नेऊन टाकी; ही गोष्ट तिच्या घर करण्याच्या कृतींत सर्वांहून चमत्काराची होती. ति-च्या कृतीची कल्पना कोणी पूर्वीं करूं गेल्यास असें

वाटावें कीं, कुंभारिणीनें विटेस भोंक पाडतांना जे कण निघावे ते तिनें भोंकाचे बाहेर टाकावे, व त्यां विषयीं पुढील काळजी सोडावी ; जसें घूस आपल्यासाठीं बीळ करतांना जो उकीर निघतो त्याविषयीं काळजी न ठेवितां तो बाहेर टाकून देती, तरी कुंभारिणीची कल्पना अशी नव्हती ; तिला वाटलें असेल कीं, भिंतीच्या नळीं कणांचा ढीग जर पडला, तर कोण जाणें, आपले शत्रु बहुत आहेत त्यांपैकीं कोणी तरी त्या ढिगावरून आपल्या घराचें ठिकाण लावील . विशेषेंकरून त्या गोष्टीविषयीं इक्न्यूमन माशी, त्या नांवाची एक मोठी जात आहे, तींतील कोणी तरी शत्रु ठिकाण लावील, असें भय वाटलें असेल ; कारण कीं, त्या माशा आपलीं आंडीं चोरून घालण्याकरितां निरंतर हरएक कोनकोपरा न्यहाळून तळपत घराचा शोध करीत असतात . असाच कांहीं विचार मनांत आणून जे कण निघत गेले ते तिनें दूर नेऊन टाकले असावे. तिला आपल्या घराचा माग मोडण्याचा हेतु होता हें तर खचित, कशावरून तर एक कण भोंकांतून

सहज खालीं पडला होता, तो तिनें भिंतीचे तळीं लागलाच हुडकून काढून, दुसऱ्या कणांसारखा आपल्या जाभाडांत धरून दूर नेऊन टाकला.

दोन दिवसांचे आंत तिचें पोखरण्याचें काम संपलें; परंतु चिखलाच्या लेपानें तें भोंक मढविणें, त्यांत दोन आंडीं घालणें, आणि आपलीं पिलीं आंडीं फोडून बाहेर निघतील तेव्हां त्यांस खाण्याची बेगमी असावी म्हणून दोन चार जिवंत कोळी, किंवा कुसरूड, त्यांत कोंडून ठेवणें, ह्या कामांस आणखी दोन दिवस लागले. ह्यानंतर हा लहान शिल्पी चिखलाचा लेप करून आपल्या घराचें द्वार बुजवितां आम्हीं पाहिला. तिनें भिंत पोंखरून जें घर केलें त्याचा तपास आम्हीं मागून केला तों तें भोंक एक इंचाहून कांहींसें कमी इनकें खोल होतें.

ह्या लेंकुरवाळे कुंभारिणीनें आपलें घर लपवून राखावयाचा मोठा बंदोबस्त केला होता. तरी एके कुकूनांवाच्या माशीला तें उमगून त्यांत तिनें एक आंडें घातलें; त्या आंड्यांतून जो किडा निघाला त्यानें कुंभारिणीच्या आंड्यांतून निघालेल्या किड्यांपैकीं एक

खाऊन टाकला; मग तो आणि कुंभारिणीच्या अं
ड्यांतून निघालेल्यांपैकीं राहिलेला किडा हे दोन
किडे कोसले, म्हणजे सकोश प्राणी, झाले; आ-
णि उन्हाळा आला म्हणजे आपले कोश फोडावे,
आणि सपक्ष प्राणी होऊन आपल्या आईबापांचेप-
री वर्तावें, म्हणून उन्हाळ्याची वाट पाहात राहि
ले



# पाठ ५५

## प्राण्यांच्या शरीरांची रचना ज्ञानानें झाली आहे. त्याला प्रमाणें नेत्र आणि मानेंतील हाडें.

स्तर्म्यस म्हणून एक विद्वान् होता तो असें म्हणत असे कीं, नेत्रनिरीक्षण नास्तिक्यभंजन, म्हणजे डोळ्याची पाहाणी नास्तिकपणाची भंजक होय. डोळ्याच्या रचनेसंबंधी जितक्या गोष्टी आहेत तितक्यांत मोठी विलक्षण सावधगिरी दिसून येती; आणि त्याचें रक्षण चांगलें व्हावें त्याविषयीं काळजी ही दिसून येती. डोळ्याची योग्यता व नाजूकपणा पाहिला असतां इतकी काळजी असावीच असें वाटतें. त्याला बळकट व खोलगट असें एक हाडाचें घर असतें. हें घर तर शेवटास पोखरलेलीं अशीं सात हाडें मिळून केलेलें आहे. त्या घराच्या आंत डोळा मांद्यांत बसविलेला असतो. सर्व प्राण्यांना

मध्यें मांदें डोळ्याच्या स्थिरतेला व चलनाला फार सोईचें आहे.

डोळ्याला भिंवई ही आश्रा आहे. भिंवई म्हणजे केंसांची कमान; ती छपरी पडवीसारखी आहे. ती कपाळाचा घाम आणि ओलेपणा डोळ्यांत जाण्याचा प्रतिबंध करिती. पांपण्या तर भिंवईपेक्षां त्याचें अधिक रक्षण करितात. पांपण्या डोळ्याचें रक्षण करितात, डोळ्याला पुसतात, आणि झोंप लागती तेव्हां त्याला झांकतात.

त्या इंद्रियाच्या द्वारानें जीं कामें होतात तीं कर्त्याच्या उद्देशाप्रमाणें होतात, हें स्पष्ट दिसतें. त्यांच्यापेक्षां कोणत्याही कौशल्याच्या करामतींत कर्त्याचा उद्देश अधिक स्पष्ट दिसून येतोसें वाटत नाहीं, किंवा त्या इंद्रियाच्या कामास जीं योग्य साधनें आहेत त्यांहून योग्य अशीं साधनें कोणत्याही कामाला आहेत असें वाटत नाहीं. जरकरतां डोळ्याच्या साधनांची योग्यता सृष्टीचे शोधकांनीं मनांत आणिली नसली, तर, हें काम नित्याचे पाहाण्यांतलें आहे, व उघड वाटेवरचें पडलें, म्हणून मात्र मनांत आणलेली नसावी. जी गोष्ट नित्याच्या

पाहाण्यांतली असती, तिची उपेक्षा करावी हा जो चित्ताचा कल आहे, त्यास आपण जपलें पाहिजे. एखाद्या गोष्टीचीं उदाहरणें आपण पाहात असतां विरळ आणि चमत्कारिक अशांच्या शोधास लागून, जीं उदाहरणें फारच उघड असतात तीं आपण वगळतों. त्या मनोवृत्तीनें जीं उदाहरणें अवश्य मनांत आणायाजोगीं असतात, त्यांचीही कधीं कधीं उपेक्षा होती.

डोळा चकचकीत राहून त्याचा व्यापार चांगला चालावा म्हणून त्यास ओलसरपणा आणि स्वस्थपणा हे गुण नेहमीं असले पाहिजेत. हे गुण त्याला पुरवायाकरितां त्याच कामासाठीं रक्तापासून वाहिनीच्या योगानें काढलेलें पाणी त्यास नेहमीं मिळतें. कामास पुरून जें जास्त पाणी राहतें, तें क्षाररूपानें, हंसाच्या पिसाच्या नळीएवढें हाडास एक भोंक आहे, त्यांतून नाकांत जातें. नाकांत तें पाणी शिरल्यावर नाकपुडीच्या आंतल्या बाजूवर पसरतें; आणि श्वासोछ्वास होत असतां जो उष्ण वायु त्यावरून सतत जातो, त्याच्या योगानें तें वाफ होऊन निघून जातें. कापड रंगविण्याच्या कारखान्यांत

किंवा कलालाच्या कारखान्यांत शबाचे पाणी जाण्या करितां ज्या नळ्या किंवा मोऱ्या केलेल्या असतात, त्या ह्यापेक्षां अधिक शिल्पविद्येच्या युक्तीनें केलेल्या आहेत काय?

मासे ज्या द्रव्यांत राहातात त्याकडून नेहमीं त्यांच्या डोळ्यांस धुवणी मिळती, म्हणून त्यांला त्या पाण्याच्या पुरावयाची तरतूद नसती, ही गोष्ट लक्षांत ठेवायाजोगी आहे.

मी प्रतिज्ञा करितों कीं, कधीं कोणीं रचिलेलें असें पराकाष्ठेचें जोडगिरीचें यंत्र, त्यांतील कांटे व सांधे मनुष्याच्या मानेच्या कांटयांसांध्यांपेक्षां अधिक कौशल्यानें झाले, असें कोणाच्यानें दाखववणार नाहीं; हा विडा पाहिजे त्यानें उचलावा. मानेची रचना करतांना दोन गोष्टी साधावयाच्या होत्या. डोक्याला खालीं वर हालण्याची सोय असावी; खालीं पाहतांना किंवा डुकली घेतांना जसें हालतें तसें, ही एक गोष्ट; आणि दुसरी गोष्ट, त्याला धडा वर कांहींसें इकडे तिकडे मुरडून फिरण्याची सोय असावी. ह्या दोन गोष्टींला दोन निराळ्या युक्ति काढल्या आहेत. पहिली युक्ति अशी कीं, मानेच्या म-

णक्यांतील अगदीं वरच्या मणक्यावर मस्तक बसवून बिजागिरीच्या सांध्यानें त्याशीं जोडलेलें असतें, त्या सांध्यावर त्याला खालीं वर व्हावें तसें रूरळीतपणें खेळतां येतें. ही पहिल्या गोष्टीची सिद्धि झाली, पण चक्राकार गति पाहिजे ती अझून व्हावयाची आहे. ती साधायासाठीं दुसरी एक कळ केली; ती कोठें म्ह-णाल तर, वरचा मणका आणि मस्तक ह्यांच्यामध्यें बिजागरीचा सांधा आहे तेथें केली नाहीं, तर वरचा मणका आणि त्याच्या खालचा मणका ह्यांच्यामध्यें केली आहे. ही कळ कुसूं आणि त्याचें घर ह्याप्रमाणें असती.

हा जो दुसरा मणका, म्हणजे वरल्या मणक्याच्या खालोखालचा मणका, ह्यास दांताएवढें आणि दांताच्या आकाराचें एक शृंग असतें. हें वरच्या मणक्यास समोर भोंक असतें त्यांत शिरून त्या मणक्याला हा कांटा होतो. ह्या कांट्यावर तो मणका त्यावरील मस्तकासुद्धां गरगरां फिरतो. मस्तकाला जे स्नायु आहेत ते जिथवर त्याला फिरूं देतात तिथवर त्याला फिरतां येतें. ह्याप्रमाणें एकमेकींस प्रतिबंधक न होतां दोन्ही गति रूरळीतपणें उत्कृष्ट होतात

जेव्हां आपण मस्तक डोलवितों तेव्हां वरचा मणका आणि मस्तक ह्यांच्या मध्यें बिजागरीचा सांधा आहे त्याचा उपयोग होतो, आणि आपण मस्तक फिरवितों तेव्हां वरचा मणका आणि त्याच्या खालचा मणका ह्यांच्या मध्यें जें कुसूं आणि घर आहे त्यांचा उपयोग होतो.

दुर्बिणीच्या घडवंचीच्या रचनेमध्यें हीच युक्ति आणि यंत्रशास्त्राचे हेच नियम दृष्टीस पडतात. दुर्बिणीचें तोंड कधीं मधीं खालवर, कधीं मधीं काळे धारे बरोबर करावें लागतें. खालवर गति करण्यासाठीं एक बिजागरी असती, तिजवर दुर्बीण फिरती. काळे धारे बरोबरची जी गति तिच्या साठीं एक कणा असतो, त्याजवर बिजागरीसुद्धां दुर्बीण गरगर फिरती. मस्तकाच्या दोन प्रकारच्या गतीला ह्याच कळा आहेत. येथें विचारपूर्वक बेत झाला असावा. ह्याचा संशय कोणी धरणार नाहीं; धरला तर मनाच्या कनकुवतीमुळें आपणावर ज्याला भरंवसा ठेवशां येत नाहीं असा मात्र धरील

# पाठ ५६

## आपल्या पिलांचें पोषण करण्याविषयी किड्यांच्या आंगींचें चातुर्य

आपल्या पिलांच्या संबंधी किड्यांच्या आंगीं जी स्वाभाविक बुद्धि असती, ती लक्ष्यांत आणावया जोगी आहे. मोठमाठीं जनावरें आपल्या अपत्यांच्या पोषणाकरितां कठीण हाल भोगितात, तितकेच हाल लहान लहान किडे आपल्या पिलांच्या पोषणाविषयीं भोगितात. ते जिवंत असतां मात्र त्यांची काळजी बाळगतात असें नाहीं, तर प्राण सोडते वेळेस ही त्यांच्या पोषणांची तितकी काळजी बाळगतात. किड्यांपैकीं बहुतेक किड्यांनीं त्यांचीं पिलें उपजण्यापूर्वीच मरावें, असा त्यांजविषयींचा ईश्वरी नियम असतो; तरी अशा अवस्थेंत पडलेलीं जीं मनुष्यजातींतील कृपाळू आईबापें त्याप्रमाणें हे किडे आपल्यां मागून येणारीं जीं आपलीं पिलें त्यांच्या पोषणाची तरतूद करण्याकडे आपले शेवटचे उद्योग

लाविनात.

पहा ती, नित्य पाहाण्यांतलीं जीं पांढरीं फुलपांखरें त्यांतील एक मादी, त्या झाडावरून त्या झाडावर उडत आहे! तिची चेष्टा लक्ष्य देऊन पाहावयाजोगी आहे. ती भक्ष्याच्या शोधांत आहे असें नाहीं; ती आंडीं घालावयास जागा पाहात आहे. आंडीं घालण्याकरितां तिनें फुलच निवडून काढावें; किंवा फुलाजवळची जागा निवडावी, असें आपणास वाटावें; परंतु असें नाहीं. फुलांतील मध आपल्या पिलांस विषरूप आहे, असें समजूनच काय ती करमगड्याच्या झाडांतील एक झाड शोधीत आहे. तरी हें झाड भोंवतालच्या झाडांतून तिला कसें शोधून काढतां यावें? तर हें देवानें तिला शिकविलें आहे. वनस्पतिवेत्त्याचा जो वहिवाटलेला डोळा त्यापेक्षांही अचूक अशी जी तिची आंगची स्वाभाविक बुद्धि आहे, त्या बुद्धीनें नेलेली असतां इष्ट झाडाजवळ येतांक्षणींच ती त्यास ओळखती, आणि आपला अमोलिक भार, म्हणजे आंडीं, त्याजवर ठेविती. तरी त्या झाडावर दुसऱ्या फुलपांखरानें पूर्वीं आंडीं घातलीं नाहींत, त्याचा शोध अगोदर केल्यावांचून ती तेथें

आंडीं घालीत नाहीं. ज्यापासून बहुतकरून कोणत्या ही विघ्नाच्यानें व कोणत्याही भयाच्यानें, तिला पराङ्मुख करवत नाहीं, असा जो तिचा धर्म तो केल्यावर ती ममताळू आई प्राण सोडती.

तिंतूर म्हणून जो प्राणी तो आकाशांत राहतो; पाण्यांत त्याच्यानें वांचवत नाहीं; तरी त्याची मादी पाण्यांतच आपलीं आंडीं जपून घालिती. कांतर पाणीच मात्र तिच्या पिलांच्या जीवनास सोईचें आहे. गोमाशीचीं पिलीं घोड्याच्या कोठ्यांत राहावीं असा ईश्वरी नियम आहे; आतां त्यांची आई दोन पक्षांचा प्राणी होय, हिनें तीं तिकडे कशीं न्यावीं? तर त्यांस तिकडे नेण्याची तिची विलक्षण रीति असती खरोखरी. घोड्याच्या भोंवताली उडत फिरत असतां, ती आपलें आंग क्षणभर चमत्कारिक रीतीनें समतोल तोलून धरती, आणि इतक्यांत आपलें एक आंडें घोड्याच्या कातडीवरील एका केंसास चिकटविती; त्या रीतीनें शेंकडों आंडीं चिकटवून होत तोंपर्यंत असेंच पुनः पुनः करिती. मग आंडीं चिकटलेली जागा जेव्हां केव्हां घोडा चाटतो, तेव्हां त्यांतून कितीएक आंडीं त्याच्या जिभेस लगटून त्याच्या तोंडांत जातात; तेथून

त्याच्या कोश्यांत उतरतात. एथें एक शंका येती; घोड्यास जिभेनें चाटतां येई असा त्याच्या शरीराचा भाग थोडाच असतो, तर दुसऱ्या ठिकाणीं चिकटविलेलीं आंडीं असतात, त्यांची काय वाट होती? ही अडचण ती माशी कोणत्या रीतीनें दूर करिती? त्याचें उत्तर मी सांगतों. घोड्याची जीभ त्याच्या कातड्याच्या ज्या भागास पोंहोंचती, त्याच भागावर मात्र ती आपलीं आंडीं चिकटविती; किंबहुना दुसरे भाग वर्जून तो चाटीलच चाटील असा जो गुडघा आणि खांदा त्यां जवरच ती बहुतकरून आंडीं चिकटविती.

इक्नूमन म्हणून किड्यांची एक मोठी जात आहे, ज्या त्या किड्यांच्या पिलांनीं दुसऱ्या जातींच्या जिवंत किड्यांवर उपजीविका करावी, असा ईश्वरी संकेत आहे. त्या किड्यांची जी आपल्या पिलांसंबंधीं स्वाभाविक बुद्धि असती, तिची मोज कमी वाटावाजोगी नाहीं. त्यांच्या पिलांचेंच भक्ष्य जो सुरवंट, तो ज्या झाडावर सांपडण्याचा संभव असतो, त्या झाडावर त्या जातीच्या किड्यांची मारी उतरती, आणि झपाट्यानें थांबून पानापानाचा झाडा काढती. मग ज्याचा शोध ती करीत आहे, असा हतभाग्य सुरवंट,

तो तीस सांपडल्यावर त्याच्या आंगांत ती आपली सोंड खुपसून त्या ठिकाणीं आपलें एक आंडें घालती, आणि त्या करवंटाच्या आंगांत तिला पाहिजे असतात तितकीं आंडीं ती घालीतोंपर्यंत असेंच पुनः पुनः करिती. अशीं जीं घातलेलीं आंडीं त्यांपासून जीं पिलें निघतात त्यांस करवंटाचें शरीर हेंच मिष्ट भोजन होतें; जो हा करवंट शेवटीं त्यांच्या नासधुशीनें मरावयाचाच. तथापि त्या पिलांस भक्षणाची गरज आणि त्या भक्ष्याचा पुरावा ह्यांचा बेत असा टापटिपीचा उतरतो कीं, तीं पिलीं वाढावयाचीं तितकीं, वाढततोंपर्यंत करवंट मरत नाहीं.

त्या चमत्कारिक गोष्टींमध्यें एक गोष्ट खरोखरी मोठे मोजेची असती; ती अशी कीं, इकन्यूमनाचीं पिलीं कोणजाणें किती एक महिने पर्यंत, दररोज करवंटाच्या पोटांतील मास कुरतुडतात, तरी फार जपून कुरतुडतात; त्याच्या जिव्हाळ्यास धक्का लावीत नाहींत. जसें काय त्यांना ठाऊकच आहे कीं, आपले प्राण ह्या आपल्या भक्ष्याच्या प्राणावर आहेत; ह्यामुळें करवंटाचें खाणें, अन्न जिरणें, हालणें चालणें, वगैरे व्यापार सरळीत चालतात; आणि शेवटपर्यंत त्यास

फार उपद्रव आहे असें दिसत नाहीं; आणि त्याच्या आंतल्या किडयांस पुढें त्याची गरज नाहीं असें झालें म्हणजे इकडे तो स्फरवंट प्राण सोडतो.

---

# पाठ ५७

## प्राणिमात्राच्या शरीराच्छादनांत जें चातुर्य परमेश्वरानें दाखविलें आहे त्याविषयीं

भिन्न भिन्न प्राण्यांचीं भिन्न भिन्न शरीराच्छादनें असतात, व तीं ज्यांच्या त्यांच्या स्वभावास योग्य असतात, ह्या गोष्टी पाहिल्या असतां जसा त्यांच्या शरीररचनेच्या कोणत्याही भागाचा चमत्कार वाटावा, तसा त्या आच्छादनाचाही वाटावा. सड, केंस, लोंकर, लव, पिसें, नळ्यांचीं पिसें, साळपिसें, आणि खवले, इतके आच्छादनाचे प्रकार आहेत. इतके असतांही एखाद्या प्राण्याचें आच्छादन बदलून

दुसऱ्या प्रकारचें करूं लागल्यास, बदलून जें केलें तें पहिल्यापेक्षां वाईट झालें, असें स्पष्ट दिसून आल्यावांचून राहाणार नाहीं. आणि हीं जीं आच्छादनें ह्मटलीं आहेत, तीं वहुतेक पांघरूण असून चिरस्थनही होतात.

जन्माचा उघडा असा एकच प्राणी आहे, व ज्यास आपलें शरीर आच्छादितां येतें, असाही प्राणी एकच आहे; तो प्राणी मनुष्य होय. ज्या गुणांच्या योगानें सर्व प्रकारच्या हवेंत, व सर्व ऋतूंत, हा मनुष्यरूप प्राणी राहावयास योग्य होतो, त्या गुणांपैकीं शरीर आच्छादितां यावें हा एक गुण आहे. तो प्राणी जेथें राहतो तेथील हवेच्या मानाप्रमाणें उबेचें किंवा हलकें पाहिजे तसें पांघरूण त्यास करतां येतें. त्याच्या अंगावर जर जन्माची लोंकर असती तर तो थंडीच्या देशांत तिजपासून सुख पावता खरा, तरी तो जसजसा उष्ण देशांत जाता तसतसा त्याला लोंकरीच्या उबेचा व ओझ्याचा कंटाळा वाटता.

मनुष्यास कलाकौशल्यानें ज्या गोष्टी प्राप्त होतात, त्या गोष्टी कलाकौशल्यानें हीन अशा बहुतेक प्राण्यांस स्वभावसिद्धच असतात. जशी त्यांस गरः

लागती नशीं त्याचीं आच्छादनें आपाप बदलतात. चतुष्पाद प्राण्यांमध्यें ज्या प्राण्यांचें आच्छादन लवेचें असतें, त्यांविषयीं अशी गोष्ट विशेषेंकरून होती. हिंवाळा आला म्हणजे लव किती दाट होती, हें सशाच्या कातड्यांचा व्यापार करणाऱ्या हरएक मनुष्यास ठाऊक आहे. त्याच नेमाप्रमाणें उष्ण देशांत प्राण्यांची लोंकर बदलती. ती बिघडती असें पुष्कळ समजतात, परंतु खरें पाहिलें असतां ती बिघडत नाहीं; तर प्राण्यास फरक व्हावें म्हणून लोंकर केसासारखी होती. दुसऱ्या पक्षीं, उत्तरध्रुवाकडील थंड देशांत कुत्र्यांचे केंस लोंकरीसारखे होतात.

स्थावर जंगम पदार्थांच्या शोधकांनीं असें पाहिलें आहे कीं, आस्वलें, लांडगे, खोंकडी, ससे, वगैरे जे हे प्राणी पाण्याचा आश्रय करीत नसतात, त्यांस पोटावरच्या पेक्षां पाठीवर लव अधिक असती; परंतु पाण्याचा आश्रय करणारा जो बीवर नांवाचा प्राणी त्यास पोटावरच लव फार असती. पाणकोंबड्यांसही ह्याप्रमाणेंच पोटावर पिसें अधिक असतात.

पहाणारा किती जरी अडाणी असला, तरी पक्ष्यांचें आच्छादन हें त्याच्या लक्ष्यांत यावें असें आहे. त्याचा हलकेपणा, त्याचा गुळगुळीतपणा, त्याची ऊब, त्याच्या पिसांची रचना, त्या सर्वांचा कल पाठीमागें गेलेला, त्यांच्या देंठाभोंवतालची लव, एकावर एक आलेले त्यांचे झुंडे, आणि त्यांच्या रंगाचा विचित्रपणा, हा तर वर्णावयास नलगे. त्या सर्व गोष्टींनीं तें आच्छादन असें सुंदर व उपयोगी होतें कीं, असें वाटतें, हें जर आपण कधीं पाहिलें नसतें तर अशा सुंदर उपयोगी पदार्थाची कल्पना आपणास कधीं करतां येतीना. ज्यानें कधीं पक्षी पाहिला नाहीं, असा एक मनुष्य आपण शोधावा, त्याच्या हातीं पिसें उपटलेला एक पारवा देऊन त्यास सांगावें कीं, ह्याला तूं असें आच्छादन करून देकीं, ज्यांत ऊब, हलकेपणा, आणि वायूस अगदीं थोडा मतिबंध, हे गुण सर्व असावे; आणि जितकें सौंदर्य व जितकी शोभा तुझ्यानें आणवेल तितकी आणावी, तो विचार करून कुंठित झाल्यावर त्यास पंखांच्या पारवा दाखवावा, मग देवानें पक्ष्यांच्या आंच्छा

दनांत जी करामत करून दाखविली आहे, ती पाहून त्याच मनुष्याच्या मनांत त्या करामतीस योग्य असा भक्तिरस उत्पन्न होईलच होईल.



## पाठ ५८

## पर्वत, सरोवरें, आणि नद्या

ईश्वरानें सृष्टीची जी व्यवस्था केली तींत पर्वत, सरोवरें, आणि नद्या, ह्यांपासून अनेक कामें होतात; आणि त्या कामांमध्यें त्यांचा परस्पर जवळचा संबंध असतो, तीं सर्व, विशेषेंकरून तर नद्या, मनुष्यांस फार उपयोगी पडतात. पर्वत हे नद्यांचे जनक होत, व सरोवरें नद्यांच्या निर्गमांचा निर्बंध करणारीं होत.

पर्वतांचीं जीं उंच उंच शिखरें असतात, तीं मेघांस आपणाकडे आकर्षून घेऊन फोडतात; तीं असें न करितीं, तर जमीन सुपीक करण्याकरितां वर्षल्यावांचून मेघ तसेच वरल्यावर निघून जाते.

वसंत ऋतूंत जेव्हां पाण्याचा खडखडाट पड तो तेव्हां कामास पडण्याकरितां, पर्वतांच्या शिखरांवर फुटलेले मेघ बर्फ होऊन सांठवतात, आणि हवा अमळशी उष्ण झाली म्हणजे तें बर्फ वितळून पाणी होत जातें. तें पाणी खडकांच्या भेगांमध्यें, व भुसभुशीत जमिनीच्या छिद्रांमध्यें मुरतें, म्हणून उन्हाळाभर झऱ्यांतून थंड पाणी वाहात असतें.

सरोवरें जर नसतीं तर पर्वतांवरून ज्या नद्या वाहात येतात, त्यांचें पाणी फुकट जातें, आणि त्यांच्या प्रवाहाच्या वेगानें मोठी नासधूस होती. हा अनर्थ सरोवरें आहेत म्हणून होत नाहीं. सरोवरें हीं नद्यांच्या निर्गमाचा निर्बंध करणारीं म्हणून जें वर लिहिलें त्याचा हाच अर्थ.

त्याप्रमाणें पर्वत आणि सरोवरें हीं शोभिवंत आणि उपयोगी आहेत खरीं, तरी शोभेविषयीं किंवा उपयोगाविषयीं त्यांची नद्यांशीं बरोबरी व्हावयाची नाहीं. पर्वत आणि सरोवरें आपापल्या ठिकाणीं निश्चळ आहेत; नद्या तर सतत चालल्या आहेत. त्या जिवंतपणाच्या निशाण्या होत. त्या मनुष्याचे मोठे खटपटे चाकर होत; आणि त्या मनुष्यांच्या

द्ळणवळणाचें, अतएव विद्याप्रसाराचें, फार मोठें साधन होत.

ईश्वरानें जी तर्कशक्ति मनुष्यांस दिली तिचा प्रादुर्भाव मनुष्यांनीं प्रथम ज्या स्थळीं केला, तीं स्थळें नद्यांच्या तीरीं होतीं; म्हणजे नद्यांच्या तीरींच राहणारे मनुष्य प्रथम विद्यासंपन्न होऊन सुधारले.

हिंदुमहासागराकडे वाहून त्याशीं मिळणारी अशी यूफ्रेटीस नदी जर नसती, आणि भूमध्यसमुद्राकडे वाहून त्यास जाऊन मिळणारी अशी नील नदी जर नसती, तर क्यालडीयन लोकांची विद्या आणि मिसर देशांतील लोकांचें शहाणपण ह्यांचें तेज कधीं पडलें नसतें.

आणि ज्या पश्चिमेकडील देशांतील लोकांस त्या दोहों लोकांपासून विद्येचीं मूळतत्वें आणि विद्याभ्यास करण्याची उत्कंठा हीं प्राप्त झालीं, ते लोक आस्त्रेलिया देशांतील लोकांप्रमाणेंच अज्ञान बरानटी होऊन राहिले असते. ज्या आस्त्रेलिया देशांत नद्या थोड्या आहेत म्हणून तेथील लोक, लहान लहान टोळ्या करून राहतात; आणि सरासरी विद्याचाराची वृद्धि होण्यास जें द्ळणवळण आ

वश्यक आहे तें देखील होत नाहीं.

नद्यांपासून आरोग्य आणि देशाव्यवस्था होतात, हें सांगणें येथें सोडतां कामास नाहीं. भूमीच्या पृष्ठभागावर सांचून राहिली असतां प्राण्यांस व वनस्पतींस दुःखदायक होणारी अशी जी अतिरिक्त आर्द्रता, ती नदी घेऊन जाती. तसेंच प्राणी व वनस्पति मरून कुजून त्यांपासून जे क्षार पदार्थ उत्पन्न होतात, त्यांस नदी समुद्राकडे वाहून नेती. जेथें नद्या नसतात तेथें हे क्षार पदार्थ देशास लवकर ओसाड करून टाकतात

# पाठ ५९

## सूक्ष्मचमत्कार.

रेतीचा हरएक कण नुसत्या डोळ्यानें पाहिला असतां वाटोळा दिसतो, परंतु सूक्ष्मदर्शक यंत्रांतून पाहिला असतां आपणांस समजतें, कीं आकारानें व महत्वानें एक एकाहून भिन्न असतो. एक अगदीं वाटोळा असतो, एक चौरस असतो, एक निमुळता असतो, एक लांबोळा असतो, पण बहुतकरून कणांच्या आकारांचा नेम नसतो.

+पनीरामध्यें फार सूक्ष्म जातीचे किडे सांपडतात, ते नुसत्या डोळ्यानें पाहिले असतां बारीक बिंदूसारखे दिसतात; पण सूक्ष्मदर्शक यंत्रानें पाहिलें असतां फार विलक्षण आकृतीचे जीव असे दिसतात. त्याला डोळे, तोंड, आणि पाय असून पारदर्शक शरीरें असतात, ज्या शरीरांला केंससारखे लांब कांटे

---

+ . पनीर म्हणून दुधाचा पदार्थ करितात, तो फार दिवस राहावयाजोगा असतो

असतात.

तसेच वनस्पतींचे चमत्कार कोठें कोठें दृष्टीस पडतात. ओलसर पदार्थांवर जी बुरशी किंवा कन शी जमती, तींत झाडें, झुडपें, त्यांच्या निबिड वनाची आकृति दृष्टीस पडती. डाळ्या, पानें, फुलें, आणि फळें, हीं निरनिराळीं दिसतात. लांब, पांढर, आणि पारदर्शक असे देंठ फुलांना असतात. फुलें फुलली नाहींत तों हिरव्या रंगाच्या कळ्यांसारखीं दिसतात; आणि तीं फुलल्यावर पांढरीं होतात. पाहून ज्ञान झा ल्यावांचून, बुरशींत हे चमत्कार आहेत अशी कल्पना कोणांच्या मनांत यावयाची नाहीं.

तशीच सूक्ष्मदर्शकयंत्र जर नसतें, तर पतं- गाच्या पंखावर जी धूळ जमलेली असती, ती लहान लहान पंखांचा समुदाय आहे, ही कल्पनाही कोणाच्या मनांत येतीना. तरी ही गोष्ट अशीच आहे अशी सू- क्ष्मदर्शकयंत्रानें खातरी करून दिली आहे.

अहो वाचणाऱ्यांनो, पदार्थांचा शोध करावयास दूर जावयाचें नलगे; आपणाला सोडून दुसरा पदार्थ पाहूं नका. तुम्ही आपल्या कातडीचा एक भाग, सूक्ष्म- दर्शकयंत्रानें पाहा. तो मत्स्याप्रमाणें खवल्यांनीं आ-

च्छादित असा दिसेल. रेतीचा एकच कण जर घे- ऊन त्यांवर ठेविला, तर तो २५० खवले झांकतो; एका खवल्याखालीं ५०० रोमरंध्रें असतात. त्यावरून रेतीच्या एका कणाएवढ्या जाग्यांत १२५००० रोमरंध्रें असतात, अशी गणना केली आहे.

ज्या गोष्टी अविचारामुळें आपण क्षुल्लक मानीत असतों, त्यांत देखील परमेश्वराचें महत्व किती दिसतें हें पाहा; आणि त्यानें पृथ्वीवर जिकडे तिकडे जीव पसरले आहेत, ते असंख्य आहेत, हेंही ध्यानांत आणा. निरनिराळ्या वनस्पति तीस हजारांहून अधिक आपणास ठाऊक आहेत; आणि किड्यांच्या किती एक हजार जाती आपणांस ठाऊक आहेत; तरी सर्व वनस्पति व सर्व किडे ह्यांच्या संख्येकडे पाहिलें असतां, आपणांस ठाऊक आहे हें कांहींच नाहीं.

समुद्राचा तळ, आणि नद्यांचे तास कोरडे पडून जर आपल्या दृष्टीस पडते, तर त्यांत ईश्वरानें जे अमर्याद जीव उत्पन्न केले आहेत ते पाहून आपणांस किती आश्चर्य वाटतें! आणि सर्व गोष्टींपेक्षां आश्चर्यकारक गोष्ट हीच तुम्हांस वाटती, कीं

परमेश्वरानें आपल्या मोठमोठ्या कामांत जितकी बुद्धि व कौशल्य खर्चलें तितकीच बुद्धि व कौशल्य त्यानें अतिसूक्ष्म कामांत ही खर्चलें आहे. व्हेल नांवाचा जो मोठा मासा, ज्याची पाठ लाटांहून ही वर असती, त्यावर जी परमेश्वराची कृपा असती, तीच कृपा धुळीं त रेंगून चालणाऱ्या लहान किड्यावर असती. अहो वाचणाऱ्यांनो! ही ईश्वराची रीत धरण्याविषयीं तु म्ही झटा; अगदीं क्षुल्लक जो जीव उत्पन्न झाला आ हे तोही तुमच्या कृपेला पात्र आहे.



# पाठ ६०

## मानवी शरीर.

माझें शरीर व माझा आत्मा त्यांचा संबंध किती विलक्षण आहे पाहा! बाह्य पदार्थांवर पडलेले तेजाचे किरण माझ्या डोळ्यांत प्रतिबिंबित होतात, तेव्हां त्या पदार्थांचें परिमाण, आकार, आणि रंग, त्यांचें ज्ञान माझ्या आत्म्यास होतें, असा अनुभव मला रोज येतो. वायूला एक्या प्रकारचा कंप होऊन तो माझ्या कानांत शिरतो, तेव्हां ध्वनीचा ग्रह माझ्या आत्म्यास होतो, असा मला अनुभव येतो. माझ्या आसमंतात्‌भागीं ज्या हजारों गोष्टी घडतात, त्यांचें ज्ञान त्या साधनांनीं मला होतें; व दुसऱ्यांच्या मनांतील कल्पनाही मला समजतात.

एक्या ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणास माझ्या शरीरानें जावें, आणि अमुक तमुक काम करावें, अशी माझ्या आत्म्यास इच्छा झाली, म्हणजे तत्काळ माझ्या शरीराचे अवयव आत्म्याच्या सूचनेप्रमाणें करतात, आणि हात, पाय, बाहू हे आपापला व्यापार

करण्याकारतां लागलेच चालू होतात. त्या सर्व गोष्टी घडतात हें निर्विकार आहे, तरी त्या गोष्टी कशा घडतात, हें माझ्या बुद्धीच्या पलीकडे आहे.

आत्मा आणि शरीर यांची जी परस्परांवर सत्ता आहे, ही मोठी चमत्कारिक गोष्ट आहे; त्या गोष्टींत ईश्वरानें ज्ञानाचा इतका अगाधपणा ठेविला आहे, कीं त्याचा ठाव मला लागत नाहीं. जितका जितका मी विचार करतों तितक्या तितक्यानें फक्त मला आश्चर्य व मौज वाटावी येवढें मात्र होतें.

नुसत्या शरीराचा विचार केला असतां, त्यांत परमेश्वराच्या कौशल्याची पराकाष्ठा झाली, असें दिसतें. त्या शरीरास न्यून कांहीं नाहीं, व अधिकही कांहीं नाहीं. शोभेसाठीं असो किंवा कामासाठीं असो, प्रत्येक अवयव सर्वांहून जें त्यास सोईचें ठिकाण त्यांत ठेवलेला आहे. माझे शरीराकडून अनेक कामें व्हावीं व अनेक व्यापार घडावे त्या बेतानें हें ईश्वरानें केलें आहे.

बाह्य पदार्थांचें ज्ञान अनेक रीतींनीं आत्म्यास व्हावें, त्या गोष्टीला शरीर साधन असावें, हा पहिला बेत त्याकरितां पाहणें, ऐकणें, वास घेणें, चव

घेणें, व स्पर्श करणें, त्यांचीं इंद्रियें परमेश्वरानें त्यास करून दिलीं आहेत. हरएक इंद्रिय ईश्वरी शक्तीची व ईश्वरी चातुर्याची करामत आहे.

बाहेरील पदार्थांचें ज्ञान करून घेण्यास, व आणखी कितीएक कामास, आत्म्याला शरीराचा उपयोग पडावा, ह्यासाठीं चालण्याची शक्ति त्यास असली पाहिजे. आतां पाहा, ही गोष्ट साधण्याकरितां किती अंगप्रत्यंगांचा मिलाफ झाला आहे. हाडें, सांधे, अस्थिबंधनें, व संकोचविकासविषयक स्नायु ह्यांकडून शरीरास व त्याच्या अवयवांस हजारों वाटांनीं हालण्याचालण्याची शक्ति येती.

पण ह्या चमत्कारिक यंत्राला चालतां चालतां, व आपलीं निरनिराळीं कामें करतां करतां निरंतर झीज होईलच होईल, तर ही झीज भरली पाहिजे. ह्याकरितां दुसऱ्या अंगांची गरज पडती; कांहीं अंगें आहार घेण्याकरितां पाहिजेत; कांहीं त्याचें चर्वण करण्याकरितां पाहिजेत, व त्यास पचविण्याकरितां, व त्याचा पोषक रस काढण्याकरितां कांहीं पाहिजेत. हे रस शरीरामध्यें जिकडे तिकडे चालविण्याकरितां

व ज्या अवयवास ज्या रसाची गरज असती तो रस त्यास पोहोंचविण्याकरितां कांहीं अंगें पाहिजेत. हीं सर्व अंगें प्रत्यक्ष माझ्या शरीरांत ईश्वरानें करून ठेविलीं आहेत; आणि जीं कार्यें त्यांजकडून व्हावीं असा ईश्वराचा बेत होता, तीं त्यांजकडून पुरतेपणें यथास्थित होत आहेत.



# पाठ ६१

## रानटी लोकांची वृत्ति आणि विद्याचाराच्या मार्गास लागलेल्या लोकांची वृत्ति.

जग सुधारण्याच्या कामांत व लोकांस विद्याचाराच्या मार्गास लावण्याच्या कामांत राजकारणी पुरुष व योद्धे ह्यांचें अंग आहे खरें; पण त्यांचें अंग त्या कामांत वास्तविक जितकें आहे त्याहून फार अधिक आहे असें बहुधा लोक समजतात. वास्तविक पाहिलें असतां, ह्या पुरुषांच्या हातून त्या कामांत जें काय कृत्य होतें तें थोडेंच असतें. लोक सुधारण्याचें वास्तविक मूळ म्हटलें तर जींहींकरून लोकांस धन, व सुखोपभोग, व ऐषआरामी हीं प्राप्त होतात. अशा कृत्यांच्या उपयोगी जीं कलाकौशल्यें असतील त्यांची युक्ति काढणें हें आहे. मग प्राप्त झालेल्या गोष्टीचें संरक्षण करण्याची गरज पडल्यामुळें, किंवा संरक्षणाची इच्छा प्राप्त झाल्यामुळें, कायदे असावे, व परस्परांनीं परस्परांशीं

वागण्याचा बंदोबस्त असावा, अशी प्रेरणा होती, तेव्हां वर सांगितलेल्या पुरुषांचें आंग घ्यावें लागतें.

इतर लोकांस माहीत नाहींत अशा कलाकौशल्यांच्या युक्ति कोणेक देशांतील लोकांनीं काढल्या असतां, त्यामुळें त्यांस श्रेष्टपणा येतो. मग सत्ता मिळविण्याच्या लोभानें प्रेरित होऊन दुसऱ्या देशाच्या लोकांस जिंकण्याच्या कामास ते आपला श्रेष्ठपणा लावतात. मग पराजित झालेले लोक त्यांच्या कला शिकतात, आणि शेवटीं त्यांच्या रीतीभाती स्वीकारून घेतात. त्याप्रमाणें लोकांनीं परस्परांशीं संबंध ठेवून वागण्याचें जें प्रकरण, त्याचें मूळ व त्यांची उत्तरोत्तर वृद्धि हीं वास्तविक पाहिलें असतां शिल्पशास्त्राप्रकरणीं व रसायनशास्त्राप्रकरणीं ज्या युक्ति निघाल्या आहेत त्यांपासून होतात. ज्या लोकांमध्यें उपयोगी कला व विलास साधनाच्या युक्ति त्यांची पराकाष्ठा झाली नाहीं, त्या लोकांमध्यें धर्मसंबंधीं, व न्यायसंबंधीं, व विद्यासंबंधीं व्यवस्था आजपर्यंत कधींही उत्कृष्ट झाली नाहीं.

मनुष्यांची जी दशा आपणांस निकृष्ट म्हणून माहीत आहे. त्या दशेंतील मनुष्याविषयीं आंपण

प्रथम विचार करावा. ह्यास उदाहरण न्युहालंडांतील मूळचे राहणारे लोक त्या लोकांची वृत्ति पशूंच्या वृत्तीपेक्षां अमळशी चांगली आहे; तो चांगलेपणा ते विस्तवाची वहिवाट करतात इतक्यानेंच बहुत करून झाला आहे, ते लोक सर्वदा नागवे असतात, आणि विस्तवामध्यें तापवून कठीण केले त्या लांकडांचीं हत्यारें त्यांनीं रानांतील पशूंपासून आपलें रक्षण करतात, किंवा आहारासाठीं त्यांला मारतात. हे लोक भुईंत बिळें पोखरून त्यांत राहतात, किंवा झाडांच्या टाहाळ्या तोडून त्यांच्या झोंपड्या करून त्या गवतानें झांकून त्यांत राहतात. ऐषआरामीचें सुख तर त्यांपासून दूरच आहे, किंबहुना निर्वाहाची सोय देखील त्यांस माहीत नाहीं. त्यांची भाषा अशी वांकडी कीं वर्णोच्चार करावयास फार कठीण; व त्या भाषेंत शब्दांचा भरणा म्हटला तर सृष्टींतले जे मोठमोठे व स्थूळ पदार्थ, चंद्र, सूर्य, समुद्र, पर्वत इत्यादि, त्यांविषयीं, आणि ज्यांची फारच गरज असती अशा गोष्टींविषयीं, मात्र शब्द आहेत. त्यांस धर्म, अंमल, कायदे

त्या गोष्टींची माहिती अगदीं नसून ते एकेकटे किं वा आपापलेंच कुटुंब घेऊन निरनिराळे राहतात

आतां ज्या मनुष्यांची फारच सुधारणूक झाली आहे त्यांच्या वृत्तींना भेद केवढा पाहा! शिल्पविद्येंतील व रसायनविद्येंतील कलांनीं उत्पन्न झालेले पदार्थ त्यांनीं त्यांचीं सर्व आंगें झांकलेलीं असतात. हे लोक बाहिवाटीचीं उपकरणें, व अलंकाराचीं उपकरणें, भुईच्या धुळीचीं करतात. माति दगड त्यांपासून धातु गाळून त्यांचे हजारों उद्देशांनीं शेंकडों आकार करितात. हे लोक वृक्ष वनस्पत्यादिक निवडून त्यांच्या आंगीं अधिक गुण आणून त्यांनीं पृथ्वी आच्छादितात. वनांतील, डोंगरांवरील, व आकाशांतील राहणारे जे फारच उत्संरखळ, फारच जलद, व फारच बळकट प्राणी, त्यांस वश करून माणसाळवितात. वाऱ्याला स्वाधीन करून घेऊन त्याकडून अगाध समुद्राच्या पाठीवर चहूंकडे आपणांस नेववितात. आणि वायु, जल, आणि किंबहुना अग्नि त्या महाभूतांस आपले अंकित करून त्यांस आपल्यासाठीं मेहनत करावयास लावितात. वज्रासारखी ज्यांच्या आंगीं शक्ति आहे

अशीं कांहीं द्रव्यें लहानशा अवकाशांत भरून, तीं फार दूरच्या अंतरावर लागू होतील असा त्यां चा प्रयोग करतात. ते खडकाला फोडतात, व डोंगराला स्थानभ्रष्ट करितात, आणि खोऱ्यांतलें पाणी पर्वतावर नेतात. मनांतील ज्या कल्पना त्यांस अविनाशी शब्दरूप देऊन बुद्धीचीं कृत्यें अमर करितात; आणि तीं सर्वांचें सामाजिक धन असें करून ठेवितात



# पाठ ६२

## मनुष्यजाति आणि खालचे प्राणी त्यांचा भेद

मनुष्यजाति आणि इतर प्राणी त्यांचा मुख्य भेद हाच आहे कीं, मनुष्याला तर्कशक्ति असती आणि इतर प्राण्यास आंगचें ज्ञान मात्र असतें हा त्यांचा भेद खरा, तरी तर्कशक्ति म्हटली असतां अर्थ काय, आणि आंगचें ज्ञान म्हटलें असतां अर्थ काय, त्याची चांगली समजूत व्हावी म्हणून ज्यांमध्यें त्यांचा भेद फार स्पष्ट दिसून येतो अशा तीन गोष्टी सांगतों.

मनुष्यजाति आणि इतर प्राणी त्या दोहोंपक्षांची बराबरी जितकी होईल तितकी करण्याकरितां पहिल्यानें रानटी मनुष्यें त्यांचा विचार पाहावा. रानटी मनुष्यें रानांतल्या पशूंसारखी खाणें पिणें वगैरे जे देहाचे धर्म आहेत त्यांच्याच खटपटींत सर्व वेळ घालवितात. एथें तर रानटी मनुष्यांचा

आणि इतर प्राण्याचा पहिला भेद जो दिसून येतो तो हाच आहे, कीं मनुष्यें आउतें वापरतात.

रानटी माणसानें आपणास राहावयासाठीं घर केलें, किंवा ऊन पाऊस ह्यांपासून आसऱ्यासाठीं खोपटी केली, किंवा पोटाची बेजमी सांठवावयासाठीं कोठार केलें. म्हणून ससा, बीवर+, मधाची माशी, आणि हरजातींचीं पांखरें, हीं जें करीत असतात त्याहून त्यानें कांहीं अधिक केलें, असें नाहीं. परंतु त्या कामामध्यें आउतांवांचून मनुष्याचा कांहीं गति नसती. अगोदर कुऱ्हाड मिळविल्यावांचून लांकडासाठीं त्याला झाड देखील तोडतां येत नाहीं. इतर प्राणी तर दुसरीं आउतें न घेतां, आपलीं जी आंगचीं आउतें आहेत त्यांनीं आपलीं बिळें, आपलीं घरें, व आपलीं कोटीं करतात.

जमिनीची लागवड करावयाची असतां कुदळ किंवा नांगर ह्यांवांचून मनुष्याच्यानें कांहीं करवत नाहीं. आणि सवंगण्यास उपयोगीं पडण्यासाठीं आऊत वांकविल्यावांचून जें त्यानें पेरलें

---

\+ बीवर म्हणून एक चमत्कारिक जलचर प्राणी आहे.

ते त्यास कापता येत नाहीं. इतर प्राणी तर आउतें नसतां आपणांसाठीं आणि आपल्या कुटुंबासाठीं कांहीं पोटाची बेगमी करितात.

दुसरा भेद असा आहे कीं, जीं कामें माणसें करितात त्या सर्वांमध्यें त्यांपासून चुक्या घडतात; इतर प्राणी तर कोणत्याही कामामध्यें चूक करीत नसतात. पांखरूं उदास होऊन ढाळीवर बसलेलें, आणि आपलें कोटें अर्धवट राहिलें त्याचें दुःख मानून, हें कसें संपवावें त्याची मोठी पंचाईत त्यास पडली, असें कधीं तुमच्या ऐकण्यांत आलें काय? किंवा मधमाशांच्या मोहळाचीं घरें ओबड धोबड, अथवा वेडीं वांकडीं, तुम्हीं कधीं पाहिलीं काय? किंवा घर बांधणाऱ्या माशा त्यांजमध्यें मतभेद पडल्यासारखें वाटायाजोगा त्या मंडळीमध्यें वादविवाद चालला आहे असें तुमच्या लक्षात कधीं आलें काय? आणि वैद्यकी म्हणावी तर, इतर प्राणी मनुष्यांपेक्षां फार चांगले वैद्य असतात; कां तर त्यांना दुखणें लागलें असतां त्यांच्या खाण्याचे उपयोगी नाहीं, परंतु ज्याचा गुण त्या दुखण्यावर लागू पडतो, अशा वनस्पतीचा शोध त्यांमून कितीएक जातींचे

प्राणी करितात . परंतु मनुष्यामध्यें वैद्यमंडळी एका च औषधीचे गुणाविषयीं शंभर वर्षेपर्यंत वादविवाद चालवील .

जीं जीं कामें माणसें पत करतात, त्यांमध्यें त्याला अधिक उणा कांहीं तरी घोंटाळा पडतो. नाना तऱ्हांनीं काम करून पाहिल्यावांचून त्याला कोणत्याही कामामध्यें यश येत नाहीं . संसारामध्यें ज्या अगदीं सोप्या गोष्टी आहेत त्या देखील, त्यांत कांहीं वापरल्या वांचून, चांगल्या करिता येत नाहींत. माणसें चुकतां चुकतां सावध होतात, आणि त्यांला जी अक्कल घडली ती उपयोगीं पडूं लागती तों त्यांचें अर्धें आयुष्य गेलें .

तिसरा भेद हाच आहे, कीं इतर प्राणी ह्यांचें ज्ञान कौशल्य इत्यादि जें आहे तेंच आहे ; त्याची कांहीं वृद्धि होत नाहीं . मनुष्याचें ज्ञान , कौशल्य आणि यश, हीं निरंतर वृद्धि पावतात . इतर प्राणी जीं कामें करितात तीं आपल्या स्वभावाच्या पहिल्याच प्रेरणेप्रमाणें, म्हणजे जें ज्ञान परमेश्वरानें त्यांच्या मध्यें करून ठेविलें आहे त्याप्रमाणें, करितात; म्हणून त्यांच्या कामांमध्यें मनुष्याच्या कामापेक्षां कसर

कमी राहाती, आणि बंदोबस्त चांगला होतो; परंतु मनुष्यांस आपल्या कामाविषयीं परमेश्वरानें तर्क व विचार करण्याची शक्ति दिली आहे, ह्मणून पहिल्यानें त्यांजपासून ज्या चुक्या पडतात त्या धिमाई व उद्योग ईहीं करून सुधारतां येतात, आणि गुणांचा उत्कर्ष उत्तरोत्तर करतां येतो.

पांखरांचें कोटें हें फारच सुंदर आणि निर्दोष रचनेचें काम आहे, तरी सांप्रतकालच्या चिमण्या जीं कोटीं करितात तीं, चार हजार वर्षांमागें चिमण्यांनीं जीं कोटीं केलीं होतीं, त्यांपेक्षां अधिक सुंदर अथवा सोईचीं असतात असें नाहीं. परंतु रानटी माणसें खोपी बांधितात त्यांशीं प्राचीन ग्रीस आणि रोम त्यांतील देवमंदिरें मिळवून पाहिलीं असतां, माणसें आपल्या चुक्या सुधारतां सुधारतां कोठपर्यंत बुद्धीचा व कौशल्याचा उत्कर्ष करितील हें लक्ष्यांत येईल.

# पाठ ६२

## ओकवृक्ष.

बळकटपणा, टिकाऊपणा, आणि उपयोगीपणा ह्या तीन गोष्टींविषयीं सर्व इमारती लांकडांमध्यें ओक नामक वृक्षाच्या लांकडाची योग्यता अधिक आहे, ज्या ओकवृक्षास नौकाजनक असा किताब मिळाला आहे. मुख्यत्वेंकरून उदीम व आरमार, त्यांच्या योगानें सर्व देशांमध्यें ज्यानें पहिला नंबर मिळविला आहे असा जो इंग्लंड देश, त्यास ह्या ओक वृक्षाची मान्यता केवढी आहे म्हटलें, तर त्या देशाचा धर्म व त्याचें स्वातंत्र्य व तेथील लोकांचें धैर्य व उद्योगीपणा त्यांची जी मान्यता तिच्या खालोखाल आहे.

इंग्लंडांतील गांठाळ ओक वृक्ष हा यथाकाळीं म्हणजे पन्नास वर्षांचे वयापासून सत्तर वर्षांच्या वयापर्यंत, तोडला असतां जी इमारती लांकडें लोकांत प्रसिद्ध आहेत त्यामध्यें तो खचीत सर्वोत्कृष्ट आहे. कांहीं लांकडें त्याच्यापेक्षां कठीण असतात, व

कांहीं लांकडें उभीं चिरावयास त्यापेक्षां अधिक श्रम पडतो, व कांहीं लांकडें आडवीं मोडायास अधिक श्रम पडतो; तरी हे तीन गुण ओकाच्या आंगीं फार असून असावे त्या प्रमाणानें असतात. असे दुसऱ्या कोणत्याही लांकडाच्या आंगीं नसतात. भारानें न लवणें, व जोर पडला असतां न कचकणें, व तोफेच्या गोळ्यानें न फुटणें त्या गुणांविषयीं सर्व लांकडांपेक्षां ओकाचें लांकूड चांगलें आहे.

त्या लांकडाच्या सालीजवळचा मात्र भाग चांगला पक्का नसतो, तो खेरीज करून हें लांकूड फार टिकाऊ असतें. तें भुईंत असो, पाण्यांत असो, किंवा बाहेर उघड्या वाऱ्यांत असो, तरी टिकतें. इंग्लंडामध्यें जीं झाडें निपजतात, आणि अन्य देशांतून जीं लांकडें इंग्लंडांत येतात, त्या सर्वांस बहुतकरून कोणास लवकर कोणास उशीरां कीड लागती, परंतु ओकाच्या गाभ्यास कधीं कोणतीही कीड लागत नाहीं, असा लोकांत प्रवाद आहे.

समुद्रावर शत्रूंशीं लढाया जोगें आरमार इंग्लंडास ज्यानें करून दिलें असा जो आल्फ्रेद नांवाचा राजा, त्याच्या वेळेपासून, ज्याच्या आंगीं सात्विक शौर्याचा कळस झाला असा जो नेलसननामक आर

मागचा सरदार, त्याच्या वेळेपर्यंत गलबतें बांधण्या
च्या कामांत ओकवृक्षाची वहिवाट चालत आली आ-
हे. आलीकडे जीं गलबतें इंग्लंडांत बांधून तयार
झालीं आहेत त्यांपैकीं कितीएक निरस निघालीं
आहेत, आणि त्यांस भेंडा लागून त्यांचा खराबा होत
चालला आहे; त्याचें कारण बहुतकरून हेंच असे
ल कीं, तीं दुसऱ्या देशांतील ओकांचीं केलेलीं होतीं,
इंग्लंडांतील ओकांचीं केलेलीं नव्हतीं.

आंतील गाभा नष्ट झाल्यावरही ओकवृक्षाच्या
नें कितीवर्षांपर्यंत वाढवेल त्याचा पक्का निर्णय अ
द्यापि झाला नाहीं. न्यूफारेस्त ह्या नांवाचें जें अरण्य
त्यांत एवलिन नामें प्रख्यात आगरवाला होता त्यानें
कितीएक ओकवृक्षांच्या खोडांत एकावरएक असे
तीनशें चारशेंपर्यंत पदर मोजले. एकेक पदरानें
एकेक वर्षाची वाढ दाखविली असावी.

ग्रंथामध्यें ज्या ओकवृक्षांचें वर्णन केलेलें
आहे त्या सर्वांमध्यें मोठा ओक म्हटला तर दार्सिट
शीर नांवें इंग्लंडांत एक प्रांत आहे तेथें दामो-
रीस ओक ह्या नांवाचा जो ओकवृक्ष होता तो. त्याचा
घेर अडुसष्ट फूट होता, आणि त्यांत एक दोल होती

ती सोळा फूट लांब आणि वीस फूट उंच अशी होती. चार्लस राजाचा शिरच्छेद होऊन लोकांचें प्रभुत्व झालें त्या वेळेच्या सुमारें त्या ढोलींत एका म्हाताऱ्या माणसानें वाटसरांच्या सोईकरितां दारूचें दुकान घातलें होतें. सन्न १७०३ त्या वर्षी मोठें तुफान झालें होतें त्या तुफानानें हा ओकवृक्ष मोडून त्याचे तुकडे तुकडे झाले; आणि त्याचा बुंधारा राहिला होता तो मांळ्यांमुळांसुद्धां सन्न १७५५ त्या वर्षी सर्पणाकरितां लोकांनी विकत घेतला.

इतिहासांतल्या गोष्टींचे स्मारक म्हणून जे प्रसिद्ध ओक आहेत ते येणेंप्रमाणें ज्या ओकवृक्षावर सर विलियम तिरेल नांवें सरदार त्याचा तीर ओझरता जाऊन विलियम रूफस नांवें राजा त्यास लागून तो राजा प्राणास मुकला तो न्यूफारेस्तांतील एक ओक होता बुस्तर नांवें शहर एथें दुसरा चार्लस राजा त्याचा पराभव झाल्यानंतर ज्या ओकवृक्षावर तो लपून बसला तो रायल ओक, म्हणजे राजकीय ओक, म्हणून बास्कोबेल एथें ओक आहे तो. आणि ज्याच्या छायेखालीं स्काटूलंड देशांतील स्वदेशाचा कैवारी वालस नांवें शूर सरदार होता त्यानें आपल्या सोबत्यांस

एदवर्ड नामें इंग्लंडाचा राजा त्याच्या अमलांतून आपला देश सोडविण्याचा उद्योग करण्याविषयीं बळकावून घेतलें होतें तो एक ओक

# पाठ ६४

## पृथ्वीच्या नकाशाचें वर्णन.

### एशियाखंड.

मध्यएशिया, उत्तरएशिया, आग्नेयीएशिया, आणि नैरृत्यएशिया असे एशियाखंडाचे स्वतःसिद्ध चार विभाग आहेत. मध्यएशियेचे मध्यदेश, पूर्वदेश, आणि पश्चिमदेश असे तीन विभाग पर्वतांच्या ओळींच्या योगानें झाले आहेत. त्यांतील जो मध्यदेश हा एशियाखंडांतील उंचवट्याचा प्रदेश म्हणण्यास योग्य आहे. ज्या त्या देशापासून सर्व दिशांकडे पर्वत लागत जातात, आणि ज्यापासून एशियाखंडांतील मोठमोठ्या नद्या निघून वाहत वाहत कित्तीएक पूर्वेकडे जातात, कित्तीएक पश्चिमेकडे जातात,

कितीएक उत्तरेकडे हिममय उत्तरध्रुवसागरास मिळ तात, आणि कितीएक दक्षिणेकडे हिंदुमहासागरास मिळतात.

हिमतुषारमय आणि मेघाच्छादित असा हा उंच प्रदेश उष्णकटिबंधाच्या जवळ असतां एथें बारा मास बहुतकरून हिंवाळा असतो. त्या देशांतील लोक त्या देशाच्या गुणास अनुसरून आहेत; कां तर त्यांचीं आंगें आंगें आणि चापट तोंडें हाच त्या वज्रमय भूमीच्या आणि निर्दय हवेच्या शक्तीचा ठसा त्यांजवर उमटला आहे. तरी त्या देशांत कोठें कोठें हिमाचा जोर कमी असल्यामुळें पीक व्हावया जोगीं स्थळें आहेत. तीं अशीं कीं, कोठें कोठें आश्र्याच्या जागा आहेत, ज्यांवर डोंगरांचीं खडपें असल्यामुळें हिमाचें आणि वायूचें निवारण होतें. कोठें कोठें नद्यांनीं डोंगर उतरून दरे पोखरून माती भरलेलीं अशीं स्थळें आहेत; आणि जेथें सूर्य समोरें डोईवर येतो, आणि थोडेच दिवस राहाणारा तरी विपुल असा तृणादिकांचा उपज करितो, अशीं मेदानें कोठें कोठें आहेत.

मध्यएशियेंतील पूर्व देश त्यांत हवा समाराची थंड असती; कारण कीं जेथें समुद्र जवळ आहे तेथें

समुद्राच्या हवेच्या योगानें थंडी कमी होती, आणि समुद्रापासून जे प्रांत लांब आहेत त्यांस आमूर नामक नदीच्या पाण्यानें पिकाऊपणा येतो, आणि त्या नदीच्या कांठीं मोठीं भव्य वनें आहेत त्यांपासून त्यांस आश्रा मिळतो; परंतु त्या पूर्वदेशांतील नद्या व समुद्र त्यांच्या तीरीं वैराणी फार, आणि वनांत मनुष्याची वस्ती नाहीं. एथें मासे धरणारे जिवंत मनुष्य त्यांच्या होड्या क्वचित् दृष्टीस पडतात, परंतु त्यापेक्षा मासे धरणारे जे मरून गेले त्यांचीं थडगीं फारच दृष्टीस पडतात. चीन देशाच्या सम्राट् राजांनीं जी आपल्या वडिलांच्या नांवानें छत्री बांधली आहे, ती त्यांच्या राजमंदिरापेक्षांही शोभिवंत आहे; आणि चीनलोकांनीं दक्षिण दिशाकडील जे देश जिंकिले होते त्यांचा भोगवटा करावा म्हणून बहुतकरून लोक तिकडे निघून गेले असावे.

मध्यएशियेंतील तिसरा देश, म्हणजे पश्चिमदेश हा दुसऱ्यापेक्षांही सौम्य हवेचा आणि चांगल्या पिकाचा आहे; कांतर बेलूरताग, म्हणजे अंधकाराचा पर्वत, त्याचे पलिकडे जसें जसें पुढें जावें तस तशी जमीन फारच उतरत जाती, आणि आकाश उजळत

जातें, कोठपर्यंत कीं, समरकंद आणि बुखारा त्यांचें सुंदर मैदान लागून पसरेपर्यंत; ज्या मैदानांत हिरवीं गार कुरणें व पुष्पित बाग, व मावर अल्लनहर देशाचीं शहरें व किल्ले, हीं दृष्टीस पडतात. एथील लोक हवेच्या सौम्यतेमुळें सिथियन लोकांच्या जातीची तोंडउघडण दाखितात, आणि ते सौंदर्य व शौर्य त्या गुणांविषयीं सारखेच प्रख्यात आहेत.

उत्तर एशिया, म्हणजे सिबिरिया देश, त्याच्या जमिनीस हिममय उत्तरध्रुवसागरापर्यंत उतरण आहे, म्हणून तिकडे समुद्राच्या हवेमुळें थंडी कमी असावी परंतु उत्तरेकडे त्याचे अक्षांश जात आहेत, आणि उत्तरेकडून हा देश मोकळा आहे, म्हणून थंडी कमी न्होतां अधिक वाढत जाती, आणि त्याच्या वनांतल्या झाडींत व पाणथळ लवणांत, जेथें थिजलेलें पाणी कधीं वितुळत नसतें, तेथें हिवाळा रेंगून बारा महिने चालविते. ऊन पडावयाजोग्या कांहीं जागा आहेत त्या मात्र थोडक्याच दिवसांचा परंतु त्वरेनें वाढणारा अशा उन्हाळ्याचें सुख भोगितात. त्या देशांत जिकडे तिकडे वैराणी आहे खरी, पण तींत कांहीं न्यूनाधिक्य आहे, आणि जो देश रुसाजवळ आहे त्याпे-

क्षा येनसी नदीच्या पलिकडचा देश त्यास सिबिरिया देशाचे गुण अधिक लागले आहेत. त्याप्रमाणें हवेचा प्रकार असतां असें घडून आलें आहे कीं, एशियाखंडामध्यें समशीतोष्ण हवेचा देश नाहीं. त्याच्यामध्यें जी पर्वतांची ओळ आहे तिनें हिंवाळा आणि उन्हाळा त्यांस सगळें खंड विभागून दिलें आहे.

आग्नेयी एशिया हा प्रदेश एशियाखंडाचा उष्ण कटिबंधांतला भाग आहे; चीन व हिंदुस्थान, व त्या दोहोंच्या मधले देश असे त्याचे तीन विभाग समजावे. तार्तरी देशांत जशी हवा थंड असती तशाच थंड हवा चीन देशांतील डोंगरांवर असती, आणि एथल्या खोऱ्यांतील हवा तर हिंदुस्थानच्या हवेसारखी उष्ण असून दक्षिणमहासागराच्या किनाऱ्यावरील हवेप्रमाणें समधात व आर्द्र आहे. त्याप्रमाणें चीन देशांत हरतऱ्हेची हवा असल्यामुळें हरतऱ्हेचा जिन्नस पिकतो. जपान हा देश द्वीपरूप एक लहानसा चीन देशच समजावा. त्याला चोहींकडून पासिफिक महासागराची हवा आहे म्हणून चीन देशांतील जें हवेचें मान तेंच मान एथें असून समुद्राच्या सामीप्यामुळें हवेंत कांहीं फेरफार होतो

प्राणी व वनस्पति त्यांच्या वाढीची जी पराकाष्ठा आहे ती भागीरथीच्या पूर्वेकडील जो प्रांत त्यांत च आहे . हा प्रांत शालवृक्ष , म्हणजे सागवान, आणि हत्ती त्यांचें उत्पत्तिस्थान आहे . सृष्टिकर्त्यानें एथें सृष्टिरचनेचें प्रमाण एवढें मोठें धरिलें आहे कीं , डोंगरांची हरएक ओळ एकेका राज्याची सीमा होती ; आणि खोरीं एवढीं मोठीं आहेत कीं एकेक खोरें साम्राट् राजाचें सगळें राज्य असतें . मलाका नामक जें द्वीपकल्प तें समुद्रांत पुढें गेल्यामुळे त्या प्रांताचा आणि मसाल्याच्या बेटांचा संबंध झाला आहे . तीं ही बेटें मध्यरेषेवरच्या सूर्याखालीं आहेत , व अपार समुद्राच्या मध्यें आहेत , म्हणून त्यांजमध्यें वृक्ष तृणादिकांच्या वाढीचा भर असतो . त्या बेटांविषयीं तर असें वर्णन करायाचें आहे कीं त्यांपैकीं एकेका बेटाचा मोठेपणा एवढा आहे कीं, त्यांत एक न्युहालंड म्हणून बेट आहे तें किंचित् उणें महाद्वीप होऊन राहिलें आहे ; आणि त्यांतून कितीएक इतकीं लहान लहान आहेत कीं पोलिनी शया बेटांतील कितीएक बेटें लहानशा खडपाएवढीं आहेत ; आणि कितीएक प्रवालकीटकांनीं रचलेला लहानसा थर पा-

ण्यावर दिसतो एवढीं आहेत.

नैऋत्य एशिया, म्हणजे इराणदेश, टैग्रिस व युफ्रेटीस त्या नद्यांच्या कांठचे देश, काकसस, एशिय मैनर, सिरिया, आणि अर्बस्थान हे मिळून आहे. हा प्रांत एशियाखंडांतील इतर प्रांतांपेक्षां समशीतोष्ण हवेचा आहे. टैग्रिस व युफ्रेटीस त्या नद्या पूर्वीं पृथ्वीचा चक्रवर्ती जो बाबिलोन देशाचा राजा त्याचे बाग भिजवीत असत, ही त्यांची प्रतिष्ठा आतां नाहीं. लेबानन आणि कार्मेल त्या नांवाच्या डोंगरांवरील वनें, डाफनी एथील राया, दामास्कस एथील फळझाडांचे आगर, जुदियाच्या डोंगरांवरील द्राक्षांचे मळे, आणि त्या देशांतील शेतजमीन, हीं इतकीं वर्णनीय होतीं, कीं पूर्वीं जीं फारच भराच्या वाढीचीं व फारच चांगल्या लागवडीचीं स्थळें होतीं त्यांत त्या स्थळांची गणना होत असे.

त्याच्या दक्षिणेकडील जो प्रांत म्हणजे अरबस्थान हा अगदीं वैराण असून पूर्वीं सांगितलेल्या प्रांताच्या गुणांशीं केवळ उलटा आहे. त्या प्रांतांत रानांतील गुप्त ओलाव्या करून जगणारीं ताडाचीं झाडें त्यांवांचून दुसऱ्या तृणवृक्षादिकांचा कांहींच उपज नाहीं.

त्या प्रांतांतील एकसारख्या ओसाडीस भंजक डोंगर मात्र आहेत; जे हे डोंगर मेघांला फोडतात, मग त्यांपासून पडलेलें पाणी खडकांच्या टांक्यांत सांचतें, तें डोंगरां च्या कडयांवर ताली घालून बाग केलेले असतात, त्यांच्या उपयोगीं पडतें. त्या बागांशिवाय चोहींकडे खरखरीत वेराण आहे. हे डोंगर जसे जसे दक्षिणि कडे जातात तसे तसे अधिक होऊन व त्यांतील खिं डी नाहींशा होऊन मस्कती नांवाचा एक अरबस्थान चा प्रांत आहे त्यास वेष्टितात; ज्या त्या प्रांतांत डोंग र आणि खोरीं ऊन आणि पाऊस ह्यांच्या योगानें वाळ वंटाच्या खरखरीत मेदानांशीं वेगुण्य संपादणारी अ- शी नाना तऱ्हेची हिरवळ उत्पन्न होती.



# पाठ ६५

## पृथ्वीच्या नकाशाचें वर्णन.

### आफ्रिकाखंड व युरोपखंड.

आफ्रिकाखंडाचा उत्तरभाग त्याचें वर्णन असें आहे कीं, अरबस्थानांतील जें ऊन आणि जो नापीकपणा त्यांचें प्रत्यंतर मोठ्या प्रमाणाचें आणि पराकाष्ठेच्या उत्कर्षाचें एथें झालें आहे. एथील जो पराकाष्ठेचा नापीकपणा त्यास भंजक तृणवृक्षादिकांच्या हिरवळीच्या दोन लांब लांब पट्या आहेत. त्या प्रांतांतील व्यापक जो नापीकपणा त्यापासून पूर्वेस नील नदीनें एक पट्टीचा आणि उत्तरेस भूमध्यसमुद्र व अटलस पर्वतांची रांग त्यांनीं एक पट्टीचा असा दोन पट्यांचा बचाव केला. नील नदीची थडी तिच्या मुखाकडे रुंदावती, आणि भूमध्यसमुद्राचीं तीरें अटलांटिक महासागराच्या तीरांशीं जशीं जशीं जवळ जातात, तसतशीं अटलस पर्वताच्या दोहींकडील खोरीं रुंदावत जातात.

आफ्रिकाखंडांतील ज्या ओलखणी आहेत त्या अरबस्थानच्या ओलखणीपेक्षांही अधिक चमत्कारिक आहेत ; कारण कीं त्यांच्या भोंवतालची जी वैराणी आहे ती फारच अधिक आहे . पृथ्वीचे पाठीवरील सर्वांहून नापीकप्रांत असा जो ग्रेट साहारा, म्हणजे मोठें वाळवंट , त्याच्या पलिकडे सर्वांपेक्षां पिकाऊ प्रांत, असा जो मध्य आफ्रिका देश, हा लागतो, ज्यामध्यें उष्णता आणि आर्द्रता हीं जीं तृण वृक्षादिक उत्पन्न होण्याचीं साधनें त्यांची पराकाष्ठा आहे .

आफ्रिकेच्या पूर्वेकडील कांठचा प्रांत आणि पश्चिमेकडील कांठचा प्रांत ह्यांच्या लक्षणांचा कांहीं भेद आहे. पूर्वेकडील कांठ हा अधिक उंच आणि मोकळा असा दिसतो . पश्चिमेकडील कांठ ह्यांत मोठाल्या व भाणसांच्या येरझारीच्या ज्या नद्या त्यांचीं मुखें आहेत त्याचीं दक्षिणोत्तर दोहींकडील दोन शेवटें सो... कीचें सर्व आफ्रिकाखंड बहुतकरून उष्णक... न आहे . त्या दोन शेवटांच्या प्रांतांत समशी... दिबंधांत उत्पन्न होणारे जे जिन्नस त्यांचा उ... तो

पृथ्वीवर समशीतोष्ण हवेचा प्रांत युरोप...

होय. हें खंड द्वीपरूप आहे; त्यांतून समुद्राचे फांटे व नद्या पुष्कळ जातात. त्यांच्या योगानें हवेचे जे ग्रीष्म मावधि त्यांचें निवारण होऊन तेथील हवेला समधातपणा येतो. एशियाखंडांत जशीं माळरानें आहेत तशीं युरोपखंडाच्या पूर्वभागाकडेही कांहीं माळरानें आहेत; परंतु त्यांच्यापेक्षां त्यांच्या आंगीं लागवडीची योग्यता अधिक आहे. एशियाखंडांतील उंचवट्याचीं आणि खबरखीत जीं मैदानें त्यांतून उदमी माल, दुसरी सोय नाहीं म्हणून, ओझ्यांच्या जनावरांवरून न्यावा लागतो. युरोपांतल्या रूस देशांत तर गलबतें चालायाजोग्या नद्या आहेत, त्या जलमार्गानें सुखें करून जाण्यायेण्याची आणि माल नेण्याची सोय करितात

युरोपाचें भूखंड जसजसें नैऋत्य दिशेकडे जातें तसतसा जमिनीचा पिकाऊपणा आणि लागवडीस लायकपणा वाढत जातो. भूमध्यसमुद्र आणि बाल्टिक समुद्र जे युरोपखंडांतून वाहतात त्यांच्या कांठच्या प्रदेशांत ग्रीक लोक आणि गाथिक लोक त्यांची पहिली वस्ती असे; ज्यां लोकांपासून प्राचीन काळीं व अर्वाचीन काळीं ही युरोपखंडांतील लोकांस

मधारणूक आणि कीर्ति प्राप्त झाली. पश्चिमदिशेक डीकें प्राचीन महाद्वीपाचे कडे प्रांत व बाहेरचीं ठाणीं असे जे स्पेन, पोर्तुगाल, व ग्रेटब्रिटन हे देश एथील लोक तर नवीन महाद्वीपावर पसरले आहेत, आणि हा जो भूगोलाचा समोरचा भाग त्याजवर त्यांनीं क्रांतींची नवी धांव आरंभिली आहे.

---

## पाठ ६६

## पृथ्वीच्या नकाशाचें वर्णन

### अमेरिकाखंड.

अमेरिका म्हणजे नवीन महाद्वीप हिचे [illegible] विभाग महासागरानें केले आहेत. ज्या त्या म[illegible]नें समुद्र आणि कितीएक बेटें मध्यें स्थापून [illegible] स्ट्रैट्स् व काराकास त्यांची अखंडता मोडिल[illegible]. युरोपखंडांतून आलेले निरनिराळे लोक त्या[illegible] पहिल्या रीतीभातीस लायक जो जो प्रांत तो ते [illegible]

महाद्वीपांत त्यांस मिळाला. देशांतल्या देशांत आ-णयायेण्याची व माल नेण्याआणण्याची सर्वोत्कृष्ट सोय जशी युनैटेड्स्टेटूस् ह्यामध्यें आहे तशी पृथ्वीवर कोठें नाहीं; ती असून वेस्त इंडिया बेटें ह्यांशीं आणि युरोपखंड ह्यांशीं दळणवळण ठेवण्याविषयीं त्यांच्या स्थानाच्या स्थितीनें फार चांगली सोय आहे.

ब्राजिल्स ह्यांच्या स्थानाचा तर गुण असा आहे कीं, पोर्टुगीस लोकांनीं जी चलती मिळविली होती ती वाढविण्यास, आणि युरोपखंड व एशियाखंड ह्या उभयतांची मधल्या ठिकाणची उतारपेंठ होण्यास, आणि जीं बेटें पोर्टुगीस लोकांच्या हातून अगदीं गेलीं, त्यांतील चांगले जिन्नस आपल्या जमिनींत लावून त्यांची फार उत्कृष्ट उत्पत्ति करण्यास, त्यांस फार सोय आहे.

राकीमौंटन, म्हणजे खडकाळपर्वत, त्यांकडे नेहमीं बर्फ असतें, व जमिनीस अगदीं नापीकपणा असतो, ही निकृष्टपणाची सीमा धरावी, आणि फ्लारिडाम म्हणून जो प्रांत एथें वनस्पतींस नेहमीं टवटवी असते, ही उत्कृष्टपणाची सीमा धरावी, त्या दोन सीमांमधील जे हवेचे व जमिनीचे चांगले पाहिजे प्रकार

ते सर्वही युनैटेडूस्टेटूस् त्यांमध्यें आहेत. ब्राजिल्स् त्यां स नंतर उत्तरेकडील व भूमध्यरेषेकडील प्रांतांमध्यें आफ्रिकेंतील जशी हवा व जशी वनस्पतींची उत्पत्ती वाढ तसी असती, आणि दक्षिणेकडील प्रांतांमध्यें चहाचीं झाडें व चीन देशांतील बरकड दुसरे जिन्नस त्यांची उत्पत्ति होती.

स्पेन देशांतील लोक जसे प्राचीन महाद्वीपांत तसे नवीन महाद्वीपांत, व जसे प्राचीन काळीं तसे अर्वाचीन काळींही, खाणींचे मोठे मालक आहेत. इतर लोक नद्यांच्या थड्यांमध्यें पसरले, हे तर आंदेस पर्वताच्या पठारावर पसरले आहेत; आणि आकाशांतील उंच आणि स्वच्छ अशा ठिकाणांत आपलीं शहरें मेघांच्या वरतीं बांधून गगनस्थ लोक होऊन राहिले आहेत. युनैटेडूस्टेटूस् त्यांतील लोक त्यांचें स्थान युरोपखंडाच्या समोर आहे, आणि ब्राजिल्स् एथील लोक आफ्रिकेच्या लगत्यास सोईच्या ठिकाणीं राहतात, स्पेनदेशांतून आलेले लोक हे तर आंदेस पर्वतांच्या पठारावर बसून त्याखालीं अफाट महासागर पाहतात, ज्या त्या महासागरांतून चीन देशास आणि दक्षिण समुद्रांतील बेटांस थेट जाव-

याचा मार्ग लवकर सांपडेल, आणि पश्चिमेकडील देशांतील सोनें रुपें व पूर्वेकडील देशांतले उत्कृष्ट जिन्नस त्यांचें आणणें नेणें करावयास त्या सागराच्या योगानें नवें द्वार होईल

